# भासाचीं नाटकें.

नाटकांचीं नांवें,

१ दूतवाक्य. २ मध्यमव्यायोग. ३ कर्णभार. ४ ऊरुभंग.
५ दूतघटोत्कच. ६ अभिषेक. ७ पंचरात्र. ८ प्रतिमा.
९ बालचरित.

अनुवादक,

कृष्णाजी लक्ष्मण सोमण ऊर्फ किरात.

मुद्रक व प्रकाशक—शंकर नरहर जोशी.
चित्रशाळा प्रेस, सदाशिव पेठ, घ. नं १०२६ पुणें शहर.

सन १९२७.

किंमत २॥ रुपये.

# चित्रांची सूचि.



---

## नाटकांची अनुक्रमणिका.

# "दूतवाक्य" नाटकाचें कथासूत्र.

पांडवांचा बारा वर्षें वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास संपून ते विराट नगरींत प्रगट झाले. प्रगट झाल्यावर अर्थातच त्यांनीं आपलें राज्य परत मागितलें. तें देण्यास दुर्योधन नाकबूल होता. पांडव परत आल्यावर त्यांना त्यांचें अर्धराज्य द्यावयाचें असें त्यानें पूर्वीं त्यांना वचन दिलें होतें. पण आतां वचनभंग करून त्यानें त्यांच्याशीं युद्ध करण्याची कडेकोट तयारी चालविली व आपल्या बाजूस अनेक राजांना सहाय्यार्थ बोलाविलें. अशा प्रकारें त्याच्याकडे अकरा अक्षौहिणी सैन्य जमलें. इकडे पांडवहि कांहीं स्वस्थ बसल नव्हते. त्यांच्या पक्षालाहि अनेक राजे येऊन मिळाले; आणि त्यांचें सैन्य सात अक्षौहिणी जमलें. आपल्या दोघांच्या गृहकलहामुळें हा महायुद्धाचा प्रसंग ओढवून यांत भरतखंडांतील अनेक राजांचा आणि लोकांचा निरर्थक प्राणनाश होणार हें पाहून धर्माला फार खेद वाटला. व त्यानें ही प्राणहानि टाळण्याकरितां कौरवांशीं आपल्यास कितीहि पडतें घ्यावें लागलें तरी तें पत्करून सामोपचारानें दोघांमधील तंटा मिटवावा असें मनांत योजिलें. आणि त्यानें कौरवांकडे शिष्टाई करण्याकरितां म्हणून श्रीकृष्णाला आपला दूत या नात्यानें पाठविलें. दुर्योधन दुराग्रही आणि मानी आहे, तो सामास केव्हांहि तयार होणार नाहीं ही गोष्ट श्रीकृष्ण पूर्णपणें जाणून होते. पण विरुद्धपक्षाला सामाची एकवेळ संधि द्यावी, मग तो आपलें म्हणणें ऐको अगर न ऐको, असें ठरवून श्रीकृष्ण शिष्टाईस निघाले.

इकडे दुर्योधन मंत्रागारांत आपल्या पक्षांतील राजेलोकांस जमवून, आपल्या बाजूचें सेनापतिपद कोणास द्यावयाचें याचा विचार करीत होता. सर्वानुमतें तें पद पितामह भीष्मांना द्यावें असें ठरलें. याच प्रसंगीं पांडवांच्या छावणींतून श्रीकृष्ण शिष्टाई करण्याकरितां येऊन ठेपल्याची बातमी आली. तेव्हां दुर्योधनानें जमलेल्या सर्व राजे लोकांना कृष्णाला उत्थापन देऊन त्याचा कोणत्याहि प्रकारें सत्कार करावयाचा नाहीं असें बजाऊन सांगितलें. व ही आज्ञा जो पाळणार नाहीं त्याला अमुक सुवर्णभार दंडार्थ द्यावा लागेल हेंहि त्यानें ठरवून टाकिलें. आणि तो स्वतः केवळ श्रीकृष्णाचा उपमर्द करण्याकरितां, द्रौपदीवस्त्रहरणाचा त्यानें काढविलेला एक चित्र-

पट आणवून त्याकडे पहात बसला. शिष्टाई करण्याकरितां श्रीकृष्ण आले. ते येतांच अनेक राजांनीं उठून त्याचें स्वागत केलें. दुर्योधन चित्रपट पाहण्यांत गर्क होऊन बसला होता. कृष्ण त्याच्या जवळ टेपले आणि त्यांनीं- काय करीत बसला आहेस, म्हणून त्याला विचारिलें. तेव्हां दुर्योधन गोंधळून गेला आणि स्वतःच्या आसनावरून खालीं पडला. कृष्णानें दुर्योधना पुढें असलेल्या त्या चित्रपटाबद्दल त्याची फार निर्भर्त्सना केली. आणि तो चित्रपट तेथून दूर करविला. कृष्णानें शिष्टाईची गोष्ट काढतांच दुर्योधनानें सारीच उडवाउडव केली व उलट शिष्टाईस येणाऱ्या श्रीकृष्णाचाच अधिक्षेप चालविला. त्यानें त्याची अनेक प्रकारें निंदा केली. शेवटीं श्रीकृष्णास धरून अटकेंत ठेवावयाचें असा त्यानें घाट घातला. त्याला धरण्या विषयीं त्यानें हुकूम सोडला. पण तो पाळण्याचा कोणालाहि धीर होईना. शेवटीं तो स्वतःच श्रीकृष्णास पकडण्याकरितां उठला. दुर्योधनाची येथवर मजल आल्याचें पहातांच श्रीकृष्णानीं विश्वरूप धारण केलें. तेव्हां दुर्योधनाला जिकडे पहावें तिकडे श्रीकृष्णच दिसूं लागले. त्यानें दिसणाऱ्या प्रत्येक श्रीकृष्णाला जखडून टाकण्याची सर्व राजे लोकांस आज्ञा केली. व त्याच्यावर बाणांचा वर्षाव करून त्याला विद्ध करण्याची त्यानें हाव धरिली. इकडे श्रीकृष्ण वासुदेव क्रुद्ध झाले व आतां वाट न पाहतां पांडवांचें काम आपणच सर्व उरकावें अशा हेतूनें त्यांनीं सुदर्शनास पाचारण केलें. सुदर्शन सगुण रूपानें श्रीकृष्णा पुढें येऊन ठाकलें. कृष्णानीं सुदर्शनास कौरवांचा संहार करण्याची आज्ञा केली. तेव्हां सुदर्शनानें भगवान् श्रीकृष्णांना शांत होण्या विषयीं प्रार्थना केली. आणि ते शांत होतांच, सुदर्शनानें त्यांना त्यांच्या आवतारकार्याची स्मृति दिली. तेव्हां श्रीकृष्णाचा कोप शांत झाला. व त्यांनीं सुदर्शनास स्वस्थानीं जाण्याची आज्ञा केली. सुदर्शन जाऊं लागलें तोंच तेथें शार्ङ्ग धनुष्य, नंदक खड्ग, पांचजन्य शंख, कौमोदकी गदा व विष्णुवाहन गरुड हींहि सगुण रूपानें—कृष्णानें स्मरण केल्या वरून—तेथें प्रगट झालीं. पण सुदर्शनानें त्या सर्वांना श्रीकृष्णाचा कोप शांत झाल्याचें सांगून तेथून परत जाण्यास सांगितलें; आणि तें स्वतः मेरुपर्वताच्या सुंदर गुहेकडे चालतें झालें.

श्रीकृष्णहि पांडवांच्या तळाकडे जावयास निघाले. तोंच "हं हं जाऊं नका, जाऊं नका," असे धृतराष्ट्राचे शब्द त्यांच्या कानीं आले. धृत-

राष्ट्र अर्घ्यपाद्य घेऊन श्रीकृष्णाचा शोध करीतच येत होता. श्रीकृष्णा जवळ येतांच स्वतःच्या मुलांनीं केलेल्या महत् अपराधाबद्दल त्यानें श्रीकृष्णाच्या पायांवर आपलें मस्तक ठेवून श्रीकृष्णाची क्षमा मागितली. व भगवानांनीं प्रसन्न होऊन, पुन्हां त्याच्या भेटीची इच्छा दर्शवून धृतराष्ट्रांस निरोप दिला. असें या छोट्याशा नाटकाचें कथासूत्र आहे.

हें नाटक " व्यायोगा "चाच एक प्रकार आहे.

---

# ' दूतवाक्य ' नाटकांतील पात्रें.

धृतराष्ट्र...—कुरुपति—दुर्योधनाचा पिता.

दुर्योधन...—हस्तिनापूरचा राजा; धृतराष्ट्राचा ज्येष्ठ पुत्र.

बादरायण.—कांचुकीय.

वासुदेव...—श्रीकृष्ण.

भीष्म.....—कौरव पांडवांचे आजे.

द्रोणाचार्य.— " " गुरु.

वैकर्ण.....—<br>वर्षदेव....— } कौरव पक्षांतील राजे.

दुःशासन..—धृतराष्ट्राचा द्वितीय पुत्र.

शकुनि....—दुर्योधनाचा मामा; गांधार देशाचा राजा.

कर्ण......—अङ्गदेशाचा राजा.

## इतर कौरवपक्षीय क्षत्रिय राजे.

सुदर्शन...—भगवान् विष्णूचें चक्र.

शार्ङ्ग......— " " धनुष्य.

नंदक.....— " " खड्ग.

कौमोदकी.— " ची गदा.

पांचजन्य..— " चा शंख.

गरुड......— " चें वाहन.

सूत्रधार.

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

महाकवि श्रीभास--प्रणीत.

# दूतवाक्य.

[ नांदी झाल्यावर सूत्रधार प्रवेश करितो. ]

**सूत्रधारः—**

ज्याचीं नखें कोमल, ताम्र वर्णें, ।
व्योमीं विदारी, नमुचीस ज्यानें—॥
तो पाद रक्षो, हरिचा तुम्हांतें ।
जो उत्सवा देत जगत्रयातें ॥ १ ॥

सन्मान्य सभाजनांना माझी अशी विनंति आहे कीं,—( कांहीं ऐकल्यासारखें करून ) मी विनंति करण्यांत गर्क असतां हा गलका कसला बरं ऐकूं येत आहे ? हं, पाहूंच तर—

[ पडद्यांत ]

" अरे, अरे द्वाररक्षकांनों ! महाराज दुर्योधनाची अशी आज्ञा आहे कीं—"

**सूत्रः**—ठीक आहे, आलं लक्षांत.

( आर्या—गीति. )

धृतराष्ट्रपांडु—पुत्रांमध्यें अति कलह माजुनी राहे ।
आणि एवढ्याच करितां—
दुर्योधन—निर्देशें मंत्रगृहा भृत्य भूषवित आहे ॥ २ ॥

( जातो. )

[ नंतर कांचुकीय प्रवेश करितो. ]

**कांचुकीयः**—अरे, अरे द्वाररक्षकांनों ! महाराज दुर्योधनांची अशी आज्ञा आहे कीं—"मला आज सगळ्या राजेलोकांचा सल्ला घ्यावयाचा आहे तर सर्वांना बोलावणीं जाऊं देत." ( फिरून, पाहून ) अरे ! हे तर महाराज दुर्योधनच इकडे येत आहेत ! हा—

श्लोक ( शा. वि. )

वर्णे श्याम, युवा, दुकूल सित हें हा घेत अंगावर ।
लावी गंध-उटी, शिरीं धरियलें छत्रा, ढळे चामर ॥
याचें रंजित अंग हो मणिगणें जीं कोंदिलीं भूषणीं ।
श्रीमान् शोभत, पूर्ण चंद्रचि जसा त्या दिव्य तारांगणीं ॥ ३ ॥

[ नंतर वर वर्णन केल्याप्रमाणें दुर्योधन प्रवेश करितो. ]

दुर्योधनः—

आर्या [ गीति. ]

युद्धोत्सव हा लाभत अवचित ऐसा विचार उद्भवतां ।
क्रोधें भणभणलेलें अभ्यंतर हो सहर्ष मम आतां ॥
आतां इच्छा हे कीं:—पांडव—कटकीय भव्य दंतींच्या ।
उखडूनि दंत—मुसळां, केव्हां पाहीन मी मुखां त्यांच्या ! ॥४ ॥

**कांचुकीयः**—महाराजांचा विजय असो. महाराजांच्या आज्ञेनुसार सर्व राजेलोक एकत्र जमले आहेत.

**दुर्योधनः**—फार चांगलं केलंत. आतां तुम्हीं अंतःपुरांत जा.

**कांचुकीयः**—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो. ]

**दुर्योधनः**—अहो, आर्य वैकर्ण ! अहो, वर्षदेव ! बोला आतां—माझं हें अकरा अक्षौहिणी सैन्य जमलेलं आहे, ह्याचं सेनापतित्व कोणाला द्यावं ? कोण पात्र आहे ह्याला ? ( ऐकल्यासारखें करून ) काय—काय म्हटलंत ?—कीं हें मोठ्या विचाराचं काम आहे, आणि हें योग्य विचारांतींच ठरविलं पाहिजे—म्हणून ? हेंहि ठीकच आहे. तर मग चला, या आतां, आपण सगळेच मंत्रशाळेंत जाऊं या. ( द्रोणास ) आचार्य ! प्रणाम आहे माझा आपल्याला. आचार्यांनीं आतां मंत्रशाळेंत चलावं. ( भीष्मास ) पितामहांना मी प्रणाम करितों. पितामहांनीं मंत्रशाळेंत चलावं. ( स्वतःशीं ) हे शकुनीमामा ! ( उघड ) मी नमस्कार करितों तुम्हांला. आपणहि मंत्रशाळेंत चला. अहो, आर्य वैकर्ण, वर्षदेव ! आपणहि चला. अहो, हे सर्व क्षत्रियजन हो ! तुम्ही सर्वांनीं खुशाल आंत यावं. ( कर्णास ) मित्रा, कर्णा ! चल, आपणहि जाऊं या आंत.

[ मंत्रशाळेंत सर्वजण प्रवेश करितात. ]

(द्रोणास) आचार्य ! हें इथं कूर्मासन आहे याच्यावर बसावं आपण. (भीष्मास) पितामह ! हें सिंहासन आहे यावर आपण बसावं. मामा ! आपल्या करितां हें चर्मासन आहे इथं. अहो, आर्य वैकर्ण, वर्षदेव ! आपणहि बसावं. अहो, हे सर्व क्षत्रियजनहो ! आपणहि आपल्याला वाटेल तिथं बसावं. ( कांहीं ऐकल्यासारखें करून ) काय-काय-' महाराज कां बरं बसत नाहींत ?' म्हणून म्हणतां ? अहो, हा सेवाधर्म असाच आहे. हा पहा बसलों मी. मित्रा, कर्णा ! तूंहि पण बैस.( बसतात. ) अहो आर्य वैकर्ण ! अहो वर्षदेव! बोला आतां-माझं हें अकरा अक्षौहिणी सैन्य जमलं आहे, याचं सेनापतित्व कोणाला द्यावं ? कोण पात्र आहे ह्याला ? ( कांहीं ऐकल्यासारखें करून) काय म्हटलंत आपण ? हे गांधारराजच तें सांगतील म्हणून ? ठीक आहे, तसंच होऊं दे. मामाच सांगू देत. ( कांहीं ऐकलेसें करून ) काय म्हणतात मामा,-कीं गांगेय-पितामह भीष्म-इथं असतांना सेनापति होण्याला दुसरं कोण योग्य आहे म्हणून ? मामांचं म्हणणं योग्य आहे. होवोत, होवोत, पितामहच होवोत सेनापति. आमचीहि इच्छा हीच आहे.

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

वातें चंड, जसा महोदधि करी गंभीर तीं गर्जितें ।
तैसे दुंदुभि-नाद, शंख-रव ते, होतां चमू-घोषितें ॥
होवोनी अभिषेक, तोय पडतां गंगासुतांच्या वर ।
ह्या तोयासह शत्रु-भूपततिचा हृत्पात हो सत्वर ! ॥ ५ ॥

**कांचुकीयः**—( प्रवेश करून ) महाराजांचा विजय असो. हे पांडवांच्या तळाकडून दूत म्हणून **पुरुषोत्तम नारायण** आले आहेत.

**दुर्योधनः**—**बादरायणा** ! काय-काय बोलतो आहेस तूं हें ? काय-काय ? तो कंससेवक दामोदर,-तो तुझा पुरुषोत्तम ? तो गुराखी तुझा पुरुषोत्तम ? जरासंधानं ज्याचं राज्य, ज्याची कीर्ति, आणि ज्याची संपत्ती हरण केली होती, तोच तुझा पुरुषोत्तम काय ? वाः ! राजेलोकांच्या निकट परिचर्येंत ( खास तैनातींत ) असणाऱ्या सेवकजनांचा हा फार

नामी शिष्टाचार ! (आपल्याशीं) याचं हें बोलणंहि मगरूरीचं आणि ताठ्याचं दिसतं ! ( उघड ) आः ! चल, काळं कर इथून.

**कांचुकीयः**—महाराजानीं प्रसन्न होऊन क्षमा करावी सेवकाला. भांदरलींत मी शिष्टाचार विसरलों. ( पाया पडतो. )

**दुर्योधनः**—भांदरलींत म्हणतोस ? हो, मनुष्याची उडते अशी भांदल. चल, ऊठ–ऊठ.

**कांचुकीयः**—कृपाच झाली म्हणायची ही मोठी माझ्यावर !

**दुर्योधनः**—आतां माझा राग गेला. बोल, आलेला दूत कोण आहे ?

**कांचुकीयः**—आलेला दूत - **केशव.**

**दुर्योधनः**—काय ? **केशव** म्हटलंस ? आतां कसं बोललास ? असं प्रथम बोलायला पाहिजे होतंस. खरा शिष्टाचार तो हा. ( जवळील राजांस) अहो, अहो भूपाल हो ! दूत म्हणून आलेल्या **केशवाला** काय केलं असतां योग्य होईल बरं ? ( ऐकून ) काय म्हटलंत आपण—कीं 'अर्घ्य देऊन **केशवाची** पूजा करावी, ' म्हणून ? आम्हांला नाहीं पसंत हें. ह्याला इथं पकडून ठेवणं हेंच मला हितकर दिसतं.

**श्लोक** [ वृत्त–व. ति. ]

> **कृष्णास बद्ध करितां निमिषांत एका ।**
> **होतील पांडव जणूं गतदृग् विलोका ! ।**
> **होतांच पांडव विमूढ, विहीन शक्ती ।**
> **निर्वैरि हो मन तशी अखिला धरित्री ! ॥ ६ ॥**

आणखी दुसरं असं कीं, आज इथं स्वतः आपण उठून उभा राहून जो **केशवाचा** सन्मान करील त्याला आम्हीं बारा सुवर्णभार दंड करूं ! तेव्हां आपण सर्वांनीं खबरदारीनं वागावं. ( आपल्याशीं ) आतां मला स्वतःला उठायला लागूं नये म्हणून काय बरं उपाय योजावा ? ओहो ! अहो, यालाहि उपाय आहे ! **बादरायणा** ! ज्याच्यांत द्रौपदीचं केशाकर्षण आणि वस्त्रहरण हीं चितारलीं आहेत तो चित्रपट घेऊन ये पाहूं. मी त्याच्याकडे दृष्टी लाऊन **बसेन आणि केशवाला** उत्थापन म्हणून देणार नाहीं.

**कांचुकीयः**—जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन परत येऊन ) महाराजांचा विजय असो. हा तो चित्रपट.

**दुर्योधनः**—माझ्यापुढं तो पसरून ठेव.

**कांचुकीयः**—जशी महाराजांची आज्ञा. [ चित्रपट पसरून ठेवतो. ]

**दुर्योधनः**—वाः हा चित्रपट मोठा प्रेक्षणीय आहे! इथं हा दुःशासन द्रौपदीचे केशकलाप धरीत आहे; इथं ही द्रौपदी,—

श्लोक. [ वृत्त-इं. व. ]

दुःशासनें गांजियलें जियेशीं ।
भीतीमुळें फाडित लोचनाशीं ॥
राहू-मुखीं ती जशि चंद्रलेखा ।
ही द्रौपदी तेंवि दिसे सुरेखा ! ॥ ७ ॥

इथं हा दुरात्मा भीम, सर्व राजेलोकांच्या देखत द्रौपदीची अशी विटंबना आणि अपमान होत असल्याचं पाहून, क्रोधानं भडकून जाऊन राजसभेचा खांबच उचलतो आहे ! इथं हा युधिष्ठिर—

( आर्या-गीति. )

धर्मदयासत्यान्वित, द्यूतें परि हीनचेतनाचि होई ।
क्रुद्धा भीमा शांतावि नेत्रकटाक्षांस टाकुनी पाही ! ॥ ८ ॥

हा आतां इथं अर्जुन पहा—

श्लोक- [ वृत्त-व. ति. ]

हीं क्रोध-पूर्ण नयनें दिसतात याचीं,
हा खालचा स्फुरत ओष्ठ असे तसाची;
हा मानुनी तृणचि कीं रिपुमंडलातें
ओढीत गाण्डिव-गुणा हळु आत्म-हस्तें !
उच्छेदु हा जणुं बघे सकलां नृपांस
घाली तदर्थ कर काय शरासनास ? ॥ ९ ॥

इथं हा युधिष्ठिर अर्जुनाचें निवारण करितो आहे. इथं हे दोघे नकुल सहदेव—

श्लोक [ वृत्त-शा वि. ]

शेले हे कटिनां कसून, धरिती हे खड्ग ढाली करीं; ।
यांचें क्रौर्य तसेंचि उग्रपण तें हो व्यक्त मुद्रेवरी ॥

दोघेंहि अधरोष्ठ चाविति पहा,-हें होतसे गोचर।
क्रोधें धांवुनि जात हे जवभरें मद्बांधवांच्या वर ! ॥
मृत्यूची लव भीति ज्यां न उरली,-येई दिसूनी असें।
वाटे धांवुनि जाति कीं मृगशिशू सिंहावरी साहसें ! ॥ १० ॥

इथं हा युधिष्ठिर, कुमारांचे जवळ जाऊन त्यांचें निवारण करीत आहे. त्यांना तो जसें कांहीं—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

" मी नीच, मी अधम, मी चलबुद्धि पूर्ण !
कोपा त्यजा मन कसें तरि आवरून ॥
तुम्हीं सुजाणचि, नयानय जाणणारे।
कां जातसां उगीच धांउन या प्रकारें ? ॥
द्यूताधिकार करवी अपमान जे जे।
ते साहुं येत न तुम्हां, परि हें न साजे ! ॥
ते श्रेष्ठ वीरहि त्वदीय पराक्रमातें-
शंकूनि, मानितिल निंद्यचि कीं तुम्हांतें ! " ॥ ११ ॥

असें म्हणत आहे ! हे इथं गांधारराज—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

फांसे फेंकित कैतवें, हंसतसे गर्वेचि नीतिज्ञ हा ! ।
द्यूताचे विजयेंचि हर्ष रिपुचा संकोचवी तो पहा ॥
कृष्णा ढाळित अश्रु, पाहत तिला हा वांकड्या दृष्टिनें।
बैसे सोडुनि रीत; काढित असे रेषा कराग्रार्पणें ! ॥ १२ ॥

हे आचार्य आणि पितामह, तिला पाहून लज्जेनं आपल्या शेल्याच्या पदरांनीं आपलीं तोंडें झांकून घेऊन बसले आहेत ! ओ हो ! ह्या चित्रांतील रंग किती तरी उठावदार ! यांत भाव किती उतरलेले आहेत ! यांत यथार्थपणा किती साधला आहे ! एकंदरींत हा चित्रपट फारच सरस आणि हबेहुब असा काढला आहे. हा पाहून मला तर फार आनंद होत आहे. कोण आहे तिथं ?

कांचुकीयः—महाराजांचा विजय असो.

दुर्योधनः—बादरायणा ! आपलं वाहन एक पक्षी आहे हाच ज्याला

गर्व वाटतो, अशा त्या दूताला इकडं घेऊन ये.

कांचुकीयः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो. ]

दुर्योधनः—मित्रा, कर्णा !

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

तो कृष्ण कृष्णमति-सेवुनि भृत्यधर्म ।
ये पांडवांकडुनि; घेउनि दूतकर्म ! ॥
कर्णा ! स्वकर्ण करि सज्ज, युधिष्ठिराच्या ।
ऐकावया युवतितुल्य वचांस साचा ! ॥ १३ ॥

[ नंतर वासुदेव आणि कांचुकीय हे प्रवेश करितात. ]

वासुदेवः—(आपल्याशीं) मी आज धर्मराजाच्या शब्दाला मान देऊन अर्जुनाच्या अकृत्रिम स्नेहामुळें, मला अनुचित असं हें दूतकर्म स्वीकारून रणदर्पामुळं दिलेला सल्ला न ऐकणाऱ्या अशा ह्या दुर्योधनाकडे आलों आहे. तिकडं तो भीमसेन—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

सेना-वारण-गण्ड चूर्ण करण्या घे जो गदा उग्र ती ।
त्यातें द्रौपदि–मानभंग चढवी अत्यंत कोपाप्रती; ॥
भीमक्रोध-शिखा, प्रचंडहि तसे ते पार्थबाणोत्थित–।
वायू, हें कुरुवंशकानन पहा पूर्वींच कीं जाळित ! ॥ १४ ॥

हें सुयोधनाचं शिबिर. इथं—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

इंद्राच्या पुरतुल्य राजशिबिरें छंदेंचि हीं निर्मिलीं ।
तैशीं शस्त्रगृहें प्रशस्त विविधा शस्त्रादिकीं थाटलीं ॥
अश्वांचे समुदाय उत्तम असे खेंकाळती मंदुरीं ।
हस्तींचाहि तसाच यूथ अपुल्या चीत्कार–शब्दा करी ॥
हें ऐश्वर्य अफाट जें पसरलें जाणार नाशाप्रत ।
गर्वानें अवमानिती स्वजन जे आमंत्रिती त्याप्रत ! ॥ १५ ॥

अहो !

आर्या [ गीति. ]

दुर्मति दुर्योधन शठ, दुष्टवचें द्वेषितो गुणिजनांस ।
स्वजनीं निष्ठुर हा नच बघुनि मला करिल साम-कार्यास ॥१६॥

अहो, बादरायण! जायचं कां आंत?

कांचुकीयः—काय–विचारायचं काय यांत? पद्मनाभानीं आंत चलावं.

वासुदेवः—(प्रवेश करून) अरे, हें काय? मला पाहतांच ह्या सगळ्या क्षत्रिय मंडळाची अशी तारांबळ आणि धांदल कां बरं उडाली आहे? (उघड त्यांस) छेः छेः आपण कां हा त्रास करून घेतां? आपण आपापल्या इच्छेनुसार स्वस्थ बसावं.

दुर्योधनः—काय–काय? केशवाला पाहतांच सगळ्या क्षत्रियांची धांदल उडाली? (उघड त्यांस) हं असे गोंधळून जाऊं नका. पूर्वी कानावर घातलेली दंडाची गोष्ट लक्षांत धरा. इथं माझीच आज्ञा प्रमाण असली पाहिजे.

वासुदेव.—काय सुयोधना! काय करीत बसला आहेस?

दुर्योधनः—(आसनावरून खालीं पडून, स्वगत) एकून केशव आला हें स्पष्टच झालं आतां.

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

केला सुनिश्चय जरी निज मानसाचा ।
वृत्तीस शांत करुनी स्थिर बैसण्याचा ॥
येतांचि केशव घडे च्युति हे मलाची ।
ही शक्ति निश्चित गमे मज केशवाची! ॥ १७ ॥

हा मोठा मायावी–कपटी-दूत आहे! (उघड त्यास) अहो दूत! हें इथं आसन आहे, याच्यावर बसावं.

वासुदेवः–(द्रोणास) आचार्य! आपण बसावं. (इतरांस) अहो, गांङ्गेय प्रमुख भूपालानो! आपणहि संकोच न करितां आपापल्या आसनावर बसावं. आम्हींहि बसतों. (बसून) ओहो. हा चित्रपट प्रेक्षणीय असल्याचं दिसतं. (चित्रपट निरखून) छेः छेः यांत तर द्रौपदीच्या केशाकर्षणाचा प्रसंग उद्धटपणानें रेखाटला आहे! अरेरे! केवढी दुःखाची गोष्ट!

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

जो हा सुयोधन करी स्वजनावमान ।
चित्रीं स्वविक्रम बघे शिशुच्या समान! ॥

आहे असा कवण मूढमती जगांत ।
जो आत्मदोष उघडे करितो सभांत ? ॥ १८ ॥

चला, घेऊन चला हा चित्रपट इथून.

दुर्योधनः—बादरायणा ! खरंच, घेऊन जा हा चित्रपट इथून.

कांचुकीयः—जशी महाराजांची आज्ञा. [ तो चित्रपट घेऊन जातो. ]

दुर्योधनः—अहो दूत !

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

तो धर्मनंदन, मरुत्सुत भीम तोही ।
तो इंद्रपुत्र मम अर्जुन बंधु पाही ॥
माद्रीतनूज सुविनीत, सभृत्य, सारे—।
आहेत कीं कुशल ? हें मज सांग बा रे ! ॥ १९ ॥

वासुदेवः—गांधारीपुत्राला हें साजेसंच आहे ! होय, होय. कुशल आहेत बरं सगळे ! 'आपल्या राज्याचं आणि शरीराचं आंतून बाहेरून दोन्हीकडून कुशल आहना'-असं विचारून, युधिष्ठिरादि पांडवांची तुला अशी विज्ञापना आहे:—

( आर्या—गीति. )

भोगुनि संपाविलें तें दुःख महा, पूर्ण वचनही केलें, ।
आतां संमत धर्मा दाय-विभागास पाहिजे दिधलें ! ॥ २० ॥

ही अशी विज्ञापना आहे त्यांची.

दुर्योधनः—कसं कसं ? दायविभाग ? दायविभाग ?

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

पितृव्य पांडू मृगयानुरक्त ।
जातां वनीं त्यां मुनिशाप होत !
होतां तयाचा अपराध कांहीं ।
तेणें तया पत्निहि वर्ज्य होई ॥
हे पुत्र होतां इतरांकडून ।
पितृत्व आलें मग त्या कुठून ? ॥ २१ ॥

वासुदेवः—पूर्वेतिहास ठाऊक असणाऱ्यांना माझा असा प्रश्न आहे,—

( साकी वृत्त )

विषयी कुरुपति विचित्रवीर्या होउनि क्षय, तो मेला !
अंबिकेस मग व्यासाकडुनी सुत धृतराष्ट्रचि झाला ॥
या तव जनकातें । नृपपद काय यथार्थचि तें ? ॥ २२ ॥

तेव्हां असं भलतं सलतं बोलूं नये हेंच उत्तम—

श्लोक [ वृत्त—व. वि. ]

ऐसा परस्पर विरोध जरी बळावे, ।
तेणें समग्र कुल शीघ्रचि नाश पावे ! ॥
टाकूनि रोष तरि युक्तचि तें करावें ।
धर्मादि जे कथिति संप्रति शुद्ध भावें ॥ २३ ॥

दुर्योधनः—अहो दूत ! एकून आपण राज्यव्यवहार पुरा जाणत नाहीं असं दिसतं !

श्लोक [ वृत्त—शार्दू. वि. ]

ज्यातें बोलति राज्य तें मिळवुनी त्याचें सुखास्वादन ।
लाभे राजसुतांस घोर समरीं शत्रुप्रती जिंकुन ॥
भिक्षा मागुनि राज्य तें न जगतीं कोणाप्रती लाभतें ।
किंवा आर्जवितां तदर्थ, न कुणीं दीनास देतात तें ॥
कांक्षा राजपदीं जरी तरि झणीं दावोत ते विक्रमा ।
किंवा वांछिति शांतिला तरि सुखें सेवोत वन्याश्रमा ॥२४॥

वासुदेवः—सुयोधना ! बंधुजनां संबंधानं अशी कठोर भाषणं करण्याचं आतां पुरे कर.

श्लोक [ व. ति. ]

जी पुण्यसंचयबलें जगिं लब्ध होई ।
लक्ष्मीहि ती नृपतिची करिं येउनी ही ॥
जो मित्रबंधुस असे फसवीत त्याचे ।
होती जगांत विफलश्रम वंचकाचे ! ॥ २५ ॥

दुर्योधनः— ( आर्या—गीति )

शालक तुझ्या पित्याचा त्या कंसा त्वांहि दाविली न दया ।
मग ती आम्हां कशि ये, संतत अपकारकांस दावाया ? ॥२६॥

वासुदेवः—कंस मेला तो काय माझ्या दोषामुळं ? असं मुळींच समजूं नकोस. कारण—

( आर्या–गीति )

कंसें मज्जननीतें देउनि अत्युग्र पुत्र-शोकातें।
दुःखार्ता तिज केलें वधुनी भाचांस आपुल्या हातें ॥
तैसें बद्धचि केलें नीचें अपुल्याच वृद्ध पितयातें।
कर्मे मृत तो झाला आपण होऊन मृत्युच्या हातें ! ॥ २७ ॥

दुर्योधनः—सर्व परीनं कंसाची तूं वंचना केली आहेस, त्याचा तूं कपटानं घात केला आहेस ! ही आत्मप्रौढी बस्स झाली ! हें कांहीं तुझं शौर्य नव्हे; कारण—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

जामातृ कंस-वधपीडित पूर्ण होतां।
क्रोधेंच मागधपती खवळून जातां ॥
गेलास तूं पळुन भीति धरून चित्तीं।
हें शौर्य, ही धृति, तदा दडली कुठें ती ? ॥ २८ ॥

वासुदेवः—नीतीला धरून वागणाऱ्यांचं शौर्य,-देश, काल, व परिस्थिति यांच्यावर अवलंबून असतं. तेव्हां माझ्यासंबंधानं तूं जी ही कुचेष्टा चालविली आहेस ती आतां पुरे कर. तुझ्या पुढें असलेलं कार्य अगोदर उरकून टाक.

[ आर्या–गीति. ]

जोडुनि बंधु-स्नेहा, स्मरुनि गुणां इतर सर्व विसरावें।
हितकर बंधु-स्नेहचि दोन्ही लोकांत, हे मनिं धरावें ॥ २९ ॥

दुर्योधनः— [ आर्या–गीती. ]

देवसुतांशीं व्हावें मनुजांचें केंवि बंधुचें नातें ? ।
दळिलें दळिशि पुन्हा कां ? जाऊं दे, विषय टाक हा येथें ॥ ३० ॥

वासुदेवः—(आत्मगत) [ आर्या–गीति. ]

सामें प्रसन्न करितां, हा न वळे, सोडिना स्वभावास।
क्षोभविन तरी आतां वदुनी यातें कठोर वचनास ॥ ३१ ॥

( उघड ) अरे सुयोधना ! अर्जुनाचा पराक्रम आणि सामर्थ्य माहित नाहीं कां तुला ?

दुर्योधनः—नाहीं माहीत.

वासुदेवः—नाहीं माहीत ? हंः एक तर--

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

पार्थें तोषविला किरात-शिव तो-युद्धामधें विक्रमें ! ।
खातां खांडव अग्नि, तो हरितसे वृष्टीस बाणोद्यमें ॥
लीलेनें वधि तो निवातकवचां त्या इंद्र-संपीडका ।
एकाकींच लढूनि मत्स्यनगरीं तो जिंकि भीष्मादिकां ॥ ३२ ॥

या शिवाय तूं स्वतः प्रत्यक्ष पाहिलेली आणि अनुभवलेली दुसरी एक गोष्ट तुला सांगतों ती ऐक—

[ आर्या—गीति. ]

गंधर्व तो बद्ध करूनि तूतें ।
नेतां नभीं, ओरडतां तुम्हांतें ॥
ह्या अर्जुनेंची तुज सोडवावें !—।
त्या घोषयात्रेस तुवां स्मरावें ! ॥ ३३ ॥

जास्त बोलून काय फळ ?—

आर्या—[ गीति. ]

राज्यार्धा त्वां द्यावें पाण्डुसुतां मद्वचास आदरुनी ।
ना तरि पांडव घेतिल सकल मही तुजकडूनि ते हरुनी ! ॥३४॥

दुर्योधनः—कसं--कसं—ह्मटलंत ? पांडव माझ्याकडून सगळी मही हरण करून घेणार ?

वासुदेवः—हो, तसंच. आसमुद्र सगळी पृथ्वी !

दुर्योधनः—आसमुद्र पृथ्वी पांडव हरून घेणार !

श्लोक [ वृत्त—स्राग्धरा ]

घेऊनी भीमरूपा पवनहि जरि तो येथ युद्धास आला ।
किंवा त्या पार्थरूपा धरुनि सुरपती संगरा सिद्ध झाला ॥
तातानीं भोगिलें जें, पुनरपि तनयें राखिलें, राज्य वीर्यें ।
नाहीं देणार त्याच्या मधिल तृणहि तें, या तुझ्या दर्पवाक्यें ॥३५॥

वासुदेवः --अरे, कुरुकुलाला कलंक लावूं पाहणाऱ्या. अयशाची जोड करूं पाहणाऱ्या! आम्ही तृणाहून अन्य गोष्टी बोलायला आलों आहों.

दुर्योधनः---अरे, गुराख्या! तोंडांत तृण धरायला लावूनच तुझ्याशीं बोलावें अशी तुझी योग्यता!

( साकी--वृत्त )

अवध्य ऐशा स्त्रीशीं वधिलें, वधिलें वृषभा, अश्वा! ।
मर्दियलें त्यां मल्लांनाही कपटें निर्लज्जा! त्वां ॥
करुनी कृति ऐशी । बोलूं इच्छिशि माझ्यांशीं! ॥ ३६ ॥

वासुदेवः-- सुयोधना! तूं मला टाकून बोलूं लागलास.

दुर्योधनः —तुझ्याशीं बोलावें, इतकीहि तुझी योग्यता नाहीं!

श्लोक. [ वृत्त व. ति. ]

ज्याच्यावरी धवल छत्र सदा विराजे ।
ज्याच्या शिरास अभिषेकिति विप्र-राजे! ॥
ज्याच्या पदीं नृपति-मंडल नम्र होई ।
त्याच्या पुढें न गवळ्याप्रति मान कांहीं! ॥
मंच्याप्रतीच अम्हि भाषणलाभ देतां ।
क्षुद्राप्रती कधि न तो लवलाभ होतो! ॥ ३७ ॥

वासुदेवः- -तर सुयोधन माझ्याशीं बोलूं इच्छित नाहीं! ठीक. अरे!

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप ]

हे शठा! बांधवद्रोह्या! । काका! काण्या! कुमर्कटा!
तुझ्या पायीं तुझ्या वंशा । शीघ्र संहार ठाकला ॥ ३८॥

अहो,—अहो राजलोक हो! आम्हीं येतों तर आतां.

दुर्योधनः- -कसा जाणार इथून केशव आतां? दुःशासना! दुर्मर्षणा! दुर्मुखा! दुर्बुद्धे! दुष्टश्रवा! दूताला योग्य अशा शिष्टाचाराचा अतिक्रम करणाऱ्या ह्या केशवाला एकदम बद्ध करून टाका. काय, असे भेकडासारखे काय पाहतां? काय तुमची सगळी शक्ती गळून गेली? दुःशासना! तुलाहि सामर्थ्य नाहींसं झालें कीं काय?

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

हा कंसांतक, अश्वकुंजर-वधी, हा वाढला गोकुळीं ।
सेवावृत्ति, तसेंच दौत्यहि जया तें ठाउकें ना मुळीं ॥
हा दोषी भकतों वचें, तरि हरा तद्वीर्यदर्पाप्रती ।
ह्यातें शीघ्र करा सुबद्ध सकलां राजांपुढें संप्रती ! ॥ ३९ ॥

काय ! ह्या दुःशासनाचेहि पाय मोडले ! मामा, तुम्हीं करा तर याला चतुर्भुज. ( पाहून ) काय ! ह्यांनींहि तोंड फिरवून माघार घेतली ? ठीक आहे तर. मी स्वतःच आतां ह्याला पाशांनीं जखडून टाकतों ! [ कृष्णाचे जवळ जातो. ]

वासुदेवः—काय ! हा सुयोधन स्वतःच मला बद्ध करण्याची इच्छा करितो ? ठीक आहे तर. मी आतां सुयोधनाचें सामर्थ्य पाहतों. [ विश्वरूप धारण करितो. ]

दुर्योधनः—अरे ए दूता !

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

मायेनें अशि निर्मिशी चहुंकडे तूं देवमाया जरी ।
दिव्यास्त्रीं सहसा जरी करिशि तूं आघात आम्हांवरी ॥
मारूनी वृषभाश्व मत्त करिनां ज्या दर्प आला तुला ।
त्या तूंतें आजि बांधुनी नृपगणीं, देतो पहा शांतिला ॥ ४० ॥

अरे, थांब आतां ! अरे, हा केशव दिसेनासा कसा झाला इतक्यांत ! हा—हा केशव. अहो, ह्या केशवानं हें लहानरूप कसं धारण केलंन ? अरे ! थांब, थांब आतां. काय हा केशव पुन्हां दिसेनासा झाला ? अरे, हा इथं केशव आहे. पण ह्या केशवानं केवढं प्रचंड रूप धारण केलं आहे हें ! अरे ! पुन्हां हा दिसेनासा झाला कीं केशव ! पुन्हां अदृश्य ! हा इथं दृश्य झाला केशव ! या मंत्रशाळेंत इकडे तिकडे-तिकडे इकडे—सगळीकडे केशवच केशव ! आतां पुढं काय करावं ! ठीक, ठीक, असंच ! अहो, राजे हो ! प्रत्येकानं एकेका केशवाला जखडून टाकावं. काय ! हे सारे राजे स्वतःच पाशबद्ध होऊन पडले आहेत ? ठीक, ठीक ! अरे मायाव्या ! ठीक !

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

माझ्या कार्मुक-बाण खोंचुनि तुझ्या अंगाप्रती विंधुनी ।
गात्रें सर्वहि रंगलीं तव शरीरस्थक्षतें स्त्रावुनी ॥
ऐसा पाहुंत पांडु-पुत्र शिबिरा नेतां तुला वाहुनी ।
निश्वासा त्यजुनी सुदीर्घ, बघुं ते त्या रुद्रशा लोचनीं ! ॥ ४१ ॥

( जातो ).

वासुदेवः—ठीक ! तर आतां पांडवाचें कार्य मीच उरकतों. हे सुदर्शना ! चल. तूं प्रगट हो पाहूं.

[ सुदर्शन प्रवेश करतो.

श्लोक [ वृत्त–उपजाति ]

प्रसाद-पूर्णा हरि-वाणि ऐकुनी ।
धांवूनि आलों घन दूर सारुनी ॥
कोणावरी ते कमलाक्ष कोपले ? ।
शीर्षा कुणाच्या अजि ठेंचु मी बलें ? ॥ ४२ ॥

सुदर्शनः—भगवान् नारायण कुठं आहेत बरं ?

श्लोक. [ वृत्त–शा. वि. ]

ज्याचें मूळहि ना कळे जगिं कुणा. कोणा नये चिंतितां ।
लोकांचें करण्यास रक्षण सदा उद्युक्त जो सर्वथा ॥
आहे एक परी धरी अमित जो रूपांप्रती श्रीहरी ।
श्रीमान् तो सकला बलास रिपुच्या स्वेच्छे हरी संहरी ॥४३॥

( पाहून ) अरे, हे भगवान् श्रीकृष्ण हस्तिनापुराच्या वेशींतच दूताच्या पेशानेंच उभे आहेत. अरे, पण इथं पाणी कुठं आहे,—पाणी कुठं आहे ! हो ! हे भगवति, आकाशगंगे ! थोडं पाणी दे. अहाहा ! हा जलस्राव झाला. ( आचमन करून जवळ जाऊन ) भगवान नारायणांचा जयजयकार असो. ( नमस्कार करितो )

वासुदेवः—सुदर्शना ! तुझा पराक्रम सर्वत्र गाजो.

सुदर्शनः—अनुग्रह झाला हा माझ्यावर.

वासुदेवः—मोठी भाग्याची गोष्ट; तुम्हीं ऐन कार्याचे वेळीं आलात.

**सुदर्शन:**—काय ? असं कार्याचे वेळीं म्हटलंत ? तर मग आज्ञा करावी, एकदम आज्ञा करावी देवांनीं—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

शैलां मेरुसुमंदरांस उपटूं कीं हादरूं मत्करें ? ।
टाकूं क्षोभवुनी समुद्र सगळा मंथूनि कीं सत्वरें ? ॥
कीं पाडूं चरणीतलीं सकल ह्यां नक्षत्रमालांप्रती ? ।
देवा ! त्या न अशक्य कांहि जगतीं श्रीची कृपा ज्यास ती ॥४४॥

**वासुदेव:**—हे. सुदर्शना ! इकडे ये पाहूं. अरे. सुयोधना !—

आर्या [ गीति ]

दडशील जरि समुद्रीं किंवा लपशील कंदरीं गिरिच्या ।
काढील पळपुट्या तुज हुडकुनि हें चक्र, मानि वचना या ॥
ग्रहगणगतिनें जा कीं आदरुनी जाइ वायुमार्गानें ।
गांठाया तुज आहे शक्तचि मम चक्र आत्मतेजानें ॥
मम भुजबल-संयोगें चक्रातें मिळुनि वेग थोर हें ।
त्या पुढती पळाशी कुठें ? चक्र नव्हें कालचक्र तव पाहे ! ॥४५॥

**सुदर्शन:**—अरे, कपाळकरंट्या सुयोधना ! ( असं म्हणून पुन्हां विचार करून कृष्णास ) शांत व्हावं. शांत व्हावं भगवान नारायणांनीं.

[ आर्या-गीति ]

भूभार हा हराया त्वां हा अवतार घेतला जगतीं ।
वधितां मी या दुष्टा विफल श्रम खचित हे तुझे होती ॥४६॥

**वासुदेव:** —सुदर्शना ! रागावल्यामुळे, योग्य अशा व्यवहाराकडे मला आपलं लक्ष्य देतां आलं नाहीं. तर आतां तं आपल्या ठिकाणीच परत जा.

**सुदर्शन:**—अशी भगवान नारायणांची आज्ञा. ( आपल्याशीं ) काय ? काय ? त्यानं गोपालक-कुमारवी असं म्हटलंन ! हे तर ज्यांनीं आपल्या तीन पावलांनी तीन लोक आक्रमण केले ते—प्रत्यक्ष भगवान् नारायण आहेत ! ( दुर्योधनास अनुलक्षून ) आपण सर्वांनीं यांना शरण जाणंच युक्त. ( स्वतःशीं ) आतां जावंच तर आपण. ( पाहून ) अरे ! हें तर भगवंतांचं श्रेष्ठ आयुध—शार्ङ्ग प्राप्त झालं आहे इथं.

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

ज्याचें सुंदर अंग, कोमल, कृश, प्रत्यक्ष ये दृष्टितें ।
स्त्रीनां योग्य अशा गुणां वरित हें, त्याहींच कीं वक्र तें ! ।
ज्याचा मध्य हरी धरी निजकरीं शारंग तें पातलें ।
वाटे एकचि काळ हें ! रिपुकुळा मर्दावया निर्मिलें ! ॥
याचा पृष्ठ सुवर्ण-युक्त विलसे, हें कृष्ण पार्श्वीं धरी ।
मेघा आड नव्या जशी चमकते ती वीज, हें त्या परी ! ॥४७॥

( शार्ङ्गास ) अहो ! भगवान् नारायणांचा क्षोभ आतां शांत झाला आहे. तर आतां तुम्हीं स्वस्थानींच जावें. ( पाहून ) अहाहा ! हें परतलें. तर आतां आपणहि जावें. ( पाहून ) अरे ! ही तर कौमोदकी येते आहे इकडेच. ही--

[ छंद दिंडी. ]

कांचनानें मणिगणें चित्र केली ।
चित्र मालांचें उत्तरीय ल्याली ॥
हिला तृष्णा संचूर्ण करायाची ।
देवरिपुंच्या अंगांस रणीं साची ॥
गिरींद्रांच्या तटतुल्य तीव्र होही ।
दुर्निवारा, बहु वीर्य इचें ठाई ॥
मेघवृंदचि परिवार हिचा पाही ।
गगनिं त्यांच्यासह शीघ्र चालली ही ॥ ४८ ॥

अग, हे कौमोदकि ! भगवान नारायणांचा कोप आतां शांत झाला आहे. तर तूं आतां स्वस्थानींच जावेंस. वा: गेलीच कीं ही ! तर आपणहि आतां जावें (पाहून) अरे, आतां हा पांचजन्य आला इकडे. हा--

श्लोक [ वृत्त शा. वि. ]

पूर्णेंदू, नवकुंद, गर्भ अथवा त्या पंकजांचा जसा ।
मुक्ताहार-रुची जशी विलसते, हा गौर आहे तसा ॥
होई ह्यावरती प्रसाद हरिचा; हें स्पष्टची दीसतें ।
कृष्णाच्या वदनांबुजीं पद तया ह्यावीण ना लाभतें ॥ ४९ ॥

याचा नाद असे महा प्रळयिंच्या घोषापरी सिंधुच्या ।
जो ऐकून भयाकुला त्यजिति त्या गर्भास दैत्यस्त्रिया ! ॥ ४९ ॥

हे पांचजन्या ! भगवानांचा कोप आतां शांत झाला आहे. तेव्हां आपण जावें. वाः गेलाच हा ! (पाहून) पण आता हें नंदक खड्ग प्राप्त झालें.

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

याचें शरीर कृश हें वनितां समान ।
दैत्यादिकां गणिं गमे परि हें भयाण ! ॥
उल्का महा तळपते जशि अंबरांत ।
तेवीं त्वरें घुसत नंदक हें नभांत ! ॥ ५० ॥

हे नंदका ! भगवानांचा रोप आतां शांत झाला आहे; तेव्हां तूं आतां परत जावेंस. ओ हो ! हा गेलाच: तर आतां आपणहि जावें. अरे, पण हीं भगवंतांची श्रेष्ठ आयुधें !

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

तो हा "नंदक" खड्ग, जो धरि वपु अत्यंत तजोन्वित ।
वाटे हांसतची असे निज करें त्या तीव्ररश्मीप्रत ॥
दैत्यांचे उर पूर्ण चूर्ण करुनी जी दे प्रमोदास कीं ।
राहे दक्ष सदा स्वकार्यनिरता ती हीच "कौमोदकी" ॥
ज्यातें बोलाते " शार्ङ्ग. " ती सु-सरला कोदंड-रेखातनु ॥
जीचे रज्जु-निनाद त्या प्रळयिंचे मेघध्वनी ते जणुं ! ॥
ज्याचा वर्ण सुशुभ्र चंद्रकरसा, यद्घोष गंभीरसा ।
तो हा श्रेष्ठचि "पांचजन्य" सगळ्या शंखांत सन्मान्यसा !॥५१।

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

हे शार्ङ्ग ! कौमोदकि ! पांचजन्या ! ।
हे नंदका ! दानव-काल, धन्या ! ॥
प्रशांत झाला हरि-कोप सारा ।
जावें तुम्हीं आपुलिया अगारा ॥ ५२ ॥

ओहो ! हे सर्व गेलेच ! तर आतां आपणहि जावें. अरे पण हें काय ! हा वायू किती जोरानें वाहूं लागला आहे ! सूर्याचा तापहि अत्यंत प्रखर होतो आहे; पर्वत हालूं लागले आहेत; सागर खवळून गेले आहेत; झाडें उमळून

पडत आहेत; मेघ फिरूं लागले आहेत; वासुकी आदिकरून मोठमोठे सर्प-श्रेष्ठ अगदीं मलूल होऊन श्रमले आहेत. तेव्हां हें आहे तरी काय ! अरे ! भगवंतांचें वाहन जो गरुडराज, तोच इथं प्राप्त झाला आहे !

[ छंद--दिंडी. ]

देवदैत्यीं मंथूनि अंबुधीतें ।
असे काढियलें दिव्य अमृतातें ॥
परी मातेची मुक्ति करायासी ।
गरुड घे तें झगडून मुरारीशीं । ॥
त्याच समयीं विष्णूस वाहण्याचें ।
अंगिकारी सत्कार्य गरुड वाचें ॥ ५३ ॥

हे कश्यप--प्रिय पुत्रा ! गरुडा ! भगवान् देवदेवेशांचा कोप आतां अगदीं शांत झाला आहे. तर आपण आतां आपल्या ठिकाणीं परत जावं. अरे, हा गेलाच ! तर आपणहि आतां जावं.

( साकी--वृत्त )

शंख, दिव्य धनु, खड्गादिक हे इच्छामात्रें हरिचे ।
येतां धांवत मुगुट शिरींचे डळमळले सकलांचे ॥
रोष पावतां श्रीहरि ज्यांची गेली लोपुनि कांती ।
प्रशांत होतां हरि: ते तोषुनि निज सदनातें जाती ॥५४॥

तर आतां आपणहि मेरुपर्वताच्या सुंदर अशा गुहेकडे निघून जावं.

[ जातो ]

[ पडद्यात ]

" हं हं जाऊं नका, जाऊं नका ! "

**वासुदेवः**—अरे ! हा आवाज वृद्धराजाच्या--त्या धृतराष्ट्राच्या आवाजासारखा दिसतो । (उघड) हे राजा ! हा मी इथं उभा आहे.

[ तदनंतर धृतराष्ट्र प्रवेश करितो. ]

**धृतराष्ट्रः**---कुठं-कुठं आहेत भगवान् नारायण ? पांडवांचे कल्याण करणारे असे ते भगवान् कुठं आहेत ? ते विप्रप्रिय भगवान् कुठं आहेत ? ते देवकीनंदन भगवान् कुठं आहेत ?

( आर्या—गीति. )

मम तनयें जो केला भगवान् कृष्णा ! त्वदीय अपराध ।
त्यास्तवची देवेशा ! तव पद-युगुलीं मदीय शिर बद्ध ॥ ५५ ॥

( पाया पडतो. )

**वासुदेवः**—(आपल्याशी) छेः छेः हे नाहीं बरं ! यांनी खरोखरच पायावर डोकं ठेवलं ! ( उघड ) उठा ! उठा ! महाराज.

**धृतराष्ट्रः**— ही कृपाच झाली माझ्यावर. भगवान ! हे अर्घ्य आणि पाद आणलं आहे. याचा स्वीकार व्हावा.

**वासुदेवः**—सर्व घेता. या शिवाय आणखी काय बरं मी आपलं प्रिय करावं ?

**धृतराष्ट्रः**—भगवान् जर माझ्यावर प्रसन्न आहत तर मी आणखी कशाची इच्छा करुं ?

**वासुदेवः**—ठीक आहे; यावं तर आता आपण. पुन्हां भेट होईलच.

**धृतराष्ट्रः**—जशी भगवान नारायणाची आज्ञा. [ जातो. ]

—भरतवाक्य—

श्लोक [ वृत्त अनुष्टुभ ]

कुंडलें हिमविंध्यांचीं । सागरान्ता अशी मही ॥
एकछत्रान्विता शासो । आमुचा राजसिंह ही ॥

[ सर्व जातात. ]

शुभं भूयात्.

दूतवाक्य समाप्त.

# "मध्यमव्यायोग" नाटकाचें कथासूत्र.

पांडव वनवासांत असल्यावेळचा एक प्रसंग कल्पून त्यावर **भासानें** आपलें नाटक रचिलें आहे. ह्या नाटकाचें कथासूत्र पुढें दिल्याप्रमाणें आहे.

लाक्षागृह-दहना नंतर **हिडिंबासुराचा** वध करून **मध्यम-पांडव भीमसेन** यांनें **कुंतीच्या** आज्ञेवरून **हिडिंबेचा** स्वीकार केला होता. व त्याच्यापासून तिला **घटोत्कच** या नांवाचा एक पुत्रहि झाला होता. यानंतर पांडव तेथून निघून दुसऱ्या वनांत गेले व हिडिंबा आपल्या मुलासह तेथेंच राहिली. **भीमसेनाशीं** विवाह होतेवेळीं 'यापुढें आपण मनुष्याचें मांस खाणार **नाहीं'** असें वचन कुंतीचें प्रिय करण्याकरितां तिनें आपल्यास घालून घेतलें होतें. तिचा आणि **भीमसेनाचा** वियोग होऊन बराच काल लोटल्यावर, पांडव पुन्हा एकदां त्याच वनप्रदेशांत येऊन राहिल्याचें वृत्त तिला समजलें. पण **भीमसेनाची** गांठ पडण्याचा योग येईना; तो योग यावा म्हणून तिनें एक नामी युक्ति योजिली. त्या युक्तीवरच या नाटकाची रचना आहे.

**हिडिंबेनें** आपल्या उपवासाच्या पारण्याकरिता एखादा मनुष्य हुडकून घेऊन ये, अशी आपल्या **घटोत्कच** नांवाच्या मुलाला आज्ञा केली. त्याप्रमाणें **घटोत्कच** त्या वनप्रदेशात आपली शिकार शोधूं लागला. तों त्याला **केशवदास** नांवाचा एक वृद्ध ब्राह्मण आपल्या तीन तरुण पुत्रांसह आणि पत्नीसह त्याच वनांतून **उद्यामक** गांवीं राहणाऱ्या आपल्या मामाकडे मातुलसुताच्या मुंजीकरितां जात असल्याचें आढळलें. **घटोत्कचानें** त्याला हटकलें व आपल्या आईच्या आहाराकरिता त्याच्या तीन कुमारांतून एक कुमार देण्याविषयीं त्याला विनंति केली. तो न दिल्यास सर्व कुटुंबाचा नाश करण्याची त्यास धमकी दिली! **केशवदास** सर्व कुटुंबाच्या रक्षणार्थ आपले प्राण अर्पण करण्यास तयार झाला. तें पाहून त्याची पत्नी आपल्या पतीचे आणि पुत्राचे प्राण वांचविण्याकरितां आपल्या पतीचें निवारण करून आपले स्वतःचे प्राण अर्पण करण्यास सिद्ध झाली. हें पाहून **घटोत्कचानें** 'आपल्या आईस बायका माणूस मुळींच पसंत पडणार नाहीं.'—म्हणून सांगितलें. तेव्हां अर्थातच तिचा निरुपाय झाला. तेव्हां वृद्ध **केशव-**

दासानें त्याच्याबरोबर त्याच्या आईकडे तिचें खाद्य म्हणून जाण्याची आपली तयारी असल्याचें घटोत्कचास सांगितलें. पण तो वृद्ध आहे, ह्या सबबीवर त्यालाहि त्यानें नाकारिलें. हा सर्व प्रकार केशवदासाचे दोघेहि पुत्र पहात उभेच होते. आपले प्राण वांचविण्याकरितां आपली वृद्ध मातापितरें आपले स्वतःचे प्राण देण्यास तयार झाल्याचें पाहून ज्येष्ठ पुत्रास तें रुचलें नाहीं. आपल्या मातापितरांचे आणि लहान बंधूंचे प्राण बचावण्याकरितां तो आपले स्वतःचें प्राणार्पण करण्यास उद्युक्त झाला. पण हें पाहून त्याच्या पाठीवरील त्याचा दुसरा भाऊ–मध्यम–घटोत्कचाबरोबर 'आपल्यास धाडा' म्हणून विनंति करूं लागला. ज्येष्ठाकरितां लहानानें आत्मार्पण करणें हेंच युक्त आहे, असें तो म्हणूं लागला. मधल्या भावाचे हे उद्गार ऐकून कनिष्ठ बंधू म्हणाला, कीं:–"ज्येष्ठ बंधू म्हणजे प्रत्यक्ष बापासारखा; त्याचे प्राण आपले प्राण खर्ची घालून रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे." पण ज्येष्ठ बंधूनें–'असें करणें योग्य नव्हे,' असें म्हणून त्याचें निवारण केलें, व 'हें ज्येष्ठ पुत्राचेंच कर्तव्य आहे,' असें सांगून तो घटोत्कचाबरोबर जावयास सिद्ध झाला. पण ज्येष्ठ पुत्र धर्मकार्याचा अधिकारी म्हणून त्याला धाडण्यास केशवदास काचकुच करूं लागला, व त्याची पत्नी कनिष्ठ पुत्राच्या प्रेमामुळें त्याला जाऊं देण्यास तयार नव्हती. हें पाहून त्या ब्राह्मणाच्या मध्यम पुत्रानें घटोत्कचाबरोबर त्याच्या आईचें खाद्य होण्याकरितां जावयाचें आपखुषीनें पत्करिलें; आणि आपल्या प्राणार्पणामुळें आपल्या मातापित्यांचे आणि बंधूंचे प्राण वाचत आहेत असें पाहून त्याला धन्यताच वाटली. त्याचा हा आत्मयज्ञ पाहून घटोत्कच थक्कच होऊन गेला! मध्यम ब्राह्मण कुमारानें आपल्या आईबापास व वडील भावास शेवटचा नमस्कार केला व धाकट्या बंधूनें नमस्कार करितांच त्याला आशीर्वाद देऊन तो त्या राक्षसाबरोबर जावयास सिद्ध झाला. पण जाण्यापूर्वी त्या वनांतच थोड्याशा अंतरावर असणाऱ्या एका पुष्करिणींतून जलप्राशन करून येण्याची घटोत्कचाजवळ त्यानें परवानगी मागितली व ती त्यानें त्याला दिली. तो पाणी प्यावयास गेला, तों तेथून परत यावयास त्याला थोडा उशीर झाला. आपल्या आईची पारणें फेडण्याची वेळ टळत चालली असें पाहून, घटोत्कच मध्यमाला मोठमोठ्यानें ओरडून हाका मारूं लागला. ह्याच वनप्रदेशाचे एका भागांत

**भीमसेन** व्यायाम करण्यांत चूर होता. **मध्यमाचें** नांव घेऊन मोटमोठ्यानें मारलेल्या हांका ऐकतांच आपल्यासच कोणी सहाय्यार्थ बोलावीत आहे असें समजून घटोत्कचापुढें तो दत्त म्हणून उभा राहिला! त्याला पाहून **घटोत्कच** अत्यंत आश्चर्यचकित झाला व त्यानें भीमसेनास विचारिलें:— "आपणहि मध्यमच काय?" त्यावर **भीमसेन** म्हणाला:—"मग दुसरा मध्यम कोण असणार?" भीमसेनाचे हे शब्द ऐकून **घटोत्कच** मोठ्या बुचकळ्यांत पडला. इतक्यांत **केशवदास** ब्राह्मणाचा **मध्यम कुमार** जलप्राशन करून घटोत्कचाकडे परत आला. त्याचें व **घटोत्कचाचें** कांहीं संभाषण होत असतां इकडे वृद्ध **केशवदास भीमसेना**जवळ गेला व त्यानें त्याला ब्राह्मणकुलाचें रक्षण करण्याविषयीं विनंति केली. **भीमसेनाला** त्या ब्राह्मणाकडून त्याचेवर ओढवलेल्या संकटाचें खरें स्वरूप कळतांच, त्यानें त्या ब्राह्मणास त्याचें रक्षण करण्याचें आश्वासन देऊन, **घटोत्कचासा** त्या ब्राह्मण--कुटुंबास सोडून देण्यास सांगितलें. पण घटोत्कचानें तसें करण्याचें नाकारलें मातराज्ञेचा भंग न व्हावा एवढ्याचकरितां आपणांस तशी मुक्तता करितां येत नाहीं, असें घटोत्कचाचे सांगण्यांत आलें. त्यावरून **भीमसेनास** त्याच्या मातृ-भक्तीबद्दल आश्चर्य वाटलें व त्यानें त्याला त्याच्या आईचें नांव विचारिलें. त्याच्या आईचें नांव **हिडिंबा** असल्याचें त्यास कळतांच **भीम** अत्यंत आश्चर्यचकित झाला! त्याला कळून चुकलें कीं, तो आपलाच पुत्र **घटोत्कच** आहे. भीमसेनानें ब्राह्मणाची मुक्तता करण्याविषयीं **घटोत्कचास** पुन्हां एकदां सांगितलें. **घटोत्कचानें** तसें करण्याचें साफ नाकारिलें. त्यावर भीमसेनानें त्या विप्रश्रेष्ठाला आपल्या बायकोमुलांना घेऊन तेथून जावयास सांगितलें. पण आपल्याकरितां एक क्षत्रिय आपले प्राण धोक्यांत घालीत आहे. ही गोष्ट त्या **मध्यम** ब्राह्मण--कुमाराला रुचली नाहीं म्हणून तो भीमसेनाचें निवारण करूं लागला. पण भीमसेनास हें कसें रुचणार? त्यानें घटोत्कचाला त्याच्या आईकडे त्या ब्राह्मण बटूच्या बद्दल आपणांसच घेऊन जाण्यास सांगितलें. व **घटोत्कचाला** विनोदानें आपला पुत्र असें म्हटलें; ही गोष्ट घटोत्कचास खपली नाहीं. त्यानें भीमसेनाला आपलें शस्त्र उचलण्यास सांगितलें. भीमानें शस्त्राऐवजीं आपले बाहूच पुढे केले. **घटोत्कचास** वाटलें कीं **भीमसेन** आपल्या पित्याचा धिःकार करीत

आहे! हें त्याला खपलें नाहीं. त्यानें भीमसेनावर वृक्ष फेंकिले, गिरिशृंगें फेंकिलीं; पण त्या दोहोंचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. म्हणून तो त्याच्याशी द्वंद्वयुद्धास तयार झाला. पण त्यांतहि त्याला हारच खावी लागली. शेवटीं हिडिंबे कडून प्राप्त झालेल्या " मायापाशानें " त्यानें भीमास बद्ध केलें. पण भीमानें त्यांतूनहि आपली मुक्तता करून घेतली. तें पाहून घटोत्कचास-भीमसेनाला आपल्या आईच्या सन्निध येण्याविषयीं प्रार्थना करण्या शिवाय-दुसरा मार्गच उरला नाहीं. पूर्वी वचन दिल्या प्रमाणें भीमसेन त्याचे बरोबर गेला. तेथें जातांच हिडिंबेनें भीमसेनास ओळखिलें. व तिनें घटोत्कचाला भीमसेनाच्या चरणीं लीन होण्यास सांगितलें. अशा अद्भुत रीतीनें भीमसेनाचें व हिडिंबेचें पुनर्मीलन झालें व घटोत्कचाला पितृदर्शन घडलें. आपल्याला वनांत गांठणारा भीमसेनपुत्र घटोत्कच आहे हें पाहून वृद्ध केशवदास ब्राह्मणाला फार आश्चर्य वाटलें. भीमसेनाचें आज्ञे वरून घटोत्कचानें त्या वृद्ध ब्राह्मणाला वंदन केलें. त्यानींहि त्याला आशीर्वाद दिला, व ते सहकुटुंब जावयास निघाले. भीमसेनहि आपल्या पत्नी पुत्रासह त्या ब्राह्मणाला मोठ्या आदरसत्कारपूर्वक द्वारापर्यंत पोंचविण्याकरितां निघून गेला. असें ह्या नाटकाचें कथासूत्र आहे.

---

# नाटकाच्या नांवाचा खुलासा.

मध्यमव्यायोगः— भासानें ह्या नाटकाला हें नांव कोणत्या हेतूनें दिलें असावें, असा सकृद्दर्शनींच प्रश्न येतो. दृश्य काव्याचे जे दहा प्रकार आहेत त्यांपैकीं एका प्रकाराचें नांव व्यायोग असें आहे. तेव्हां जें दृश्य काव्य ( नाटक ) मध्यमाला अनुलक्षून लिहिलें आहे तें 'मध्यम व्यायोग' होय. यांतील मध्यम ह्मणजे मध्यम—कौंतेय—भीमसेन हा होय. पण ह्या नाटकांत कवीनें दोन मध्यम—घटोत्कचानें हांक मारतांच—मोठ्या कौशल्यानें एकीकडे आणून चमत्कृति उत्पन्न केली आहे. हे दोन मध्यम ह्मणजे एक भीमसेन—ह्मणजे मध्यम पांडव, आणि दुसरा मध्यम ह्मणजे वृद्ध केशवदास ब्राह्मणाचा द्वितीय कुमार. तेव्हां ह्या चमत्कृतिजनक प्रसंगाकडे लक्ष दिलें असतां, 'मध्यमव्यायोग' ह्याचा दोन मध्यम ज्यांत एकत्र आणले जातात अशी नाट्य—कृति ( मध्यमौ व्यायुज्येते यस्मिन् ) असाहि अर्थ करणे अउचित होणार नाहीं. व्यायोग शद्बांतील धातू युज् हा आहे. याला वि+आ हे उपसर्ग लागून हा शब्द झाला आहे. तेव्हां ह्या शब्दाचा अर्थ विशेष घटनेनें घडून आलेला संयोग अथवा मीलन असा होतो. तेव्हां हें नांव कवीनें केवळ नाट्य—प्रकाराकडे लक्ष देऊन दिलें असावें असें वाटत नाहीं. त्याचा कटाक्ष मध्यमांच्या संयोगाच्या विशेष घटनेकडेच असावा, असा आमचा तर्क आहे.

---

# व्यायोग.

काव्याचे दोन विभाग केले आहेत. एक श्राव्य, आणि दुसरा दृश्य. दृश्य काव्यास संस्कृतमध्यें रूपक अशी संज्ञा आहे. या रूपकासच आपण आजकाल नाटक असें ह्मणतों. ह्या रूपकाचें १ नाटक, २ प्रकरण, ३ भाण, ४ प्रहसन, ५ डिम, ६ समवकार, ७ ईहामृग, ८ उत्सृष्टिकांक, ९ व्यायोग, आणि १० वीथी असे दहा प्रकार आहेत.

"नाट्यशास्त्र"-कार भरत मुनि, "काव्यानुशासन"कार वाग्भट, हेमचंद्र, 'दशरूप'-कार धनंजय, 'साहित्यदर्पण'-कार विश्वनाथ, एच् एच् विल्सन इत्यादि अधिकारी पुरुषांनीं वरील रूपकाच्या प्रत्येक प्रकाराच्या व्याख्या करितांना, त्यांनीं व्यायोगाचीहि व्याख्या केली आहे. सर्व जणांनीं केलेल्या व्याख्येचें प्रधान स्वरूप अर्थात् एकच. तें आह्मीं आमच्या वाचकांच्या माहितीकरितां येथें देतों. ह्मणजे त्यांना नाटकाच्या ह्या व्यायोग प्रकाराची बरोबर कल्पना येईल.

१ व्यायोगामधील नायक लोकविश्रुत व सर्वांस परिचित असा असावा.

२ यांत स्त्री पात्रें अगदींच थोडीं असावींत.

३ यांत पुरुष पात्रें पुष्कळशीं असावींत.

४ यांत युद्धाचे व द्वंद्वाचे प्रसंग असावेत. ( पण हे एखाद्या स्त्रीविषयक प्रेमामुळें उत्पन्न झालेले असूं नयेत. )

५ यांत एकच अंक असावा.

६ यांत नाटकाकरितां घेतलेल्या कथाभागाचा प्रसंग एकाच दिवसांत घडणारा असावा.

---

व्यायोगासंबधानें घातलेल्या मर्यादा मध्यमव्यायोगासंबंधानें कितपत पाळल्या गेल्या आहेत हें वाचकांस ताडतां यावें, एवढ्याचकरितां हा खटाटोप आहे. हा सफल होईल अशी आशा आहे.

# "मध्यमव्यायोग" नाटकांतील पात्रें,

केशवदास—यूपग्रामाचा एक वृद्ध ब्राह्मण.

| | | |
|---|---|---|
| प्रथम... — | वृद्ध केशवदासाचा | ज्येष्ठ पुत्र |
| द्वितीय(मध्यम) | ,, ,, ,, ,, | मध्यम पुत्र |
| तृतीय...— | ,, ,, ,, ,, | कनिष्ठ पुत्र |

भीमसेन.—पांडुराजाचा पुत्र. ( कुंतीच्या तीन पुत्रांतील मध्यम.)

घटोत्कच—भीमाचा पुत्र. ( राक्षस. )

ब्राह्मणी..—केशवदासाची पत्नी.

हिडिंबा..—भीमसेनाची पत्नी ( राक्षसी. )

सूत्रधार.

श्रीरामचंद्र प्रसन्न.

# मध्यम व्यायोग.

[ नंतर सूत्रधार प्रवेश करितो. ]

सूत्रधारः—

श्लोक [ वृत्त–शार्दूल वि. ]

रक्षो, तो हरि–पाद, जो धरितसे त्या नीलिमा कांतितें ॥
जी खड्गीं विमलीं, तशी कुवलयीं, लोकीं सदा नांदते ॥
ज्यातें देखुनि दैत्यपत्नि खचुनी जाती हृदभ्यंतरीं ॥
तो लोकत्रय–रत्न जैं उचलितो पादाग्रतीं अंबरीं–॥
तेव्हां अंबर–सागरावरि दिसे तो दिव्य सेतूपरी ॥
रक्षो, तो हरिपाद संप्रति अम्हां, पावोनिया श्रीहरी. ॥ १ ॥

आर्यमिश्रांना माझी अशी विनंति आहे कीं,– ( कांहीं ऐकलेसें करून) अरे, पण मी विनंति करणार इतक्यांत इथं कोणी बोलत असल्याचें ऐकूं येतें ! हॉं ! समजलं !

[ पडद्यांत ]

( " अहा, बाबा, बाबा ! कोण आहे बरं हा ? " )

सूत्रधारः—अस्सं ! आलं ध्यानांत.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप ]

"अहो" शब्देंचि या याच्या । हा ब्राह्मणाचि निश्चित ॥
निःशंक कोणि दुष्टात्मा । करी या त्रस्त, पीडित ॥ २ ॥

[ पडद्यांत ]

( अहो, बाबा, बाबा ! कोण आहे बरं हा ? )

सूत्रधारः—हं ! आत्तां बरोब्बर आलं लक्षांत ! मध्यम पांडवानें हिडिंबा अरणीच्या ठिकाणीं उत्पन्न केलेला हा राक्षसाग्नि–हा घटोत्कच–ज्याला वैर काय तें माहित नाहीं अशा या ब्राह्मणाला सतावित आहे. अरे रे, हा ब्राह्मण तर आपल्या बायकामुलांसह फारच पेंचांत सांपडला आहे म्हणायचा ! कारण हा–

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

वृद्ध ब्राह्मण भागल्या तरुणशा पुत्रत्रयें वेष्टिला ॥
येई पत्निसवें, निशाचर असे या मागुती लागला ॥
मागें लागुन वाघ तो वृषभ त्या धेनूसवें पांगतो ॥
भीतिग्रस्ताचि वासरांसह, तसा हाही पहा धांवतो ॥ ३ ॥

[ निघून जातो. ]

स्थापना संपली.

---

[या नंतर तीन पुत्र व पत्नी ह्यांनीं परिवेष्टित असा केशवदास ब्राह्मण, व त्याच्या मागोमाग घटोत्कच असे प्रवेश करितात. ]

**वृद्ध केशवदासः**—अरे ! हा कोण,—आहे तरी कोण हा ?—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

अस्ताव्यस्त यदीय केश रुळती बालार्क अंशू जसे ।
ज्याचे पिंगल दीर्घ नेत्र जळती भ्रूंच्या पुटीं उग्रसे ॥
कंठीं हार धरी तयें गमतसे हा मेघ विद्युद्धर ।
वाटे काय युगांतक प्रगटला तो शंभु पृथ्वीवर ॥ ४ ॥

**ज्येष्ठ पुत्रः**—अहो, बाबा ! हा कोण आहे बरं ?

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

ज्याचा वक्ष विशाल, पुष्ट, नयनें तारांपरी शोभत ।
स्वर्णाचे सम केस पिंगट, तनू पीतांबरें वेष्टित ॥
वर्णे गाढ तमापरी, पुढति ये ती शुभ्र दंष्ट्रा तशी ।
जैसा मेघ नवा, जयांत दडली ती चंद्र-लेखा जशी ॥ ५ ॥

**मध्यम पुत्रः**—अहो, कोण आहे हा ?

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा. ]

दंष्ट्रा ज्याची असे ही गजपति-शिशुच्या शुभ्र दंता समान ।
बाहू ज्याचे विशाल द्विरदपतिचिया शुंड-दंड-प्रमाण ॥
अंगाची नील कांती जलद सम गमे; ही हलाकार नासा !
तेजस्वी दीप्तिनें हा गमत अनलची आहुति व्याप्त जैसा !

**वाटे हा शंकराचा त्रिपुरदहनिंचा क्रोध कीं मूर्त काय !**
**राहे येथें उभा जो, कवण असत हा काळसा भीम-काय!॥६॥**

**कनिष्ठ पुत्रः**—बाबा, अहो बाबा ! आम्हांला असा घाबरवून टाकणारा हा कोण आहे बरं ?

**श्लोक** [ वृत्त—अनुष्टुप. ]

**वज्रपात गिरींद्राचा । सर्व पक्ष्यांत श्येन हा ॥**
**सिंह हा मृग-संघाचा । कीं मृत्यू नररूपि हा ? ॥७॥**

**ब्राह्मणीः**—आर्य ! आम्हांला असा भेडावून सोडणारा कोण बरं हा ?

**घटोत्कचः**—अरे, ए ब्राह्मणा ! थांब, थांब. पळतोस कां असा ?

**श्लोक** [ वृत्त—शा. वि. ]

**कां जाशी धृति विक्रमा त्यजुनिया भीतीमुळें माझिया ?**
**कां होशी अजि हीनशक्ति, सभया दारासुतां रक्षण्या ? ॥**
**सर्पाचा गरुडाग्र-पक्ष-पवनें हा क्रोध उद्दीपित ।**
**तो जाई बहु आर्त होउनि जसा सर्पीसवें धांवत ! ॥ ८ ॥**

ए ब्राह्मणा ! नको, नको; पळून नको जाऊंस असा.

**वृद्ध केशवः**—( स्त्रीस ) अगं, भिऊं नकोस. ( मुलांस ) मुलांनों! भिऊं नका. भिण्याचं कारण नाहीं. कारण ह्याचं बोलणं विवेकाला धरून असल्याचं दिसतं आहे.

**घटोत्कचः**—अरे ! हाय, हाय !

**श्लोक** [ वृत्त—व. ति. ]

**हे श्रेष्ठ ब्राह्मण सदा सकलांस पूज्य ।**
**मी जाणतों वसुमतींत कुठेंहि वंद्य ॥**
**आहे अकार्य जरि हें, त्यजुनि कुशंका ।**
**कर्तव्य होइ जगीं मातृ-नियोग लेंका ! ॥ ९ ॥**

**वृद्ध केशवः**—अगं, त्या **जलक्लिन्न** मुनींनीं काय सांगितलं होतं बरं आपल्याला—कीं, या जंगलांतले सगळे राक्षस कांहीं अजून नाहींसे झाले नाहींत, तेव्हां इथून जरा जपून जा म्हणून; आठवतं कां तुला ? तेंच संकट ओढवलं आहे सध्यां.

**ब्राम्हणीः**—पण इकडचा आवाज असा खोल-खोल कां बरं गेला आहे ? शब्द देखील नीट पुरतेपणीं उमटत नाहींत.

**वृद्ध केशवः**—याला हा अभागी काय करणार ?

**ब्राम्हणीः**—पण मी म्हणतें–आपण खूप मोठ्यानं ओरडलों तर ?

**ज्येष्ठ पुत्रः**—देवि, कोणाचं नांव घेऊन ओरडायचं ?

आर्या [ वृत्त-पृथ्वा. ]

**दिसे विपिन शून्य हें ! विविध वृक्ष नानाकृती–।**
**इथें तिमिर-राशिनीं दशदिशांप्रता रोधिती ॥**
**यदंतरिं पशू तसे अमित पाक्षि ही राहती ।**
**निवास करण्या दिसे उचित हें तपस्व्यां प्रती ॥ १० ॥**

**वृद्ध केशवः**—अग ए, भिऊं नकोस, भिऊं नकोस. हें वन तपस्व्यांना राहण्यालाच योग्य आहे, हें ऐकून माझी भीति पार नाहींशी झाली आहे. माझा असा तर्क आहे कीं, पांडवांचा आश्रम इथं जवळच कुठं तरी असला पाहिजे. आणि हे पांडव तरः--

आर्या [ गीति. ]

**दीनांचे कैवारी, युद्धप्रिय, अमित साहसें यांचीं, ।**
**शरणागतास वत्सल होत सदा क्षात्रवृत्ति वीरांची ॥**
**ज्यांच्या आकृति, चेष्टा, कर्में ही भयद, उग्र, या परिचीं ।**
**अपराधा योग्य असें दंडाया त्या समर्थ जगिं हेची ॥ ११ ॥**

**ज्येष्ठ पुत्रः**—बाबा ! रुष्यां ह्या आश्रमांत पांडव नाहींत असं वाटतं.

**वृद्ध केशवः**—कशावरून म्हणतोस तूं ?

**ज्येष्ठ पुत्रः**—त्या आश्रमाकडून आलेला एक ब्राह्मण सांगत होता कीं, ते धौम्यमहर्षींच्यीं आश्रमाला ‘ शतकुंभ ’ नांवाचा यज्ञ प्रत्यक्ष पहावा म्हणून गेले आहेत.

**वृद्ध केशवदासः**—हाय ! हाय ! तर मग आतां आपण मेलेल्यांतच जमा म्हणायचे !

**ज्येष्ठ पुत्रः**— बाबा ! ते कांहीं सगळेच नाहीं गेले. आश्रमाच्या संरक्षणाकरितां ते मध्यम पांडवाला इथं ठेऊन गेल्याचं ऐकतों.

**वृद्ध केशवः**—असं असेल तर मग सगळेच पांडव जवळ आहेत असं

समजायलाहि कांहीं हरकत नाहीं.

**ज्येष्ठ पुत्रः**—पण तो देखील या वेळीं व्यायाम करण्याकरितां थोड्या दूरच्या भागांत गेल्याचं समजतं.

**वृद्ध केशवः**—हाय ! हाय ! असं असेल तर आतां कांहीं आशाच राहिली नाहीं म्हणायची ! जाऊं दे- आतां आपण यालाच विनंति करून पाहूं या.

**ज्येष्ठ पुत्रः**—छेः छेः भलतेच परिश्रम घेण्यांत अर्थ नाहीं.

**वृद्ध केशवः**—तें दिसतच आहे. पण विनंति करून पहायला आपलं काय वेंचतं ? पाहूं या तर खरं कसं काय होतं तें. ( घटोत्कचास ) हे पुरुषा ! यांतून मुक्तता होईल का आमची ?

**घटोत्कचः**—मुक्तता योग्य वेळीं होईल.

**वृद्ध केशवः**—योग्य वेळ ती कोणती ?

**घटोत्कचः**—" उपवासाच्या पारण्याकरितां ह्या वनांतून एखादा मनुष्य हुडकून घेऊन ये, " म्हणून माझ्या आईची मला आज्ञा झाली आहे. म्हणून मी आपल्याला गांठलं आहे.

**श्लोक** [ वृत्त—उपजाति. ]

**स्वकामिनीच्या तनयद्वयाच्या ।**<br>**मोक्षा जरि इच्छिसि तूं स्वतःच्या ॥**<br>**बलाबलाचा करुनी विचार ।**<br>**देई मला एक तुझा कुमार ॥ १२ ॥**

**वृद्ध केशवः**—हं ! हे दुरात्म्या राक्षसा !—

[ **आर्या** गीति. ]

**शील गुणान्वित पुत्रा देउनि नरभक्षका अशा असुरा ।**<br>**मोक्ष-प्राप्ति कशी रे, होइल या वृद्ध वेदरत पितरा ? ॥ १३ ॥**

**घटोत्कचः**—हे विप्रश्रेष्ठा !

**आर्या** [ गीति. ]

**देशी न याचितां जरि एकाही आपुल्या कुमारास ।**<br>**तरि सर्व कुटुंबासह एका क्षणिं पावशील नाशास ! ॥ १४ ॥**

**वृद्ध केशवदासः**—माझा तर हा ठाम निश्चय आहेः—

आर्या [ गीति. ]

ज्याचें कार्यहि सरलें, जें वृद्धत्वें शरीर जर्जर हो ।
पुत्रार्थी विधिसंस्कृत होमिन तें राक्षसाग्निमाजिं अहो ! ॥१५॥

ब्राम्हणीः—छेः छेः भलतंच. हें असं नाहीं उपयोगी. पातिव्रता म्हटली म्हणजे तिला पती शिवाय दुसरा धर्म नाहीं. ह्या जन्मीं मला जें कांहीं फल मिळायचं होतं तें मिळून चुकलं आहे, आतां हा देह वेंचून आर्यांचं आणि कुलाचं रक्षण करावं अशी माझी इच्छा आहे.

घटोत्कचः—माझ्या आईला बायको मागून मुळींच पसंत पडणार नाहीं.

वृद्ध केशवदासः—मी येतों तुमच्या पावलावर पाऊल टाकून.

घटो०:—छेः, तूं वृद्ध आहेस, तूं दूर हो.

ज्येष्ठ०:—अहो, बाबा ! माझं थोडं म्हणणं ऐकून घेतां कां ?

वृद्ध केशव०:—बोल, बोल बाबा. काय आहे तुझं म्हणणं ?

ज्येष्ठपुत्र०:—

श्लोक ( वृत्त—इंद्रवज्रा )

अर्पूनि मत्प्राण गुरूजनातें—।
रक्षावया, तेंविच मत्कुलातें ॥
मी इच्छितों, द्या तरि राक्षसातें ।
प्रेमें स्वहस्तें अपुल्या सुतातें ॥ १६ ॥

मध्यम पुत्रः—छेः छेः आर्या ! हें नाहीं बरं.

श्लोक [ वृ. उपजाति. ]

कुलांत लोकांत असो कुठें ही । जो ज्येष्ठ त्या श्रेष्ठचि मान पाही ॥
सर्वांत होई प्रिय तो गुरूतें । आज्ञा तरी द्या मज जावयातें ॥
ज्येष्ठास सत्कारिति या जगांत । राहो स्मृती हे तव मानसांत ॥
हे ध्यानिं आणून मला द्वितीया। धाडा तुम्हीं, हें पदिं याचितों या॥१७॥

कनिष्ठ पुत्रः—( दोघांस ) छेः छेः असं मुळींच नाहीं उपयोगी.

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

ज्येष्ठ बंधू ताततुल्य । मुनीनीं कथिलें असे ॥
तातांचे रक्षणें प्राण । माझें कर्तव्य हें असे ॥ १८ ॥

**ज्येष्ठ पुत्रः**—छेः छे; बाळ ! हें योग्य नव्हे.

**श्लोक** [ वृत्त—अनु० ]

**संकटीं पडतां तात । ज्येष्ठेंची त्यांस तारणें ॥**
**तेव्हां कर्तव्य माझें कीं । गुरूंचे प्राण रक्षणें ॥ १९ ॥**

**वृद्ध केशव०ः**—धर्मकार्याचा अधिकारी म्हणून ज्येष्ठ पुत्रच सर्वांत इष्ट. त्याला जा म्हणून माझ्या हातून कसं बरं सांगवेल ?

**ब्राम्हणीः**—इकडे जसा ज्येष्ठ प्रिय वाटतो तसा मला कनिष्ठ प्रिय वाटतो.

**मध्यम पुत्रः**—मातापितरांना जो प्रिय वाटत नाहीं, तो कुणाला प्रिय असणार ?

**घटोत्कचः**—मला—मला प्रिय आहेस तूं. चल, लवकर चल तर.

( **साकी** )

**मध्यम पुत्रः**—

**धन्य, धन्य ! मी ! प्राणें माझ्या वांचति जनक—प्राण ॥**
**निज बंधूंच्या गाढ स्नेहाहुनि ही दुर्लभ जाण—॥**
**कालस्नेह असे—। लाभत जो मज भाग्यवशें ॥ २० ॥**

**घटोत्कचः**—अहाहा ! ह्या ब्राह्मण—भट्टचें आपल्या आप्तजनांवर केवढं हें प्रेम !

**मध्यम पुत्रः**—बाबा ! हा मी आपल्याला नमस्कार करतों.

**वृद्ध केशवः**—ये, ये बाळ ; ये असा.

**आर्या** [ गीति ]

**प्राणा स्वकीय अर्पुनि रक्षिसि गुरुवत्सला ! गुरुप्राण ॥**
**दुष्प्राप्य अप्रबुद्धां तो लाभो ब्रह्मलोक तुज जाण ॥ २१ ॥**

**मध्यम पुत्रः**—हा माझ्यावर अनुग्रह झाला. आई ! मी तुला नमस्कार करितों

**ब्राम्हणीः**— पुत्रा ! दीर्घायू हो.

**मध्यम पुत्रः**—हाहि अनुग्रहच. ( ज्येष्ठ बंधूस ) दादा ! तुलाहि मी नमस्कार करतों.

**ज्येष्ठ पुत्रः**—ये, ये बाळ.

**श्लोक**– [ इं. वज्रा. ]

**आलिंगिलें ज्यास शुभा गुणांहीं।**
**तो तूं मला दे परिरंभ पाहीं॥**
**कीर्ती तुझी सर्व वसुंधरेंत।**
**जाईल बाळा ! भरुनी नितांत॥ २२ ॥**

**म० पुत्रः**—तुझाहि हा अनुग्रहच आहे माझ्यावर.

**कनिष्ठ पुत्रः**—( मध्यम पुत्रास ) भाऊ ! मी तुला नमस्कार करितों.

**म० पुत्रः**—कल्याण असो.

**क० पुत्रः**—अनुग्रह झाला माझ्यावर.

**म० पुत्रः**—( घटोत्कचास ) हे पुरुषा ! तुला कांहीं विचारायचं आहे, विचारूं का ?

**घटोत्कचः**—बोल, बोल. विचार काय विचारायचं आहे तें झटपट.

**म० पुत्रः**—हें पहा, ह्या अरण्याच्या मध्यभागीं एक जलाशय असल्या-सारखंच आहे, तिथं जाऊन मी आपली तहान भागवून घ्यावी म्हणतों. परलोकाला जायचं तर ठरून चुकलंच आहे !

**घटो०**:—हे करारी-निश्चयी पुरुषा ! जा जा. पण लौकर ये. कारण माझ्या आईच्या आहाराची वेळ टळत चालली आहे.

**म० पुत्रः**—( पित्यास ) बाबा ! येतों तर मी आतां. [जातो.]

**वृद्ध केशवः**—हाय ! हाय ! आम्हीं सर्वस्वीं नागवलें गेलों ! नागवलें गेलों !

( साकी वृत्त. )

**शृंगत्रितयें रम्य असा मम वंश–गिरी जो होता।**
**मध्यमशृंगचि–भंगुनि त्याचें देइ ताप तो आतां॥ २३ ॥**

हाय, हाय ! पुत्रा, एकून गेलासच तर !

**श्लोक** [ वृत्त–शा. वि. ]

**तारुण्या अनुरूप कांति विलसे, बाळा ! तुझी सुंदर।**
**नेमें चालविशी व्रता, तव मती अभ्यासिं राहे स्थिर॥**

दंतें हस्तिचिया सुपुष्पित तरू व्हावा जसा भग्न तो ।
तेंवी आज तुझा विनाश सहसा माझ्या मना भासतो ! ॥ २४ ॥

**घटोत्कच**:—अरेच्या, हा ब्राह्मण बटू किती तरी उशीर लावीत आहे यायला ! अशानं आईच्या आहाराची वेळ निघून जायची. काय बरं करावा आतां याला उपाय ? हो, असंच करावं ! ( उघड ) अरे ए ब्राह्मणा ! आपल्या पुत्राला बोलाव पाहूं.

**वृद्ध केशव**:—हें तुझं भाषण राक्षसालाहि न शोभणारं असं आहे.

**घटोत्कच**:—काय, रागावलांत कीं काय आपण ? क्षमा करा, क्षमा करा, महाराज ! हा माझ्या स्वभावांतच दोष आहे. बरं, पण आपल्या पुत्राचं नांव तरी काय ?

**वृद्ध केशव**:—तें माझ्याकडून कळणं शक्य नाहीं.

**घटोत्कच**:—हेंहि बरोबरच आहे म्हणायचं. ( ज्येष्ठ पुत्राकडे वळून ) हे ब्राह्मण कुमारा, तुझ्या भावाचं नांव काय ?

**ज्येष्ठ पुत्र**:—गरीब बिचारा **मध्यम** !

**घटोत्कच**:—हो, मध्यम हें नांव त्याला साजेसंच आहे. आतां आपणच जावं त्याला बोलवायला झालं. (मोठ्यानें ओरडून) अरे, ए **मध्यम ! मध्यम !** लौकर ये, लौकऽऽऽर.

[ इतक्यांत भीमसेन प्रवेश करितो. ]

**भीमसेन**:—अरे, हा कोणाचा आवाज ?

**श्लोक** [ वृत्त—व. ति. ]

जें कोंदलें विहग—वृंद—रवें नितांत ।
त्या ह्या द्रुमें निबिड दुर्गम काननांत ॥
हा स्पर्शितो स्वर अहा हृदया मदीय ॥
हा भासतो मज धनंजय शब्द—तुल्य ॥ २५ ॥

**घटोत्कच**:—खरोखर ह्या ब्राह्मण बटूनं फारच उशीर केला कीं ! आईच्या आहाराची वेळ निघून जात आहे. आतां याला काय उपाय ? ठीक, असंच ! आतां मोठ्यानं हाक मारतो याला. अरे ए **मध्यऽऽम** ! लौकर ये लौकऽऽऽर.

**भीमसेनः**—ह्या वनांत माझ्या व्यायामाला विघ्न करणारा हा कोण बरं ? हा **मध्यम ! मध्यम !** म्हणून माझं नांव घेऊन मलाच हांका मारीत आहे. ठीक आहे, पाहूं याच तर मग. (फिरून इकडे तिकडे पाहून) अरे, हा तर मोठा दर्शनीय—सुंदर—पुरुष दिसतो.

साकी ( वृत्त )

ह्याचें आनन, दंष्ट्रा तैशा, सिंहा परि दिसतात ।
कंठ भव्य, मृदु; लोचन पिंगट, मधु-कांतिस वरितात ॥
भिवया पिंगट, श्येननासिके समान याचें नाक ।
नागेंद्राच्या हनू सारखी हनुवटि धरिते बांक ॥
लांब सडक हे स्रस्त केश बहु, विशाल छाती याची ।
वज्रतुल्य कटि, गति ही तैशी थेट गजश्रेष्ठाची ।
स्कंध बाहु हे सुदीर्घ, पुष्टचि, दाविति विपुल बलातें ।
राक्षसीज हा, नरवीराचा सुत हें निश्चित होतें ॥ २६ ॥

**घटोत्कचः**—ह्या ब्राह्मण बटूनं फारच उशीर लावला आहे. आईच्या आहारकालाचा तर अतिक्रम होत चालला आहे. काय—करावं काय आतां ? असंच ! ह्याला मोठ्यानं हाक मारतों. (मोठ्यानं) अरे एऽऽऽ मध्यमऽऽऽ ! लौकर येरेऽऽ !

**भीमसेनः**—( पुढें येऊन ) अरे, हा पहा, आलोंच मी.

**घटोत्कचः**—(आपल्याशीं)छेः हा कांहीं ब्राह्मण बटू खास नव्हे. अहाहा ! हा पुरुष किती सुंदर आहे !

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

ह्याचे बाहु विशाल तालसम हे, कांती सुवर्णापरी ।
खांदे-विस्तृत, वीर्यशालि, गरुडाच्या दीर्घ-पत्रापरी ॥
सिंहाच्याच समान हा कृशकटी, प्रत्यक्ष सिंहाकृती ।
भासे विष्णुच, आयताक्षि धरि जो ती फुल्ल-पद्म द्युति ॥
ओढी हा नयनां मदीय, गमतो हा आप्त कोणीतरी ।
यातें देखुनि शुद्ध भाव उठती; प्रेमा भरे स्वांतरीं ॥ २७ ॥

( मोठ्यानें ) अरे, ए मध्यमा ! तुला हांक मारतो आहे रे मी.

**भीमसेनः**—आणि म्हणून तर मी आलों आहे.




**घटोत्कचः**—अरे एऽऽऽ मध्यमऽऽऽ ! लौकर येरेऽऽ !

**भीमसेनः**—( पुढें येऊन ) अरे, हा पहा, आलोंच मी. [ मध्य० पृ. १०

**घटोत्कच**:— (आश्चर्यानें) काय ! आपणहि **मध्यमच** ?

**भीमसेन**:—मग दुसरा **मध्यम** कोण असणार ?

श्लोक ( अनुष्टुप. )

मी मध्यम अवघ्यांत । मानी लोकांत मध्यम ।
मीच मध्यम पृथ्वीचा । माझ्या भावांत मध्यम ॥ २८ ॥

**घटो०**:—असाल !

**भीम०**: —शिवाय—

श्लोक ( वृ.—अनुष्टुप. )

मी मध्यम नृपाळांत । पंचभूतांत मध्यम ॥
मी मध्यम जगामध्यें । सर्व कार्यांत मध्यम ॥ २९ ॥

**वृद्ध केशव**:—

( आर्या )

'मध्यम, मध्यम' म्हणवी तो हा पांडव खराच मध्यम हो ।
मृत्युभया पासुनिया आम्हां करण्यास मुक्त येत, अहो ! ॥ ३० ॥

[ इतक्यांत मध्यम पुत्र येतो ]

**मध्यम पुत्र**:—

( साकी. )

कमल-दलासम उज्वल जल तें, स्वर्गीहि दुर्लभ असलें ।
पद्मिनीतलें प्राशुनिया मी, तर्पण मम मी केलें ॥
स्वकरें अञ्जलि हा । दिधला मजला मीच पहा ! ॥ ३१ ॥

( जवळ जाऊन ) हे पुरुषा ! हा मी आलों आहे.

**घटो०**:—आतां मात्र तूं आला आहेस खरा. अरे **मध्यमा**, ए **मध्यमा** ! इकडे ये असा.

**वृद्ध केशव**:—( भीमाजवळ जाऊन ) बा मध्यमा ! ब्राह्मण कुलाचं रक्षण कर.

**भीम०**:—भिऊं नका, भिऊं नका. हा मी तुम्हांला नमस्कार करितों.

**वृद्ध केशव**:—वायूप्रमाणं दीर्घायु हो !

**भीम०**:—माझ्यावर हा आपला अनुग्रह होत आहे. आर्यांवर असं कोणचं संकट आलं आहे ?

**वृद्ध केशवः**—ऐका. कुरुराज युधिष्ठिर ज्या कुरुजांगल प्रदेशांत पूर्वी वास करीत होते त्याच कुरुजांगलांतील यूपग्रामांत वास्तव्य करून राहणारा मी ब्राह्मण. माझं नांव केशवदास, मी माठरस गोत्रोत्पन्न असून, कल्पशाखेचा मी अध्वर्यू आहे; यज्ञबंधू नांवाचा माझा मामा—तो कौशिक गोत्री आहे—तो उत्तर दिशेला उद्यामक गांवीं राहतो, त्याच्या मुलाची मुंज होती म्हणून त्या समारंभाकरितां, तिकडं जायला मी सहकुटुंब निघालों आहे.

**भीम०**:—तुमचा प्रवास सुखकर होवो. बरं मग पुढं ?

**वृद्धकेशवः**—पुढं काय ? पुढ हा—

श्लोक [ वृत्त—अमृतध्व. ]

अंगें जणूं सजल मेघापरी, कमल पत्रापरी नयन ते ।
ज्याची गती सहज सिंहापरी, भयद दंष्ट्रा मुखीं प्रकटते ॥
तुम्हां पुढें असुर निःशंक हा समद धांवूनिया निकट ये ।
झाला मला तनयपत्नीसवें उदित मारावया अविनयें ॥ ३२ ॥

**भीम०**:—असं काय ? एकून यानं ब्राह्मणांना वाटेंत विघ्न आणलं ? ठीक आहे तर. या बद्दल मी याचं पारिपत्य करितोंच करितों. (घटोत्कचास) अरे, ए पुरुषा ? थांब-थांब, उभा रहा ?

**घटो०**:—हा मी उभा आहे इथं.

**भीम०**:—तूं या ब्राह्मणाला कां त्रास देतो आहेस ? ह्याच्या नाशाला कां उद्युक्त झालास ?

( साकी )

सुतनक्षत्रें वेष्ठित ज्या दे पत्नी चारु रुचीसी ।
त्या ह्या विप्रेंदूचा राहू होऊनि कां तूं येशी ? ॥
वृद्धचि विप्र असा । कल्पुनि पूर्णेंदू सहसा ! ॥ ३३ ॥

**घटो०**:—मग ह्मणणं काय आहे आपलं ? राहू होऊन का ह्मणता ? प्रत्यक्ष राहूच आहे मी ?

**भीम०**:—काऽय ?

( गीति. )

अपराध कितिहि घडले तरि सोडावा, अवध्य विप्र असे ।
हा तर निवृत्तिमार्गी, सदार पुत्रास यास सोडि कसे ॥ ३४ ॥

**घटो०**:—त्याची सुटका—व्हायची नाहीं.

**भीम०**:—( आपल्याशीं ) अरे ! हा कोणाचा बरं असेल मुलगा ?

**श्लोक**— [ वृत्त—अनु० ]

**माझ्या सर्वहि बंधूंचे । चोरी सद्गुण कोण हा ? ।**
**सौभद्राची स्मृती देतो । बालदर्पचि ह्या पहा ! ॥ ३५ ॥**

( उघड ) हे पुरुषा ! यांची सुटका झालीच पाहिजे !

**घटो०**:—ती होणार नाहीं !

**( ओव्या )**

**प्रत्यक्ष पिताही खडसूनी । जरी सांगे 'सोड' म्हणूनी ॥**
**तरीहि मातृ-आज्ञा भंगूनी । कदापिही न सोडीन या ॥ ३६ ॥**

**भीम०**:—( आपल्याशीं ) काय ? आईची आज्ञा ! एकून गुरुजनांची आज्ञा पाळणारा हा तपस्वी आहे तर !

**श्लोक** [ वृत्त—मालिनी. ]

**माता आहे देवता मानवाची ।**
**माता तैशी देवता देवतांची ॥**
**मात्राज्ञेतें पाळितां ये दशा ही ! ।**
**येवो सौख्यें पांडवा मान्य तीही ॥३७॥**

( उघड ) हे पुरुषा ! असं आहे तर तुला विचारायचं आहे कांहीं थोडंसं.

**घटो०**:—विचार, विचार काय तें झटपट.

**भीम०**:— अरे, तुझ्या आईचं नांव काय बरं ?

**घटो०**:—माझ्या आईचं नांव हिडिंबा,—ही राक्षसी आहे.

**श्लोक** [ वृत्त—अनु० ]

**कुरुवंश-प्रदीपानें । पांडु-पुत्रें महाशयें ॥**
**केली सनाथा मन्माता । पूर्णचंद्रें नभा जसें ॥ ३८ ॥**

**भीम**:—( आपल्याशीं ) अस्सं ? तर हा हिडिंबेचा पुत्र एकून ? मग ह्याचा हा गर्व याला अनुरूप असाच आहे.

**( आर्या. )**

**रूप गुणें सामर्थ्यें दिसतो हा सदृश सकल पितरांशीं ॥**
**कोणापरि याचें मन ? अकरुण जें सर्व भूतमात्रांशीं ॥ ३९ ॥**

( उघड ) हे पुरुषा ! तूं यांना सोडून दे.

घटो०:—एवढी गोष्ट व्हायची नाहीं.

भीमः—हे विप्रश्रेष्ठ ! जा, तुम्हीं घेऊन जा आपल्या मुलाला. आम्हीं जातों ह्याच्या बरोबर.

म० पुत्रः—( भीमास ) छेः छेः आपण नको जायला.

श्लोक [ वृत्त–इं. वज्रा ]

रक्षावया प्राण गुरूजनांचे ।
पूर्वीच मी अर्पियले स्वताचे ॥
तारुण्य रूपादि गुणें सुयुक्त ।
तुम्हीं रहावें चिर या जगांत ॥ ४० ॥

भीमः—आर्य ! छेः छेः असा नका धरू आग्रह. मी क्षत्रिय कुलोत्पन्न आहे, आणि मला ब्राह्मण अत्यंत पूज्य आहेत. म्हणून ब्राह्मणाच्या शरीर रक्षणार्थ आपलं शरीर अर्पण करावं अशी माझी इच्छा आहे.

घटो०:—( आपल्याशीं ) अस्सं ! एकून हा क्षत्रिय आहे तर ? आणि म्हणून याला हा गर्व ! ठीक आहे. यालाच मारून घेऊन जाईन. ( उघड ) ह्या ब्राह्मण बटूला आपल्या पाठीशीं कोण घालतो आहे ?

भीमः—मी !

घटो०:—काय तूं ?

भीम०:—होय. मग काय म्हणणं आहे तुझं ?

घटो०:—तर मग आपणच यावं माझ्या बरोबर.

भीम०:—अस्सं ? माझ्यापुढें ज्याचं वीर्यबल फिकं पडलं आहे, त्याच्या मागून जायची माझी इच्छा नाहीं. तुझ्यांत सामर्थ्य असेल तर बळजबरीनं मला घेऊन चल !

घटो०:—तर मग आपण ओळखलंत म्हणायचं मला एकून ?

भीम०:—हो, तूं माझा पुत्र आहेस हें ओळखलं मी.

घटो०:—तुमचा पुत्र मी ? कसा-कसा मी तुमचा पुत्र ?

भीम०:—काय, राग आला वाटतं तुला ? क्षमा करा, क्षमा करा ! क्षत्रिय लोक सगळ्याच प्रजेला ( भूतजाताला ) पुत्र ह्या संज्ञेनंच हांक मारित असतात, आणि म्हणूनच मीहि तसंच म्हटलं.

घटो०:—एकून आतां आपण भ्याडाचें हत्यार धारण केलं आहेत तर ?

**भीम०:—**

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

सत्यातें स्मरुनी असे कथित मी, न ज्ञात भीती मला ।
जाणाया तिज इच्छितों तरि करी कांहीं कृपा-दृष्टिला ! ॥
हे भद्रा ! भय सांग केंवि असतें, वर्णूनिया तें मला ।
आलों येथ गुणागुणा निरखुनी—ह्या सद्गुरू-पावलां ॥ ४१ ॥

**घटो०:**—भय काय आहे तें शिकवायला हा तयार आहे मी इथं. चल, उचल आपलं शस्त्र.

**भीम०:**—काय शस्त्र उचलूं ? हें उचललं. ( बाहू वर करितो ).

**घटो०:**—( साश्चर्य ) हें कसं काय ?

**भीम०:**—

( आर्या )

स्वर्ण-स्तंभा सम हा उजवा बाहूच शस्त्र मम आहे ।
रिपु-निग्रहार्थ पाही, साहस, धृति, यांत सांठुनी राहे ! ॥ ४२ ॥

**घटो०:**—हें माझ्या पित्याला—त्या भीमसेनाला—च शोभेसं आहे !

**भीम०:**—तर मग—तूं जो हा भीम म्हणतोस तो कोण ?

श्लोक [ वृत्त—उपजाति ]

तो इंद्र, ब्रह्मा, शिव, कार्तिकेय । श्रीकृष्ण किंवा यम अद्वितीय ॥
यांतून कोणासम सांग आहे । पिता तुझा, मन्मन जाणुं पाहे ॥४३॥

**घटो०:**—या सर्वांसारखा.

**भीम०:**—छत्, साफ खोटं हें.

**घटो०:**—काय, काय ? कसं म्हटलंत ? ‘ साफ खोटं ’ ! एकून असं म्हणून तुम्हीं माझ्या गुरुजनांचा धिःकार करितां ? ठीक आहे. तर मग आतां हा मोठा वृक्ष उपटून ह्याचाच मी तुझ्यावर प्रहार करितों. ( तसें करून आपल्याशीं) काय ह्या वृक्षाच्या प्रहारांनंहि हा ठार होत नाहीं! तर मग आतां काय बरं करावं ? ठीक आहे. आतां असंच. हें गिरिशृंग उचलून यानंच याच्यावर प्रहार करितों. मी—

( आर्या )

फेंकित शृंग गिरीचें, नेइल हें प्राण जाण तव हरुनी ।
भीम०—कोपे वन-करि तरि ही, तो व्याघ्रां धर्षवूं शके न वनीं ॥४४॥

**घटो०**:—काय, ह्यानं सुद्धा हा टार होत नाहीं ? तर मग आतां काय करावं बरं ? ठीक आहे. आतां हैंच. ( द्वंद्वास तयार होऊन भीमास)

**श्लोक** [ वृत्त—अनुष्टुप. ]

**पुत्र मी भीमसेनाचा । वायूचा पौत्र मी असे ! ॥**
**सज्ज द्वंद्वास हो आतां । द्वंद्वीं जोड मला नसे ! ॥ ४५ ॥**

( दोघांचें द्वंद्वयुद्ध होतें. )

( भीमसेनास बद्ध करून )

**श्लोक** [ वृत्त—मालिनी ]

**गजसम दृढ पाशें खेंचिलें मद्भुजांनीं ।**
**वद तरि सुटशी तूं केंवि बाहू मधूनी ? ॥**

**भीमः**—(आपल्याशीं ) एकून यानं मला जिंकलन ! हे सुयोधना! पहा, पहा, तुझा शत्रुपक्ष अगदीं निश्चित बळावत चालला आहे. आपल्या संरक्षणाची चांगली खबरदारी ठेव ! ( उघड ) अरे, ए पुरुषा ! नीट सावध रहा.

**घटो०**:—नीट सावध आहे.

**भीम०**:—( पाशाचीं बंधनें सोडवून घेऊन )

**श्लोकार्ध** ( पुढें चालू )

**त्यजि झणिं बल-दर्पा ज्ञात मच्छक्ति तूंतें ।**
**श्रम नच कधिं होती बाहु-युद्धांत मातें ॥ ४६ ॥**

**घटो०**—( आपल्याशीं ) काय ? ह्यानं सुद्धा हा ठार होत नाहीं ? तर आतां काय करावं ? ठीक, असंच ! आईच्या कृपेनं प्राप्त झालेला ' माया-पाश ' माझ्या जवळ आहे. त्यानं याला बांधून घेऊन जावं. पण हें करायला पाणी पाहिजे. पाणी कुठून आणावं बरं ? हे पर्वता ! पाणी दे पाहूं. ओहो! पर्व-तांतून पाणी तर फुटूं लागलं. ( आचमन करून मंत्र जपतो ) हे पुरुषा !

[ भीमास माया—पाशानें बद्ध करितो. ]

**[ आर्या ]**

**'माया-पाशें'केलें बद्धचि तुज जावया न ये आतां ॥**
**उत्सविंचा इंद्रध्वज बांधावा रज्जूनें तसे दिसता ॥ ४७ ॥**

**भीम०**:—( आपल्याशीं ) एकून यानं मला मायापाशानं बद्ध केलं तर ! आतां पुढें काय करावं बरं ? हां ! शंकराच्या प्रसादानं प्राप्त झालेला माया-

पाशांतून सुटण्याचा-मंत्र माझ्याजवळ आहे; तोच जपावा. पण इथं पाणी कुठं आहे? ठीक, ठीक, हे ब्राह्मण-कुमारा! आपल्या कमंडलूंतून थोडं पाणी घेऊन ये पाहूं.

वृद्धकेशवः—( स्वतःच पुढें होऊन ) हें घ्या पाणी.

[ भीमसेन आचमन करून मंत्र जपतो आणि मायापाश सोडवून घेतो.]

घटो०ः—अरेच्या! हा मायापाश तर तुटून पडला! आतां काय करावं बरं? ठीक! ( उघड ) हे पुरुषा! तूं पूर्वी दिलेल्या वचनाचं स्मरण कर.

भीम०ः—वचन? वचन म्हणतोस? मी स्मरतों आहे तें. चल, तूं पुढें चालूं लाग.

[ दोघेहि इकडे तिकडे फिरतात. ]

वृद्धकेशवः—( मुलांस ) मुलांनों! काय करीत आहां हें आपण? हा वृकोदर तर चालला याच्या बरोबरः—( जाणाऱ्या भीमसेनाकडे पहात.)

श्लोक ( वृत्त— शा. वि. )

ज्याचें भीषण रूप, कांतिहि तशी ज्वालाच कीं दृष्टितें।
ज्याचें वीर्य तसेंच बाहुबलही अत्युग्र दुःसह्य तें॥
ऐशा जिंकुनि राक्षसा हळुहळू वीरेंद्र हा जातसे॥
पर्जन्यें वृष झोडतां निज तनू झाडूनि जाई जसें॥ ४८॥

---

स्थल ( हिडिंबेचें निवास-स्थान )

[ घटोत्कच भीमासह येतो ]

घटो०ः—थांब इथंच. तुला आणल्याचं माझ्या आईला कळवितों.

भीम०ः—ठीक आहे जा, कळीव जा.

घटो०ः—( आईच्या जवळ जाऊन ) आई! हा घटोत्कच तुला नमस्कार करीत आहे. फारा दिवसाच्या तुझ्या इच्छेनुसार तुझ्या आहाराकरितां मी एक मनुष्य आणला आहे.

[ हिडिंबा प्रवेश करिते. ]

हिडिंबाः—बाळा! चिरंजीव हो! कोणच्या प्रकारचा मनुष्य आणला आहेस तूं?

**घटो०ः**—आई ! तो नामधारी मनुष्य आहे. त्याच्या वीर्याकडे पाहिलें तर त्याला कांहीं मनुष्य नाहीं म्हणतां येणार.

**हिडिंबाः**—तर तो काय ब्राह्मण आहे ?

**घटो०ः**—छेः ब्राह्मण नाहीं.

**हिडिंबाः**—तर काय वृद्ध आहे ?

**घटो०ः**—वृद्धहि नाहीं.

**हिडिंबाः**—तर काय बालक आहे ?

**घटो०ः**—छेः बालकहि नाहीं.

**हिडिंबाः**—अस्सं ? तर त्याला मीच जाऊन पहातें एकदां.

[ दोघे इकडे तिकडे फिरतात. ]

**हिडिंबाः**—(भीमास पाहून साश्चर्य) काय, ह्या मनुष्याला का आणलंस ?

**घटो०ः**—म्हणजे ? कोण हा आई ?

**हिडिंबाः**—अरे पिसाटा ! हें तर आपलं दैवत !

**घटो०ः**—आः ! कुणाचं दैवत ?

**हिडिंबाः**—तुझं-अन् माझंहि पण !

**घटो०ः**—कशावरून ? पुरावा काय ?

**हिडिंबाः**—यावरून; हा घे पुरावा. (भीमसेनास) आर्यपुत्रांचा विजय असो !

**भीम०ः**—(पाहून) अरे, ही कोण ? वाः ही तर देवी हिडिंबा ? (तिला)

( वृत्त–दिंडी )

भ्रष्ट राज्या पासुनी होउनीया ।
प्राप्त झालों अजि घोर काननीं या ॥
दया निपजुनि त्वां आगमना केलें ।
दुःख संतापा सर्व लया नेलें ॥ ४९ ॥

हिडिंबे ! हें काय ?

**हिडिंबाः**—( भीमाचे कानांत ) हें असं आहे.

**भीमः**—तूं जन्मानं राक्षसी आहेस ; आचारानं नाहींस.

**हिडिंबाः**—अरे, वेड्या ! आपल्या वडिलांना नमस्कार कर. (घटोत्कचास)

**घटो०ः**—अहो, तात ! धार्तराष्ट्रवनाचा दावाग्नि-हा घटोत्कच-तुम्हांला



**हिडिंबा**:— अरे पिसाटा ! हें तर आपलं दैवत ! [ मध्य० पृ. १८

नमस्कार करीत आहे. माझ्या अविचाराच्या धिटाईबद्दल क्षमा असावी मला.

**भीम०:**—ये, ये वत्सा! मर्यादा उल्लंघून तूं जें कांहीं केलंस, तें प्रियच आहे आम्हांला. ( त्यास आलिंगन देतो ) धार्तराष्ट्रवनाला दावाग्नि होणारे आपले पुत्र निपजावेत हीच तुझ्या वडिलांच्या अंतःकरणांतील खर अपेक्षा! वत्सा! तूं मोठा पराक्रमी आणि सामर्थ्यसंपन्न हो!

**घटो०:**—माझ्यावर अनुग्रहच आहे हा.

**वृद्ध केशव:**—हें असं आहे तर एकूण! भीमसेनाचा पुत्र घटोत्कच तर हा!

**भीम०:**—वत्सा! ह्या पूज्य केशवदासांना वंदन कर.

**घटो०:**—भगवन्! मी आपल्याला वंदन करितों.

**वृद्ध केशव:**—पित्यासमान गुण आणि कीर्ती हीं तुला प्राप्त होवोत.

**घटो०:**—अनुग्रह आहे हा माझ्यावर.

**वृद्ध केशव:**—हे वृकोदरा! तूं आमच्या कुलाचं रक्षण केलं आहेस, आणि स्वतःच्या कुलाचा उद्धार केला आहेस. तर येतों आतां आम्हीं.

**भीम:**—

श्लोक. [ वृत्त—दोधक ]

**विप्र-अनुग्रह हो नच वाया।**
**सर्वहि मंगल ये जुळुनीया॥**
**आश्रम संनिध पूत करावा।**
**विश्रम तेथचि राहुनि घ्यावा॥ ५०॥**

**वृद्ध केशव:**—आम्हांला जीवदान दिलंत, यानंच आमचं आतिथ्य होऊन चुकलं आहे. तेव्हां आतां येतोंच आम्हीं.

**भीम०:**—ठीक आहे. यावं तर मग. पुनः सहकुटुंब आपला दर्शनलाभ व्हावा.

**वृद्ध केशव०:**—ठीक आहे. मोठ्या आनंदाची गोष्ट!

[ केशवदास बायकोमुलांसह जातो. ]

**भीमसेन:**—हिडिंबे! इकडे ये अशी; वत्सा घटोत्कचा! तूंहि पण इकडे ये. आपण सगळेजण ह्या पूज्य केशवदासांना आपल्या आश्रमाच्या द्वारापर्यंतच कां होईना पोंचवून, यांचा योग्य आदरसत्कार करूं.

श्लोक [ वृत्त—शिखरिणी. ]

नद्यांचा साऱ्याही प्रभु असत रत्नाकर जसा ।
समर्पाया हव्या प्रभु असत वैश्वानर जसा ॥
जसें साऱ्या जीवीं प्रभु मन असें इंद्रियगणां ।
तसा हा श्रीकृष्ण प्रभु असत कीं मंगल जनां ॥ ५१ ॥

[ सर्व जातात. ]

"मध्यम-व्यायोग" समाप्त.

शुभं भुयात्

# "कर्णभार" नाटकाचें कथासूत्र.

द्रोणवधानंतर कर्णाला सेनापति पदाचा अभिषेक होऊन त्यानें एक दिवस युद्ध चालविलें. शल्यराजानें त्याचें सारथ्य पत्करिलें होतें. दुसरें दिवशीं कर्ण अर्जुनास गांठण्याकरितां उत्साहानें जाऊं लागला. तोंच इंद्रानें ब्राह्मण-वेषानें येऊन कर्णाकडून त्याची कवचकुंडलें दान म्हणून हरण केलीं. ह्या कर्णाच्या दानशूरपणाचेंच ह्या चिमुकल्या नाटकांत चित्र रेखाटलें आहे.

## नाटकाच्या नांवाचा खुलासा.

पंडित गणपति शास्त्री म्हणतात कीं द्रोणवधानंतर कर्णावर जो सेनापतिपदाचा भार (बोजा) पडला त्याला अनुलक्षून कवीनें ह्या नाटकाला हें नांव दिलें असावें. आमच्या मतें कर्णाच्या कानांस भारभूत असणारीं जीं कुंडलें कर्णानें ऐन युद्धप्रसंगीं इंद्राला दान म्हणून देऊन, स्वतःच्या मरणाची यत्किंचितहि पर्वा न करितां, जी आपली अपूर्व दानशूरता प्रकट केली, तीच ठळकपणें दर्शविण्याकरितां प्रस्तुत नाटकाचें नामकरण केलें असावें.

## "कर्णभार" नाटकांतील पात्रें,

**कर्ण**...—अंगदेशाचा राजा. ( कुंतीपुत्र. )

**शल्य**...—मद्रदेशाचा राजा. ( कर्णाचा सारथि )

**शक्र**....— इंद्र ( ब्राह्मण वेषांत )

**देवदूत**.:— इंद्रदूत ( ,, )

सूत्रधार व एक भट ( वीर ).

श्री महाकवि भास-प्रणीत

# कर्णभार नाटक.

[ नांदी झाल्यानंतर सूत्रधार प्रवेश करितो. ]

**सूत्रधारः**—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ].

ज्याचें तें नरसिंह रूप बघतां संभ्रांत नारी नर ।
होती, दानव देव-वृंदहि तसे पाताल-दर्वीकर ॥
केलें भिन्न जयें कराग्र-कुलिशें दैत्येंद्र-वक्षाप्रती ।
देवो मंगल, दैत्यसार-मथिता-आम्हांस-तो श्रीपती ॥ १ ॥

आर्यमिश्रांना माझी अशी प्रार्थना आहे कीं,– ( कांहीं ऐकलेसें करून ) अरे ! पण मी ही अशी प्रार्थना करीत असतां हा गलका कसला बरं ऐकूं येत आहे ? ठीक, पाहूंच तर–

[ पडद्यांत. ]

“ अहो ! अहो ! अंगराज कर्ण महाराजांना असं कळवा कीं– ”

**सूत्रधारः**—( कान देतो ) ठीक आहे, आलं लक्षांत. हा–

आर्या– [ गीति. ]

दुर्योधनआज्ञेनें जात असे भृत्य सभय कर जुळुनी ।
कर्णा कथावयातें समर असें घोर माजलें म्हणुनी ! ॥ २ ॥

[ जातो. ]

---

प्रस्तावना संपली.

[ नंतर एक भट( =वीर ) प्रवेश करितो. ]

**भटः**—अहो ! अहो ! युद्धकाल अगदीं जवळ येऊन ठेपला आहे असं अंगेश्वर कर्ण महाराजांना आतांच्या आतां कळवा.

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

त्या पार्थाच्या पुढेंची करि-हरि-रथिंच्या भूप-कंठीरवांनीं ।
सिंहाच्या गर्जनेनें रण मुदित-मनें टाकिलें कीं भरूनी ! ॥

शत्रूंच्या सिंहनादा परिसुनि,-जरि तें सारिलें दूर होतें ।
संग्रामा दु:सहा त्या त्वरित वृष निघे, यध्द्वजीं नाग हो, ते ॥३॥

( इकडे तिकडे पाहून ) अरे ! हा तर अंगराज ! समराला उचित अशा वेषानं शल्यराजांसह आपलं भवन सोडून हा इकडेच येत आहे. ( निरखून पाहून) अरे,-पण आज हें असं कां बरं ? युद्धोत्सवांत जो नेहेमीं अग्रेसर असायचा तोच आज असा व्यथित-हृदय कां बरं दिसतो आहे ? हा:—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

अत्यंत उज्वल धरी रमणीय कांती, ।
धीमंत जो न धरितो लव भीति चित्तीं, ॥
जो अग्रगण्य समरांत, तसाच शौर्यी ।
तो शोकमग्न आजिं कर्ण कुण्या अपायीं ? ॥
ग्रीष्मांत जेंवि असतां रवि मेघ-छन्न ।
दावी निसर्ग रुचि, तेंविंच हाहि कर्ण ॥ ४ ॥

हा आतां युद्धालाच निघाला आहे, तेव्हां आतां माझ्या निरोपाचं कारणच उरल नाहीं. तर आतां आपणहि जावंच इथून.

[ नंतर वर वर्णन केल्याप्रमाणें कर्ण व शल्य प्रवेश कारितात. ]

**कर्ण:**—(शल्यास उद्देशून )

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा. ]

“ जे आले बाणमार्गीं नरपति, बनुनी लक्ष्य मत्सायकांचें ।
अद्यापि प्राण केंवीं धरुनि असाति हे ? ” व्यर्थ हे प्रश्न साचे ! ॥
लाभे कर्तव्य माझें दिसत रण-मुखीं तो जरी पार्थ मातें ।
साधाया कौरवांचें प्रिय, करिन तरी चण्ड मी विक्रमातें ! ॥५॥

शल्यराज ! जिकडे तो अर्जुन असेल तिकडे माझा रथ घेऊन चला.

**शल्य:**—ठीक आहे. [ रथ हाकून नेतो. ]

**कर्ण:**—( स्वगत ) अरे ! पण हें असं का बरं होत आहे. !

श्लोक [ वृत्त स्रग्धरा. ]

युद्धीं अन्योन्य शस्त्रप्रहरण घडतां विद्ध होती रणांत— ।
गात्रें ज्यांचीं असे हे तुरग, गज, रथी, योध कित्येक येथ ॥

ऐशा युद्धीं स्ववीर्या प्रकटत जरि मी क्रुद्ध काला-समान ।
पावे कंपा तरी हें हृदय मम बहू जात सोडून भान ॥ ६ ॥

हें मोठंच खेदजनक !

आर्या—[ गीति. ]

कुंती—प्रसवचि पहिला असतां राधेय बोलती मातें ॥
धर्मादिक हे पांडव असती माझे कनिष्ठ कीं भ्राते ! ॥ ७ ॥

श्लोक [ वृत्त—हरिणी. ]

समय अजि ये हा भाग्याचा क्रमें करुनी अहा ! ।
प्रकट करण्या वीर्योत्कर्षा पहा दिन येत हा ॥
अहह ! परि हीं अस्त्रें होतीं निरर्थ शिकूनिही !
जननि—वचनें तैशीं मातें निवारिति, हाय ! हीं ॥ ८ ॥

( उघड ) अहो, मद्रराज ! माझ्या अस्त्रप्राप्तीचा इतिहास ऐकवूं का तुम्हांला थोडासा ?

**शल्य**:—अवश्य. तो इतिहास ऐकण्याची मलाहि जिज्ञासा वाटत आहे.

**कर्ण**:—हें पहा, फार जुनी गोष्ट. मी एकदां जमदग्नि—पुत्र परशुरामांच्याकडे गेलों होतों.

**शल्य**:—आणि मग ?

**कर्ण**:—मग—

श्लोक [ वृत्त—व. वि. ]

विद्युल्लते परिस पिंगट तज्जटांचा ।
तो केशपाश शिरिं शोभत रम्य साचा ॥
ज्यांच्या करीं परशु तीव्र सुदीप्तिमंत ।
त्यांचें प्रभा-वलय तें दिपवी नितांत ॥
जो वंशकेतुच महा भृगुच्या कुळाला ।
जो क्षत्रियांस मुनि-पुंगव काळ झाला ! ॥
जाऊनिया निकट, वंदुनि त्या मुनीनां ।
मी राहिलों उगि उभा; मुखिं शब्द ये ना ! ॥ ९ ॥

**शल्य**:—मग पुढें ?

**कर्णः**—पुढें त्या परशुरामानीं मला आशिर्वाद देऊन विचारलंः—तूं कोण ? आणि इथं कां आला आहेस ? '

**शल्यः**—हं मग ?

**कर्णः**—मग मी त्यांना म्हटलं—"भगवन् ! आपल्याकडे एकूनएक अस्त्रविद्या शिकण्याची माझी इच्छा आहे".

**शल्यः**—हं मग ?

**कर्णः**—मग भगवान् म्हणालेः— 'ती मी ब्राम्हणांना उपदेशीन. क्षत्रियांना नाहीं.'

**शल्यः**—क्षत्रियांशीं भगवान् परशुरामांचं वैर पूर्वीं पासूनच प्रसिद्ध आहे. बरं, मग पुढें ?

**कर्णः**—तेव्हां मी क्षत्रिय नाहीं असं सांगून अस्त्रोपदेश घ्यायला आरंभ केला.

**शल्यः**—आणि मग पुढें ?

**कर्णः**—नंतर कांहीं थोडा काल लोटल्यावर एकदां गुरुश्रेष्ठ फुलं,फळं, मुळं, कुश. आणि समिधा आणायला म्हणून वनांत गेले, मीहि त्यांच्या बरोबरच त्यांच्या मागून गेलों. रानांत हिंडल्यामुळं भगवानानां फार श्रम झाले आणि ते माझ्या मांडीवरच-डोकं ठेऊन-झोंपीं गेले.

**शल्यः**—आणि मग ?

**कर्णः**—मग ?

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

**मांड्या टाकि मदीय वज्रमुख तो तेव्हां हळू कोरुनी ।**
**निद्राभंग न तो गुरुप्रति घडो, ऐसें मनीं वांच्छुनी ।।**
**धैर्यें साहुनि वेदना बसत मी, मद्रक्त तैं लागुनी ।**
**झाले जागृत, त्याच कालिं सहसा कोपा गुरू पेटुनी ।।**
**जाणोनी मम क्षत्रियोचित अशा मद्घोर कर्माप्रती ।**
**"कालीं होतिल सर्वही विफलची अस्त्रें !" असें शापिती ।।१।।**

**शल्यः**—अरे रे ! तर मग भगवानानीं भयंकरच शाप दिला म्हणायचा हा !

**कर्णः**—तर आतां या अस्त्रांची मी परीक्षाच पाहतों जरा ! ( तसें करितो. ) हीं अस्त्रं निर्वीर्य झालीं आहेतशीं दिसतात ! (पाहून) आणखी—

श्लोक. [ वृत्त—शा. वि. ]

हे वाजी, मदगंध-युक्त गज हे सम्च्छदें सज्जित, ।
झांकोनी निज नेत्र भीतिवश हे होऊनियां चालत ! ॥
वारंवार सुटून भानचि जणूं मार्गांत ठेंचाळती ।
वाटे युद्धिं पराजया सुचवितीं हीं लक्षणें संप्रति ! ॥ ११ ॥

त्याच प्रमाणें हे शंख दुंदुभि सुद्धां ग्यावा तसा नाद देईनासे झाले आहेत !

शल्यः—अरे रे ! तर मग हा प्रसंग मोठा खडतरच आला म्हणायचा !

कर्णः—शल्यराज ! बस्स, पुरे पुरे हा खेद. कारणः—

श्लोक. [ वृत्त—व. ति. ]

ज्या ये रणीं मरण त्या सुरलोक लाभे ।
लाभे जया विजय, त्या यश, कीर्ति लाभे ॥
दोन्हीहि मान्य घटना जगतांत लोकां ।
नाहीं रणीं लवहि निष्फलता विलोका ! ॥ १२ ॥

त्याचप्रमाणें—

श्लोक [ वृत्त—इं. वि. ]

अद्यापि आशा नच नष्ट झाली ॥
ज्यांची रणीं, ते हय वीर्यशाली ॥
श्रीमंत कांबोज कुलांत घेती— ॥
जन्मा, सुपर्णासम वेग, शक्ती ॥
होणार मद्रक्षण तें जरीही ॥
यांच्याच योगें घडणार पाही ॥ १३ ॥

गोब्राह्मणांचा नाश न होवो, पतिव्रता स्त्रियांचा नाश न होवो, रणांत पाठ न दाखविणाऱ्या वीरपुरुषांचा नाश न होवो, आणि माझ्या वाट्याला आलेल्या ह्या योग्य कालाचाहि पण नाश न होवो ! हा पहा मी आतां अगदीं निश्चित आणि प्रसन्नमन झालों आहे.

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

त्या पांडवांसह असह्य अशा रणास ।
आरंभुनी, करुनि बद्ध युधिष्ठिरास— ॥

प्रख्यात जो जगतिं सद्गुण-संपदेनें ।
मर्दूनि अर्जुन रणीं मम विक्रमानें ॥
सोडूनि वेंचक शरांप्रति शीघ्रतेनें ।
टाकीन त्या रणमुखा भरुनी यशानें ॥
येई सुखेंचि मग त्या रणिं जावयातें ।
सिंहा वधून वन जेविं सुसेव्य होतें ! ॥ १४ ॥

शल्यराज ! चला, या तर आपण आतां रथावर चढूं या.

**शल्यः**—ठीक आहे.

[ दोघेहि रथावर चढल्याचा आविर्भाव करितात. ]

**कर्णः**—शल्यराज ! आतां जिकडं तो अर्जुन असेल तिकडंच माझा रथ हांकून न्या.

( पडद्यांत )

" हे कर्णा ! मी एक फार मोठी भिक्षा मागत आहे ! "

( ऐकून ) हा मोठा वीर्यवान् शब्द दिसतो ! ( पाहतो. )

( **साकी**–वृत्त )

नसती केवळ गुणवान् द्विजवर, महा प्रभावी दिसती ! ।
परिसुनि यांचा धीर मधुर रव चित्रित हय मम होती ॥
एकाएकीं उभे राहती वपू न वश जणुं ह्यानां ।
चंचल नयनें स्तिमिताचि होती, उभविति दोन्ही कानां ! ॥
वळवुनि माना, त्यावरि धरिती वदनाग्रानां अपुल्या ।
हय न खरे हे,–वाटे मतिला मूर्तिच चित्रीं लिहिल्या ! ॥१५॥

बोलावा त्या विप्रांना;–छेः छे. मीच बोलावतो त्यांना. भगवान् ! असं इकडं यावं.

[ नंतर ब्राह्मण-वेषधारी इंद्र प्रवेश करितो. ]

**शक्रः**—( मेघांस उद्देशून ) मेघानों ! तुम्हीं आतां सूर्याबरोबरच परत निघून जा. ( कर्णाजवळ जाऊन ) हे कर्णा ! तुझ्याजवळ मी एक फार मोठी भिक्षा मागत आहे !

**कर्णः**—भगवान् ! यामुळं मला फार आनंद होत आहे.

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

राजेंद्र-मौलिमणि यत्पद रंजितात ॥
केलें कृतार्थ मज त्या अजि या जगांत ।
विपेंद्र-पादरज शीर्ष करो पवित्र ।
हा कर्ण वंदित पदांस, कृपेस पात्र ॥ १६ ॥

शक्रः—(स्वगत) आतां इथं काय बरं म्हणावं ? याला ' दीर्घायू हो, ' न म्हटलं तर हा दीर्घायू होईल ! बरं, असं जर कांहीं म्हटलं नाहीं हा मला मूढ समजून माझा अनादर करील ! तेव्हां हीं दोन्हीहि टाळून, कांहीं तरी बोललं हें पाहिजेच, ( विचार करून ) ठीक आहे, तर ां असंच ! ( उघड ) हे कर्णा ! सूर्यासमान, चंद्रासमान, हिमालया-न, सागरासमान तुझं यश चिरकाल टिको !

कर्णः—भगवान् ! 'दीर्घायू हो' ! म्हणून कां नाहीं मला आशीर्वाद दिलात ? ा आपण दिलात हाच आशीर्वाद शुभदायक आहे, कारणः—

आर्या [ गीति ]

धर्मा साधायाचें असतें यत्नेंचि परम पुरुषानें ।
ती नृपलक्ष्मी चपला फणिरसनें समचि, जाणता जाणें ॥
पालनिं जरि प्रजेच्या बुद्धी ठेवूनि वागती नृपती ।
पडतां वपु तारे त्यांचे सद्गुण केवळ सदैव जगिं उरती॥१७॥

भगवन् ! काय आहे आपली इच्छा ? काय देऊं मी आपल्याला ?

शक्रः—मी फार मोठी भिक्षा मागत आहे !

कर्णः—आपली फार मोठी भिक्षाहि मी देईन. माझं वैभव कांहीं कमी ं. आपली इच्छा असल्यास—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

धारांनीं अमृतोपमा गुणवती धेनू पया वर्षत्या ।
ज्यांच्या मागुनि तृप्त वत्स पळती, होती जरी मान्य त्या, ॥
मागायास पवित्र, युक्त, तरुणी, शृंगीं सुवर्णांकित ।
मागा धेनु-सहस्र, भो द्विजवरा ! देईन तुम्हांप्रत ॥ १८ ॥

शक्रः—धेनुसहस्र म्हणतोस ? क्षणभर दूध पिईन मी त्यांचं, दुसरं काय ? त कर्णा, त्या नकोत मला.

**कर्णः**——भगवानांची इच्छा नाहीं तर ? तर मग अश्व देऊं ?

( छंद–दिंडी )

जन्म झाला कांबोज देशिं ज्यांचा । सुगुण असुनी यद्वायुवेग साचा ॥
नृपां सकलांही मान्य सदा होती ॥ राज-लक्ष्मी साधण्या साह्य देती ॥
रणीं ज्यांचें सद्वीर्य प्रगट झालें ॥ सूर्य-अश्वांशीं जयें लाजवीलें ॥
अशा अश्वांचीं कित्येक तीं सहस्रें ॥ प्रचुर तुम्हां देईन मी स्वहस्तें ॥१९॥

**शक्रः**——अश्व म्हटलेस ? क्षणभर बसेन मी त्यांच्यावर ! दुसरं काय ! नकोत कर्णा ! नकोत ते मला.

**कर्णः**——अश्वहि नकोत भगवानांना ? तर हत्ती देऊं ?

आर्या [ गीति ]

गंडस्थलें जयांचीं असती गुरु मद-सरेंचि बहु खचित ।
याचमुळें भृंगकुळें सेविति त्यांतें किती भ्रमत रमत ॥
गंभीर घोष ज्यांचे मेघापरि, जे गिरींद्रवृंद सम ।
शुभ्र नखें दंताहि ज्यां, युद्धीं शत्रूस जे कृतांत यम ! ॥
ऐशा दंतींचीं मीं वृंदें अमितें तुम्हांस अर्पुनिया ।
धन्यचि व्हावें म्हणतों, तरि करणें मजवरी कृपा सदया !॥२०॥

**शक्रः**——काय हत्ती म्हणतोस ? त्यावरहि एक क्षणभर बसेन मी ! दुसरं काय? नको, कर्णा ! नकोत ते.

**कर्णः**——हत्तीहि नकोत तर भगवानांना ! तर मग दुसरंच कांहीं देतो. अपरंपार सुवर्ण देतों आपल्याला.

**शक्रः**——काय सुवर्ण ? फार तर तें घेऊन मी चालता होईन. ( किंचित् जातोसें दाखऊन ) नको बाबा कर्णा ! नको तें.

**कर्णः**——तर मग ही सगळी पृथ्वी जिंकून देतों.

**शक्रः**——पृथ्वी घेऊन मी काय करणार ?

**कर्णः**——तर अग्निष्टोमयज्ञाचं फल देऊं ?

**शक्रः**——अग्निष्टोमयज्ञाचं फल घेऊन काय करूं ?

**कर्णः**——तर मग मी हें आपलं शिरकमल देतों. ( शस्त्रास हात घालतो )

**शक्रः**——शिव ! शिव ! शांतं पापं ! शांतं पापं ! हें काय भलतंच ?

**कर्णः**——भिऊं नका, भिऊं नका असे. प्रसन्न व्हावं भगवानांनीं. आणखीहि एक गोष्ट विचारितों:——




**कर्णः**—( शक्रास ) म्हणून म्हणतां याचा स्वीकार करावा भगवानांनीं. ( कापून देतो. )

[ कर्ण० पृ. ९

श्लोक [ वृत्त—शा वि. ]

जें अंगांसह जन्मलें करित जें मद्देह-संरक्षण ।
अस्त्रांहीं न सुरांसुरांप्रतिहि थे ज्यांचें करूं भेदन ॥
आहे देय असें पहा कवच हें या कुंडलांच्या सवें ।
तुम्हां हें रुचलें तरी सविनयें अर्पीन सप्रेम हें ! ॥ २१ ॥

शक्रः—( आनंदानें ) दे ! दे !

कर्णः—( आत्मगत ) एकून—ही एवढीच यांची इच्छा होती ? अथवा अनेक कपटें करण्यांत पटाईत अशा त्या कृष्णाचा तर हा कांहीं डाव नसेल ? असेना, तसं का असेना. धिःकार-धिःकार असो मला ! एकदां 'देतो' असं म्हटल्यावर मागून त्या बद्दल शोक करणं अत्यंत अनुचित ! तेव्हां आतां फिकीर कसची ? ( उघड ) हीं घ्या.

शल्य.—अंगराज ! देऊं नका, देऊं नका तीं.

कर्णः—शल्यराज ! छेःछेः या वेळीं तुम्हीं माझं निवारण करूं नका. कारणः—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

जातें शिक्षण तें लयास सगळें, तो काल जेव्हां फिरे ।
झाडें जीं दृढमूल तींहि पडतीं उन्मूलुनी सत्वरें॥
जें राहें जल-संचयांत जल तें हो शुष्क आटूनिया ।
लोकीं नश्वर सर्व ! मात्र हवनें, दानें, न जातीं लया ॥२२॥

( शक्रास ) म्हणून म्हणतों याचा स्वीकार करावा भगवानांनीं ( कापून देतो. )

शक्रः—( तीं घेऊन, आपल्याशींच ) हीं तर मी घेतलींच ! अर्जुनाच्या विजया करितां म्हणून जें करण्याबद्दल सर्व देवांनीं मिळून माझी प्रार्थना केली होती, तें तर मी आतां संपादन केलं आहे. तेव्हां आतां आपणहि आपल्या ऐरावतावर आरूढ होऊन ह्या कर्णार्जुन युद्धाचं कौतुक पहावं [ जातो. ]

शल्यः—अंगराज ! एकून तुम्हांला चांगलंच फाशिवलं म्हणायचं!

कर्णः—कोणी ?

शल्यः—इंद्रानं.

कर्णः—छत् मुळींच नाहीं. मीच इंद्राला फाशिवलं आहे ! कसं तें पहाः—

आर्या [ गीति. ]

ज्या तर्पिलें द्विजांनीं देउनि यज्ञाहुतीस नियमानें,
अर्जुन सहाय्य ज्यातें, दानव—संघास मर्दिलें ज्यानें ॥
ऐरावतास टोंचुनि अंगुलि हो राठ ज्या सुरपतीची ।
त्या इंद्रा, म्यां दानें कृतार्थ केलें; पहा न पार्थेची ! ॥ २३ ॥

[ ब्राह्मणाचें रूपानें देवदूत प्रवेश करितो. ]

**देवदूतः**—हे कर्णा ! तुझीं कवचकुंडलें हरण केल्याबद्दल पश्चात्ताप होऊन इंद्रानें तुझ्यावर अनुग्रह केला आहे. पांडवांपैकीं, एका पुरुषाचा वध करितां येईल असं हें अमोघ अस्त्र—हीं ' विमला ' नांवाची कधींहि फुकट न जाणारी शक्ती—तुला इंद्रानं दिली आहे. हिचा स्वीकार कर.

**कर्णः**—धिःकार असो ! ज्याला दान दिलं त्याच्या पासून उलट दान ! म्हणजे प्रतिदानच तें ! तें मी कधींहि घेणार नाहीं.

**देवदूतः**—निदान ब्राह्मणांची आज्ञा आहे म्हणून तरी घे.

**कर्णः**—काय ? ब्राह्मणाची आज्ञा म्हणून ? हंः या पूर्वी ब्राह्मणाचें वचन मी कधींहि मोडलेलं नाहीं.—मी हिचा स्वीकार करितों.—पण ही लाभेल केव्हां मला ?

**देवदूतः**—जेव्हां तूं हिचं स्मरण करशील तेव्हां तुला ही प्राप्त होईल.

**कर्णः**—ठीक आहे, अनुग्रह झाला हा माझ्यावर. यावं आतां आपण.

**देवदूतः**—बरं आहे. येतो तर [ जातो. ]

**कर्णः**—शल्यराज ! चला, आपण आतां रथावर चढूं या.

**शल्यः**—ठीक आहे

[ रथावर चढल्याचा अभिनय करितात. ]

**कर्णः**—अरे, कांहीं शब्द झाल्या सारखं ऐकूं येत आहे ! काय बरं असेल हें ?

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

शंखाचा ध्वनि ऐकुं ये ! प्रळयिंच्या कीं सिंधुचें गर्जन ।
कृष्णाचा नच शंख हा; मज गमे हा फुंकि तो अर्जुन ॥
वाटे धर्म-पराजयें विजय तो होऊनिया कोपित ।
क्रोधें आज करील युद्ध निकरें युद्धस्थलीं अद्भुत ! ॥ २४ ॥

शल्यराज ! जिथं तो अर्जुन असेल तिथं घेऊन चला माझा रथ.
शल्यः—ठीक आहे.

[ भरत–वाक्य. ]

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप ]

सर्वत्र संपदा नांदो । विपदा ध्वंस हो सदा ।
राजा राजगुणें युक्त । शासो ही एकटा धरा ॥ २५ ॥

[ सर्व जातात. ]

"कर्णभार" समाप्त.

शुभं भूयात् ।

# " ऊरुभंग " नाटकाचें कथासूत्र.

भारतीय युद्धांतील दुर्योधनवधाचा जो शेवटचा प्रसंग त्यावर प्रस्तुतचें छिमुकलें नाटक भासानें लिहिलें आहे. ह्या नाटकाच्या कथासूत्राची रचना कवीनें फारच कौशल्यानें केली आहे. यांत कवीचें रचनाकौशल्य फारच उठावानें दिसून येतें. कवीनें आपल्या नाटकाला भारतकथेचा आधार घेतला असला तरी कवीनें आपल्या कल्पनेची आणि प्रतिभेची भर टाकून हें एक स्वतंत्ररचनेचें नाटक करून ठेविलें आहे. ह्या नाटकाचें कथासूत्र पुढें दिल्याप्रमाणें आहे.

ह्या नाटकांत घडून येणाऱ्या प्रसंगाचा काळ म्हणजे भारती-युद्ध सुरू झाल्यानंतरचा १८ वा दिवस होय. पांडवकौरव-पक्षांतलि मोठमोठे योद्धे, हत्ती व घोडे रणांगणांत मरून पडले होते. गिधाडें व कोल्हीं कित्येक वीरांच्या व रणपशूंच्या शवांवर झडप घालून त्यांच्या मांसाचे लचके तोडीत होतीं. ती रणभूमि म्हणजे राजेलोकांचें निधनगृह बनून गेलें होतें. ' समंतपञ्चकां ' तील अशा या भयानक ठिकाणीं भीमसेन आणि दुर्योधन हे दोघे गदायुद्धाला प्रवृत्त झाले होते. अशा वेळीं तेथें तीन योद्धे फिरत फिरत आले. येथें येत असतां प्रत्येक वीर त्या रणभूमीचें वर्णन करून दुसऱ्यांचें लक्ष त्या रणभूमीच्या भेसूरपणाकडे वेधीत होता. गदायुद्धाचे ठिकाणीं येतांच तें द्वैपायन व्यास, विदूर, बळराम आणि श्रीकृष्ण यांच्या समक्ष चाललें असल्याचें त्यांना आढळलें. तें पाहून ते तिघेहि त्या गदायुद्धाचें आपापल्यापरीनें वर्णन करून दुसऱ्यास सांगूं लागले. ''गदायुद्धांत दुर्योधन मोठा पटाइत आहे. पण भीमाचें सामर्थ्य कांहीं त्याच्यांत नाहीं'' असे त्यांनीं उद्गार काढले. तोंच भीमसेनावर दुर्योधनाच्या गदेचा प्रहार होऊन भीमसेन रणभूमीवर पडला. हें पाहून व्यास विस्मित होऊन आपल्या हनुवटीवर अंगुली ठेवून तटस्थ उभे राहिले. विदूर चिंतामग्न झाला, युधिष्ठिराच्या तोंडचें पाणी पळून तो दीन होऊन गेला, धनंजयानें आपल्या धनुष्यास खेचलें, आणि भगवान श्रीकृष्णानीं आपली दृष्टि आकाशाकडे वळिवली. इकडे दुर्योधनाचे गुरु बळरामदादा आपल्या शिष्याचा विजय झाला असें पाहून त्या आनंदांत आपल्या हातांतील हलायुध लीलेनें

गरगर फिरवीत सर्व प्रकार पहात तेथेंच उभे होते. रणांत पडलेल्या भीमाला विजयानें फुगून गेलेला दुर्योधन म्हणाला—"भीमा ! भिऊ नको जा, तुला मी जीवदान दिलें आहे ! " हे उपहासाचे शब्द कानीं पडतांच श्रीकृष्णांनीं आपल्या मांडीवर थाप मारून भीमसेनाला कांहीं खूण केली. त्या बरोबर भीमसेन अंगांत वायुसंचार झाल्याप्रमाणें एकदम खड-बडून उठला, आणि कपाळावर आठ्या चढवून आणि निथळत असलेला घाम हातानें पुसून त्यानें आपली ती भीमवदनीं चित्रांगदा नांवाची गदा आपल्या हातीं घेतली ! अशा प्रकारें पुन्हा त्या दोघांचें गदायुद्ध सुरू झालें. हें गदायुद्ध बराच वेळ चालून अखेर कृष्णसंकेताप्रमाणें भीमसेनानें जेव्हां दुर्योधनाचे ऊरुवर ( मांड्यावर ) गदाप्रहार केला, तेव्हां ऊरुभंग पावून तो रणांगणांत रक्तबंबाळ होऊन पडला ! अशा प्रकारें दुर्योधनाला पडलेला पाहतांच भगवान व्यास एकदम आकाशांत निघून गेले. आपल्या शिष्या-वर कपटानें असा गदाप्रहार केल्याचें पाहून बलरामदादा अत्यंत क्रुद्ध झाले. आपल्या शिष्याबद्दलचा सूड घेण्याकरितां तेच युद्धास प्रवृत्त होतात कीं काय असें सर्वांना वाटलें. पण इतक्यांत व्यासांच्या आज्ञेवरून पांडवांनीं भीमसेनाला त्या ठिकाणाहून एकदम दुसरीकडे घेऊन जाण्याचें ठरविलें. श्रीकृष्णांनीं त्याला आपला हस्तालंब दिला, आणि अशाप्रकारें त्याला ते तेथून दूर घेऊन गेले.

इकडे अत्यंत क्रुद्ध झालेले बलराम—"एक क्षणभर तरी प्राण धरून रहा मी हलानें भीमाला कंठस्नान घालतों ! " असें दुर्योधनाला मोठमोठ्यानें ओरडून सांगत होते. भग्नोरु होऊन विव्हळत पडलेल्या दुर्योधनाच्या कानीं हे शब्द पडतांच तो खुरडत खुरडत बलराम होते तेथें आला. आणि त्यानें तशाच अवस्थेत पडल्या पडल्याच त्यांस नतशिर होऊन वंदन केलें आणि शांत होण्याविषयीं त्यानें त्यांची विनंति केली. पण बलरामाचा कोप कांहीं केल्यानें शांत होईना. "ह्या हलाघातानें साऱ्या पांडवांना ठार करून त्यांना तुझे दास म्हणून तुझ्या बरोबरच स्वर्गाला पाठवून देतों " असें ते उद्गारले. दुर्योधन अर्धा मेला झाला होता. त्याच्यांत यत्किंचितहि त्राण उरला नव्हता. तो त्यांना म्हणाला:—" माझे शंभर बंधू मेले, आणि मीहि आतां स्वर्गाला चाललों आहें. तेव्हां आतां रणकथा संपली आणि त्याबरोबरच वैरहि संपलें. आतां या पुढें युद्ध करून लाभ काय ? " त्या-

वर बलराम म्हणाले " भीमानें तुझी वंचना करून तुला कपटानें मारिलें आहे, आणि तो अजून जीवंत आहे हें मला पहावत नाहीं!" तेव्हां दुर्योधन म्हणाला, " हा तुमचा भ्रम आहे. त्या त्रिभुवनप्रिय श्री कृष्णानें भीमाच्या गदेंत प्रवेश करून, मृत्यूला माझे दान दिलें आहे!" दुर्योधन व बलराम यांचा असा संवाद चालला असतां, पुत्रवधाचें वृत्त ऐकून शोकविव्हल झालेले धृतराष्ट्र–गांधारी, दुर्योधनाच्या दोन राण्या, व त्याचा अर्भक पुत्र दुर्जय, यांच्यासह दुर्योधनाला शोधीत तेथें आले. सर्वजण विलाप कर–करीत दुर्योधनास हुडकीत होते. " बाळा दुर्योधना, कुठं आहेस तूं " असें म्हणून ते त्याला हांकाटीत होते. दुर्योधन पडल्या पडल्या हें सर्व डोळ्यांनीं पहात होता. आपल्या भार्या पायचालीं व उघड्या डोक्यांनीं येत असल्याचें पाहून त्याला फार दुःख झालें. धृतराष्ट्र अंध असल्यामुळें आपल्या सुनांना आणि नातवाला दुर्योधनास हुडकून काढण्याविषयीं वारंवार सांगत होता. आपण दमून गेलों असल्याचें दुर्जयानें जेव्हां धृतराष्ट्राला सांगितलें तेव्हां धृतराष्ट्र उलट त्याला म्हणाला कीं–"तूं जर आपल्या बापाला हुडकून काढलेंस तर तुला त्याच्या मांडीवर विश्रांति घ्यावयास सांपडेल ! " हें आश्वासन मिळतांच दुर्जय मोठ्या तांतडीनें आपल्या पित्यास हुडकूं लागला, तों दुर्योधन त्याला भूमीवर अर्धवट बसलेला असा दिसला. दुर्जयानें आपल्या पित्याला पाहतांच अनेक प्रश्न विचारिले. पुत्रस्नेहामुळें दुर्योधनाचें हृदय अत्यंत करपून गेलें होतें. अशा स्थितींत " बाबा ! मी आतां तुमच्या मांडीवर बसणार, " असें म्हणून जेव्हां तो बसण्यास पुढें सरसावला तेव्हां दुर्योधनाला त्याचें मोठ्या कष्टानें निवारण करावें लागलें. ह्या प्रसंगाचीं पितापुत्रांचीं भाषणें अत्यंत हृदयस्पर्शी आणि एकच कालवाकालव करून सोडणारीं आहेत. नंतर धृतराष्ट्रआदिकरून सर्वजणांस दुर्जय तेथें घेऊन आला. दुर्योधनाची ती दीन अवस्था पाहून सर्वच अत्यंत शोकविव्हल झाले. धृतराष्ट्राला आपले शतपुत्र–ते जरी यापूर्वींच मृत झाले होते तरी ते–आजच मृत झाले असें वाटलें व तो मूर्छित होऊन जमिनीवर पडला. दुर्योधनानें त्यांना पुष्कळसा धीर देऊन गांधारीचें सांत्वन करण्याविषयीं त्यांस विनंति केली आणि आईला वंदन करून तो म्हणालाः–"माझ्या हातून जर कांहीं पुण्यसंग्रह घडला असेल तर त्याच्या बळावर अन्य जन्मींहि तुझ्याच पोटीं जन्माला यावं अशी माझी इच्छा आहे ! " असें म्हणून

नंतर त्यानें आपल्या राण्यांना—"मानानें मरणाऱ्या पतिबद्दल मानिनी स्त्रियांनीं अश्रू गाळणें श्रेयस्कर नाहीं," असें सांगून त्यांना रडें आवरण्यास सांगितलें. आणि नंतर त्यानें दुर्जयाला हाताशीं धरून त्याला सांगितले कीं, " यापुढें माझ्याप्रमाणेंच तूं पांडवांची सेवा करीत जा. आणि माझ्या नावाचा उच्चार करून ते उदक सोडीत असतां तूंहि माझ्या नांवाचा उच्चार करून मला तिलांजलि दे. म्हणजे मला उत्तम लोक प्राप्त होईल ? "

तिकडे क्रुद्ध झालेले बलरामदादा हा सर्व शोकप्रकार पहात उभे होते. वैराचें पर्यवसान पश्चात्तापांत झालेलें पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. इतक्यांत त्याला तेथें धनुष्याचा टणत्कार ऐकूं आला. हा टणत्कार दुसऱ्या कोणाचा नसून द्रोणपुत्र अश्वत्थाम्याच्या धनुष्याचा होता. तो दुर्योधनाचें दुःखद वृत्त ऐकून त्याला हुडकीत तेथें आला होता. दुर्योधनाचें जवळ येऊन तो म्हणालाः—"कुरुराज ! काय ही तुमची अवस्था ! " त्यावर दुर्योधन त्याला म्हणालाः—" गुरुपुत्रा ! हें असंतोषाचें फल आहे ! " त्यावर अश्वत्थाम्यानें "आपण कृष्णासह सर्व पांडवांस मारून तुला कीर्ति मिळवून देईन, " म्हणून सांगितलें. तेव्हां ' आतां धनुष्य टाक, भलत्याच नादांत पडूं नकोस, ' असें दुर्योधनानें त्याला बजावलें. पण अश्वत्थामा त्याला म्हणाला—"तुझ्या ऊरुभंगाबरोबर तुझा मानहि हरण केला कीं काय ? " दुर्योधन म्हणाला " मान हा राजाचा प्राण आहे. त्यासाठींच मी शत्रुनिग्रहाचें काम पत्करलें. मी पांडवांशीं जें भीषण आचरण केलें त्यापुढें पांडवांनीं केलेली ही कृति कांहींच नव्हे. " पण अश्वत्थाम्याचें ह्या बोलण्यानें समाधान झालें नाहीं. राजपुत्र दुर्जयाला हातीं धरून त्याला तो म्हणालाः—"चल, ये. तुला अभिषेकाशिवायच केवळ विप्रवचनाच्या सामर्थ्यानें तुझ्या पित्याच्या वडिलार्जित राज्यावर बसवितों ! " हे शब्द ऐकून दुर्योधन म्हणालाः—"माझ्या मनाला वाटत होतं तेच तूं केलंस ! " यापुढे दुर्योधनाला शंतनु आदिकरून त्याचे पितृपितामह दिसूं लागले. त्याची तंद्री स्वर्गाकडे लागली. त्याला स्वर्गीय विमानहि दिसूं लागलें, आणि तो *' हा आलोंच मी ' असें म्हणून स्वर्गस्थ झाला !*

राजा धृतराष्ट्र तपोवनांत जाण्याची इच्छा करूं लागला. आणि अश्वत्थामा सौप्तिकपर्व साधण्याकरितां आपले धनुर्बाण सज्ज करून तेथून चालता झाला. असें या नाटकाचें अत्यंत हृदयस्पर्शी कथासूत्र आहे.

# "ऊरुभंग—" नाटकांतील पात्रें.

**पुरुष पात्रें:—**

धृतराष्ट्र......कुरुपति, दुर्योधनाचा पिता.

दुर्योधन......हस्तिनापूरचा राजा, धृतराष्ट्र–पुत्र.

दुर्जय........दुर्योधनाचा पुत्र.

बलदेव.......कृष्ण–बंधु बलराम.

अश्वत्थामा....द्रोणाचार्यांचा पुत्र.

तीन वीर.....तीन कौरवपक्षीय योद्धे.

सूत्रधार व पारिपार्श्वक.

**स्त्री पात्रें:—**

गांधारी......धृतराष्ट्र–पत्नी व दुर्योधनाची माता.

मालवी... }
पौरवी.... } दुर्योधनाच्या राण्या.

# उत्सृष्टिकांक, अंक अथवा प्रेक्षणक.

ऊरुभंग हें नाटक रूपकाचे जे दहा प्रकार आहेत त्यांपैकीं **व्यायोग आणि उत्सृष्टिकांक** ह्या दोन प्रकारांत पडण्यासारखें आहे. असें कित्येकांचें मत आहे

**व्यायोगाचें** लक्षण **मध्यमव्यायोग** नाटकाच्या आरंभीं दिलें आहे. येथें **उत्सृष्टिकांक** याचें लक्षण देत आहें. यालाच **भरतमुनींनीं** आपल्या **नाट्यशास्त्रांत उत्सृष्टिकांक** अथवा **अंक** म्हटलें आहे; आणि **धनंजयानें** आपल्या **दशरूपकांत उत्सृष्टिकांक** म्हटलें आहे. अन्यत्र कोठें कोठें याच प्रकारास **प्रेक्षणक** अशी संज्ञा दिली आहे. **भास्कर** कवीच्या **उन्मत्तराघव** नाटकाला हें नाटक याच रूपकप्रकारांत मोडत असलें तरी—**प्रेक्षणक** हें नांव दिलें आहे. अशा प्रकारें एकाच रूपक-प्रकाराला तीन वेगवेगळीं नांवें दिलीं गेलीं आहेत. त्या सर्वांचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

१. यांत नाटक-वस्तु प्रख्यात असते. पण क्वचित् प्रसंगीं यांतील विषय अप्रख्यात आणि अपरिचित असा असतो.

२. यांत दिव्य पुरुषांचा संचार नसतो.

३. यांत करुणरस प्रधान असतो.

४. यांत स्त्रियांचा शोक प्राचुर्यानें असतो व त्यांचेंच वर्णन विशेष असतें.

५. यांत प्रहार होऊन पराभूत झालेल्या—पुरुषांचा शोक असतो.

६. यांतील पात्रांची भाषा सामान्यतः उदासीनपणाची असते.

७. यांतील पात्रें व्यथित झालीं असल्यामुळें अर्थातच त्यांच्या चेष्टा दुःखपूर्ण असतात.

८. यांत सात्वती, आरभटी आणि कैशिकी ह्या वृत्तींचा उपयोग केला जात नाहीं.

९. यांत एकच अंक असतो.

वर दिलेलें हें लक्षण प्रकृत नाटकाला कितपत लागू पडतें तें पाहून, हें नाटक **व्यायोगाच्या** सदरांत टाकावयाचें कीं **उत्सृष्टिकांकाच्या** सदरांत टाकावयाचें हें वाचकांनीं ठरवावें.

॥ श्री रामचंद्र प्रसन्न ॥

महाकवि श्रीभास-प्रणीत.

# ऊरुभंग.

[ नांदी झाल्यानंतर सूत्रधार प्रवेश करितो. ]

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

सूत्रधारः—

भीष्मद्रोण जिचे प्रचण्ड तट ते, सिंधूपती यज्जल ॥
तो गांधार नृपाल दुर्गम असा हो डोह जीच्यांतिल ॥
तो राधासुत कर्ण जींत गमला ऊर्मीच कीं चण्ड ती ॥
ते द्रौणी, कृप, जेथ नक्र मकर क्रूराकृती राहतीं ॥
हा दुर्योधन यत्प्रवाह अशि हे शत्रू-नदी दुस्तर ॥
वीरांच्या धनुरज्जुपंक्ति-पुलिनें होतात चेतोहर ॥
झाले पार तरूनि शत्रुनदि ही ज्याच्या बळें पांडव ॥
जिंकाया रिपुशीं अम्हांस भगवान् हो नांव तो केशव ॥१॥

आर्यमिश्रांना माझी अशी विनंति आहे कीं:—(कांहीं ऐकलेसें करून) अरे, पण मी ही विनंति करण्यांत गर्क असतां हा गलका कसला बरं ऐकूं येतो ? हं पाहूंच तर—

( पडद्यांत )

" अहो ! आम्हीं आहों ! आम्हीं आहों ! "

सूत्रधारः—ठीक, आलं लक्षांत.

पारिपार्श्वकः—(येऊन ) हे कोणीकडून आले बरं ?

श्लोक [ वृत्त-मंदाक्रांता ]

स्वर्गप्राप्तिस्तव समरिं जे व्हावया देह सिद्ध ॥
ज्यांचीं अंगें खरतर शरें, तोमरें पूर्ण विद्ध ॥
ज्यांच्या अंगीं रद-विलिखितें व्यक्त मत्त द्विपांचीं ॥
ते हे येती बल-निकषची वीर वीरां पुढेंची ! ॥२॥

**सूत्रधारः**—मारिषा ! एकून तुला कळलं नाहीं तर ? अरे, कौरव-पक्षांतील धृतराष्ट्राचे नयशून्य शंभर पुत्र रणांत मारले जाऊन एकटा **दुर्योधनच** काय तो आतां जिवंत राहिला आहे. आणि इकडे **युधिष्ठिरपक्षांत पांडव** आणि जनार्दन हेच काय ते उरले आहेत, अशा स्थितींत मृत राजांच्या प्रेतांनीं भरून गेलेल्या या समंतपञ्चकांत,—

श्लोक— [ वृत्त—व. ति. ]

हे देखुनी मृत रणीं हय, हस्ति, राजे
वाटे चिताड रण—चित्रचि हें विराजे !
युद्धा प्रवृत्त अजि भीम सुयोधनाशीं—
देखूनि, येति भट राज-मृति-स्थलासी ! ॥३॥

[ जातात. ]

ही स्थापना झाली.

[ नंतर तीन वीर प्रवेश करितात. ]

**सर्व जणः**—अहो ! आम्हीं आहों, आम्हीं आहों !

**पहिलाः**—हें— श्लोक ( वृत्त-शा. वि. )

वैराला कढ ये असें स्थल, इथें लागे कसाला बल ॥
वीरांचें अभिमान—मंदिरचि हें आहे पहा निश्चल ॥
योधांना सुषमाकरा मिळत ती शौर्य—प्रतिष्ठा इथें ॥
होतें हें स्थल ती स्वयंवर—सभा त्या अप्सरांच्या मतें ! ॥
येतां मृत्यु नृपांस वीरशयना लाभावयाचें स्थल ॥
प्राणांचे बलि द्यावया जळतसे येथेंचि यज्ञानल ॥
आहे हें स्थल जेथ भूमिपतिंना लाभे नभः संगम ॥
ज्याचें नांव असे ' रणांगण ', असा हा क्षात्रधर्माश्रम ! ॥४॥

**दुसराः**—बरोबर बोललात.

श्लोक [ वृत्त—हरिणी. ]

पडुनि समरीं नागेंद्रांचीं प्रचंड धुडें, धरा
उपल-विषमा भासे नेत्रां भयाण भयंकरा ॥
हत अतिरथी त्यांचे सारे प्रशून्यचि ते रथ
रणिं चहुंकडे झाले गृध्रां निवासगृहें द्रुत ! ॥

रणमरण तें येतें जेथें क्रिया करितां रणीं
अवनिपतिनां स्वर्गप्राप्ती तिथेंचि घडे क्षणीं ॥
नयन फिरती ज्या ज्या भागीं तिथें नयनां दिसे
अवनिपति ते खड्गाघातीं रणीं निजले असें ! ॥५॥

तिसराः—असंच, असंच आहे.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

आहे हा रणयज्ञ, जेथ पशुच्या स्थानीं बळी तो नर
शुंडादंड करींद्र जे मिरविती ते यूप तेथें स्थिर ॥
बाणांचे समुदाय यांत असती विन्यस्तसे दर्भ ते
केलें इंधन या मखीं मृत अशा हस्तींचिया अस्थितें ॥
यज्ञीं पेटवितात अग्नि अरणी मंथूनियां तो जसा
वैरा घांसुनि वीर ते रणमखीं हा चेतवीती तसा ॥
वीर-स्यंदनिं ज्या ध्वजा फडकती तीं देवयानें अहा
युद्धीं जे भट सिंह—नाद करिती, मंत्राक्षरें तीं पहा ! ॥६॥

पहिलाः—आणखी हेंहि पण पहा—

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

अन्योन्यांच्या शरांनीं असति निवटले प्राण ज्या ज्या नृपांचे
त्यांचीं त्यांचीं शरीरें समरिं वरिति त्या आश्रयातें महीचे ॥
मांसांनीं आर्द्र ज्यांचीं निखिलहि वदनें होति ऐशीं गिधाडें
राजांच्या भूषणांतें शिथिल करिति हीं तोडुनी मांस-खंडें ! ॥७॥

दुसराः— श्लोक. [ वृत्त—इं. व. ]

कार्यास येईल समग्र युद्धीं । दंतीं असा सज्ज रणार्थ पाही ॥
नाराच बाणीं पडला रणांत ।साहूनिया बाणशतां अनंत ॥
झाला जयाचे कवचास भेद । जो युक्त बाणें, धनुनें समृद्ध ॥
तो आयुधागार जणूं नृपांचें । ऐसें गमे दर्शन ह्या गजाचें ॥८॥

तिसराः—(दोघांस ) हें आणखी पहा—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

रत्नें,—बाण न,—जो धरी मृत रथी, कल्पूनि जामात त्या
माळा ज्या पडल्या ध्वजांस त्यजुनी मुंडावळी होति ज्या ॥

भालू त्यास रथांतुनी उतरुनी घेतात हर्षे महा,
आप्तांच्या वनिता जशा नववरा, अश्वावरूनि पहा ! ॥९॥

**सर्वजण:**—अहो ! या समतपंचकाला काय हा भेसुरपणा प्राप्त झाला आहे ! येथील सारा भूमिप्रदेश रणांत मरून पडलेल्या वीरांच्या, हत्तींच्या आणि घोड्यांच्या रक्तानं माखून गेला आहे; इथं चिलखतं, ढाली, छत्र-चामरं, तोमर, बाण, भाले, कवचं, आणि मृतवीरांचे कबंध हे जागोजाग पडल्यामुळं पाय टेवायलाहि रीघ नाहीं; तसेंच नानाप्रकारच्या शक्ति, प्रास, हाटक, भिंडिपाळ, त्रिशूल, मुसळें, मुद्गर, वराहकर्णबाण, लोखंडाच्या सळ्या, फेंकण्याचं कर्पण, शंकू, खड्ग, गदा, आदिकरून आयुधांनीं ही रण-भूमी भरून गेली आहे ? फारच भेसुरपणा हा !

**पहिला:**—इथं तर—

श्लोक [ वृत्त-हरिणी ]

रुधिर-सरिता ज्या ह्या जाती रणांतुनि वाहत ।
मृत गज-वपू होती सेतू तयांप्रति सांप्रत ॥
रथ-हय रथां नष्टांमृतां नृपाविण वाहती ।
विगत शिर हे-पूर्वाभ्यासें-कबंधहि धांवती ॥
मदयुत महामात्रांवीणें मतंगज हे रणीं ।
भ्रमत असती सैरावैरा,-अशक्य निवारणीं ॥१०॥

**दुसरा:**—( दोघांस ) हें आणखी पहा, हे—

( साक्या )

मोहकळ्यां सम बटबटीत अणि पिंगट ज्यांचे डोळे
चोंची ज्यांच्या नतांकुशासम दैत्य-गर्जी जे धरिले ॥
सुदीर्घ, विस्तृत, पंख जयांचे ऐसे गृध्र नभांत
चंचूतिल त्या मांसें गमती व्यजनचि विद्रुम-रचित ॥११॥

**तिसरा:**— श्लोक [ वृत्त-व. ति. ]

जीच्या वरील हय, हस्ति, नृपाल, वीर ॥-
जाऊनि जी रविकरें प्रखरें अपार ॥
नेत्रां दिसे चहुंकडून सताड भू ही ॥
ती व्याप्त तोमर शरें, असि कुंत यांहीं ॥

तारांगणास पडल्या नभ सोडुनीया ॥
वाटे धरी उचलुनी क्षिति झेलुनीया ॥१२॥

**प्रथमः**—अशा स्थितींत सुद्धां या ठिकाणीं क्षत्रिय वीर आपल्या पूर्वीच्याच तेजानें चमकत आहेत—

आर्या [ गीति. ]

या रणसत्रीं पडलीं रणभूपृष्ठावरी अनेक शिरें—
मुकुटांसह नृपतींचीं निर्भयपण पूर्ण ज्यांत तें विचरें ॥
नृपतिशिरें नसुनी हीं, असती स्थल-पद्मिनी रवि-विकासी
वीर्य-दिवाकर येतां उदया, ज्या पावती विकासासी ॥
नाराच बाण नच हे, असती हे देंठ त्यांस ताठरसे
ऐशी शोभा प्रकटिति, रणिं पडलेले सुवीर वीररसें ॥
वीरमुखीं जे चमकति, डोळे ते भृंगसंघ कीं असती
आरक्त ओष्ठ त्यांचे, पंकजपर्णेंचि पसरलीं दिसतीं ॥
भुवयांचे भेद न हे, स्थल-कमलिनिच्या मधील केसर हे
मुगुट न हे नृपतींचे, असती त्यांच्यावरील दल-सर हे ॥१३॥

**दुसराः**—असल्या भयरहित क्षत्रियांच्यावरहि मृत्यूचा अंमल चालतो. मनुष्यें संकटांत सांपडलीं म्हणजे राजेपणा कायम ठेवणं शक्य होत नाहीं.

**तिसराः**—काय ? क्षत्रियांच्यावर देखील मृत्यूचा अंमल चालतो म्हणतोस ?

**पहिलाः**—यांत काय संशय ?

**दुसराः**—छेः छेः असं नका म्हणूं.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

रज्जू खांडवधूमरंजित जया, जें काळ संशप्तकीं
स्वर्गांतील रडें निवारण करी जें आपुल्या सायकीं ॥
जें घेतें बळि त्या निवातकवच-प्राणांसही दानवी ।
जें शंभूसह संगरीं झगडलें, ज्याची महा थोरवी ॥
तें गांडीव करीं धरून सहसा ओढूनिया पार्थ हा
योजी त्यावरि चंड बाण, उरले जे शंभुयुद्धीं महा ॥

—:—

दर्पानें चढल्या नृपां वधुनि तो दे दान मृत्युप्रती
तें स्वीकारूनि तुष्टला रणमखीं तो मृत्यु ही संप्रती ! ॥१४॥

**सर्वजण**:—अरेच्या ! हा कसला आवाज ? हीं—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

मेघांचीं गर्जितें, कीं पडति अचल हे चूर्ण होऊनि वज्रें,
कीं निर्घात–स्वनानीं तुमुल भयद ही भू दुभंगूनि गर्जे ॥
किंवा रत्नाकराचा भयकर रव हा होत वाहूनि लाटा–
ज्या जाती मंदराच्या दरिंत घुसुनिया क्षोभतां वायु मोठा ॥१५॥

कांहीं असो. पाहूं या काय आहे तें—

[ सर्वजण इकडे तिकडे फिरतात. ]

**पहिला**:—अरे, हें तर—द्रौपदीच्या केशाकर्षणामुळें संतापून क्रुद्ध झालेल्या मध्यम—पांडवाचें—त्या भीमसेनाचें—आणि आपल्या शंभर भावांच्या वधामुळें क्रुद्ध झालेल्या दुर्योधन महाराजांचें, कुरु आणि यदु या उभय कुलांतील देवतांसमान मानल्या जाणाऱ्या व्यासद्वैपायन, विदुर, बल-राम, कृष्ण, वगैरेंच्या समक्ष गदायुद्ध सुरू झालें आहे !

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

**दुसरा**:—

जेव्हां भीम-विशालवक्ष, पडतां आघात त्याचेवरी–
होई विस्तृत तप्त कांचन-शिला ती होतसे ज्या परी ॥
जेव्हां वासवहस्तिशुंडसम ते दुर्योधन-स्कंध ते
होती छिन्न विभिन्न तत्कठिनताही सर्वथा लोपते ॥
जेव्हां संगरिं ह्या प्रहार झडती अन्योन्य छातीवरी
तेव्हां चंड गदाभिघातरव तो कोंदे नभोऽभ्यंतरीं ! ॥१६॥

**तिसरा**:—ह्या महाराज दुर्योधनाचा—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

हाले शीर्ष–किरीट अंग हलतां, हो वल्गनाशील तो
क्रोधा हा चढतां मधून मधुनी नेत्रां मुखा फाडतो ॥
ठेवोनी पद एक जागिं, लवतां फेंकावया ती गदा
होतो वामनमूर्ति, सावरुनिया तो घे गदा सर्वदा ॥

शोभे हस्तिं गदा, महा रिपुंचिया जी माखली शोणितें
कैलासावरि टाकिल्या हरिचिया वज्रापरी दीसते! ॥१७॥

**पहिला:**—हा भीमसेन पहा. गदाप्रहारामुळें याचं सगळं अंग रक्तबंबाळ होऊन गेलं आहे.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

झालें अग्र ललाट छिन्न, गळतें तें रक्त तेथूनिया
खांद्यांच्या मधले वशिंडहि महा हे जाति चेंचूनिया
गेलें गोठुनि रक्त, पार भिजली छातीहि याची पहा
होतां शत्रुगदाप्रहार जखमा रक्तार्द्र होती अहा!
ज्याच्यांतूनि अनेक धातु निघुनी मोठ्या शिला रंगती
त्या मेरू गिरिच्या समान दिसतो हा भीम कीं संप्रती ॥१८॥

श्लोक [ वृत्त—शि. ख. ]

**दुसरा:**—

गदायुद्धीं मोठा पटु असत दुर्योधन पहा ॥
गदा फेंकी, गर्जे, करित मग उड्डाणहि महा ॥
करां चाली वेगें, हटवि रिपुचे पेंच सकळ ॥
चलचक्षू लक्षी, प्रहरण करी संतत खळ ॥
गदायुद्धीं गाढा असत नृप दुर्योधन जरी ॥
बलिष्ठा भीमाचें बळ न लव ये त्याप्रति तरी! ॥१९॥

**तिसरा:**—हा वृकोदर भीम—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

डोक्यावरी बसुनि घाव तयांतुनी हे— ।
वाहूनि रक्त, सकलांग भिजूनि राहे! ॥
धिप्पाड पर्वतचि हा, रणिं अप्रमेय ।
पृथ्वीतलावरि पडे! अजि दग्धवीर्य ॥
वज्रें प्रभिन्न गिरिपार्थिव हेमकूट— ।
होऊनिया शिथिल धातु, खचे वरिष्ठ— ॥
भूगर्भि, त्यासमचि ये गति भीमसेना ।
हें दृश्य भेसुर असे, मज देखवेना! ॥२०॥

प्रथमः—मोठ्या जोराजोरांनीं केलेल्या गदाप्रहारांमुळें ज्याचें सर्वांग खिळखिळं झालं आहे अशा ह्या भीमाला, असा खालीं पडत असतांना पाहून,—

श्लोक. [ वृत्त—शा. वि. ]

टेकोनी निज अंगुली स्वहनुच्या खालीं, मुखें उन्नतें ।
येथें राहति व्यास विस्मित उभे भीमाप्रती लक्षिते ॥

दुसराः— आला दीनपणा युधिष्ठिर—मुखीं हें होतसें गोचर ।
बाष्पव्याप्त विलोचनें विदुरही हा होइ चिंतातुर ॥

तिसराः—आकाशीं निज दृष्टि कृष्ण वळवी, चापास खेंची जय ।
युद्धा पाहत रामही फिरवि तो हाला स्वशिष्यप्रिय ! ॥२१॥

पहिलाः—हे महाराज दुर्योधन—

श्लोक. [ वृत्त—व. ति. ]

जो शौर्यमंदिर, महा अभिमान युक्त,
अत्यंत साहसि, तसा विनयी प्रशस्त ॥
तेजें समन्वित, धरी मुकुटास शीर्षी
ज्याचेवरी जडविल्या बहु रत्नराशी ॥
ऐसा सुयोधन वदे उपहास पूर्णः—
“ भीमा ! त्यजी भय, दिलें तुज जीवदान ! ॥
होतां रणांत रिपु दीन असूनि वीर
देती मृतीस कधिंही न तया सुवीर ! ” ॥२२॥

दुसराः—भीमसेनाचा हा असा उपहास चाललेला पाहून, हा पहा श्रीकृष्ण त्याला—आपल्या मांडीवर थाप मारून, कांहीं तरी खुणवीत आहे.

तिसराः—ह्या संकेतानं भीमसेनाला धीर आलेला दिसतो. हा—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

आठ्यातें चढवूनि भालिं पुशितो हस्तें स्वघर्मांप्रती ॥
घेई भेसुर भीम ती उचलुनी ‘ चित्रांगदा ’ संप्रती ॥
गर्जे राहुनिया उभा क्षितितळीं सिंहेंद्र—दृग्वीर तो ॥
वाटे वायुच काय आत्मतनया सामर्थ्य हें अर्पितो ॥२३॥

प्रथमः—वाः ! पुनः सुरु झालं कीं हें गदायुद्ध ! कारण हा भीम—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

हस्तां चोळित भूतळीं, भुजयुगीं हा मृत्तिका फेंकित ।
ओठां चावुनि, गर्जना करि महा, क्रोधा चढे अद्भुत ॥
टाकूनी रणधर्म, जाणुनि पुरा श्रीकृष्ण—संकेत तो ।
फेंकी भीम गदा स्वशत्रुवरती त्या ऊरुभंगार्थ तो ॥२४॥

सर्वजणः—हाय, हाय ! महाराज पडले !

तिसराः—रक्तस्रावामुळं ज्याचं सर्वांग रंगलं आहे अशा ह्या दुर्योधनाला भूमीवर पडलेला पाहतांच हे भगवान् व्यास आकाशांत निघून गेले !

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

नेत्रानें मिटल्या तिरस्कृति तसें आव्हान युद्धास्तव
जेव्हां तो बलराम तें प्रकटवी दुर्योधनाचेस्तव
तेव्हां तो हलिचा प्रकोप बघतां ते पांडुचे नंदन
व्यासाज्ञा मत ज्यास त्या करगता भीमाप्रती घेवुन
श्रीकृष्णें स्वकरावलंब दिधला त्या बांधवा आपुल्या
नेती वाहुन युद्धभूमि वरुनी संभ्रांत होऊनिया ॥२५॥

पहिलाः—अरे, हा भगवान् बलरामहि इकडेच येत आहे. क्रोधामुळं हा डोळे वटारुन भीमाला नेताहेत त्याकडे कसा टक लाऊन पहात आहे ! हा हलायुध. याची—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

क्रोधें विस्तृत, रक्त होति नयनें, हाले किरीट द्रुत ।
माला चावित भृंग जी—उचलुनी हस्तें धरी ती प्रत ॥
नीलांगावरुनी चळे वसन जें, तें सावरी हा करें ।
तेणें भासत चंद्र मंडलयुत क्षोणीवरी ये त्वरें ! ॥२६॥

दुसराः—तर चला, आपणहि महाराजांच्या अगदीं पाठोपाटच जाऊं.

दोघेः—ठीक आहे, चलाच तर.

[ जातात. ]

( हा विष्कंभक झाला. )

—९—

[ नंतर बलदेव प्रवेश करितात. ]

बलदेवः—हे भूपाल हो ! हें कांहीं युक्त नाहीं.

श्लोक [ वृत्त—शि ख. ]

रिपूंच्या सेनेचें असत हल हें काळचि पहा ।
तया उल्लंघूनी, रणगन न ज्या संधि मत हा— ॥
अशा ह्या रामातें अवगणुनि, दर्पें रणिं महा ।
गदाघाता घाली कुरुनृपतिच्या ऊरुवरि हा ! ॥
गदेच्या आघातें धरणिवरि दुर्योधन पडे ।
पडे भीमाचेंही कुलविभव शीलादि निधडें ! ॥२७॥

बा दुर्योधना ! एक क्षणभर तरी आपले प्राण धारण करून रहा.

आर्या [ गीति. ]

ज्या हल-मुखास घडलें उत्प्लावण चित्र सौभ—नगराचें ।
दैत्येंद्र—पुर—तटांच्या कूटां जो अंकुशा परी टोंचे ॥
यमुना—जलास खेंचुनि होई जो मार्गदर्शकहि त्याचा ।
उपहार ज्या समर्पी रिपुसेना स्वीय प्राणदानाचा ॥
त्या ह्या हलास आजीं फेंकुनिया या क्षणींच वेगानें ।
हलपृष्ठातें भिजविन भीम—स्वेदें, तसेंच रुधिरानें ॥
वक्षा विशाल ऐशा भीमाच्या—क्षेत्र कल्पुनी कठिन,— ।
टाकीन नांगरूनी, मम हल वक्षावरीच फिरवून ! ॥२८॥

[ पडद्यांत. ]

" भगवान् हलायुधानीं शांत व्हावें. शांत व्हावें. " !

बलदेवः—अशी अवस्था प्राप्त झाली असतांहि हा गुरुभक्तिपरायण दुर्योधन माझ्या मागून येत आहे. हा—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

युद्धीं अंग भिजून लिप्त—तनु हो रक्ताचिया चंदनें
जातां सर्पदुनी भुजाहि मळती त्या मृत्तिकारेणुनें ॥
होती तांबुस बाहु, कांति सगळी लोपूनिया जातसे
श्रीमान्—क्षात्रेय वीर हा—गमत कीं बाल्यव्रता घेतसे ! ॥

जैसें मंथन–कार्य सर्व सरतां त्या मंदरापासुनी।
शेषातें सुर दैत्य मुक्त करुनी, देतां तया सोडुनी– ॥
तो जाई जलधींत ओढित फणा, हो श्रांत तेणें पडे।
तैसा हा कुरुभूपही सरपटे यातें पडे सांकडें! ॥२९॥

[ नंतर दोन्ही मांड्या चूर्ण झाल्या आहेत असा दुर्योधन येतो. ]

दुर्योधनः—अहो! हा मी—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

हे ऊरु भग्न करि भीम कृतांत–सारें।
सोडूनि युद्ध-नियमांस, गदाप्रहारें ॥
अर्ध्या मृता तनुस मी धरुनी रहातों।
भूमीवरी भुजबळें वपु ही वहातों! ॥३०॥

भगवान् हलायुधांनीं शांत व्हावें, शांत व्हावें.

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

भूपृष्ठीं पडलों जरी तरि असे हें नम्र माझें शिर।
सोडा रोष समग्र आज अपुला, द्या ठाव पायांवर ॥
झालों नष्ट अम्हीं, तशी रणकथा, तें वैरही संपलें!।
ते राहोत निवापमेघ कुरुचे जीवंत द्याया जलें! ॥३१॥

बलदेवः—बा दुर्योधना! आणखी एक क्षणभर तरी आपले प्राण धारण कर.

दुर्योधनः—आपण काय करणार आहांत?

बलदेवः—ऐक—

श्लोक [ वृत्त–शि. ख. ]

हलाग्रानें ज्यांच्या असति वपुनां छेद विपुल।
जयांच्या वक्षातें करि मुसळ हें भिन्न सकळ ॥
अशा कुंती–पुत्रां समरिं वधुनी, दास म्हणुनी।
तुझ्या संगें देतों, करि–रथ–युतां स्वर्गगमनीं! ॥३२॥

दुर्योधनः—छे, छे! असें करूं नका.

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

भीमें प्रतिज्ञे–प्रति पूर्ण केलें ।
स्वर्गास सारे मम बंधु गेले ! ॥
प्राणाप्रती सोडुनि मीहि, रामा ! ।
हा चाललों; विग्रह काय कामा ? ॥२३॥

बलदेवः—अरे, प्रत्यक्ष माझ्या देखत त्यांनीं तुझी वंचना केली–तुला टकविलं,–म्हणून मी रागाला चढलों !

दुर्योधनः—काय ? त्यांनीं मला टकविलं असं मानता आपण ?

बलदेवः—यांत काय संशय ?

दुर्योधनः—वाहवा ! वाहवा ! तर मग माझ्या प्राणांना पुरी किंमत आली म्हणायची ! कारण—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

आदीप्ताग्नि मुळें भयंकर, अशा लाक्षागृहा पासुनी ।
युक्तीनें कपट–प्रबंध रचुनी, जो मुक्ति घे साधुनी ॥
होतां युद्ध कुबेरपत्तनिं,–चलत् पाषाणवर्षाव तो– ।
लीलेनें प्रतिकार त्या करुनिया–जो वारुनी टाकितो ॥
घे दानार्थ हिडिंबराक्षसपति–प्राणास जो भीम तो,– ।
जो त्याच्या भगिनी–करा निजकरें कार्यार्थची सेवितो,– ॥
तो जिंकी मज आज वंचुनि असें, ऐसें जरी मानिता ।
रामा ! हा तुमचा असे भ्रम, न तो जिंकी मला तत्वता ! ॥२४॥

बलदेवः—अरे, युद्धांत तुझी अशी वंचना करून भीमसेन या घटके-पर्यंत जिवंत आहे !

दुर्योधनः—काय ? तर मग भीमसेनानं माझी वंचना केली ?

बलदेवः—तर मग तुझी ही अशी दशा कोणी केली ?

दुर्योधनः—ऐका,—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

ज्यानें वासव–पारिजात हरिला त्या इंद्रदर्पासवें ।
क्षीराब्धींत सहस्र अब्द विधिचे जो झोंप घे लाघवें ॥



**गांधारी:**—बाळ ! कुठं रे आहेस तूं !

**दोघी राण्या:**—महाराज ! कुठं आहांत !

**धृतराष्ट्र:**—हाय ! हाय ! काय दुःख हें !

[ ऊरु० पृ. १३

त्या कृष्णें त्रिजगत्प्रियें शिरुनिया त्याच्या गदाभ्यंतरीं ।
माझें दान दिलें यमा, अकपटी जो मी असे संगरीं ॥३५॥

[ पड्यांत ]

" सभ्यहो ! बाजूला व्हा, बाजूला व्हा. "

बलदेवः--( पाहून ) अरे, हे धृतराष्ट्र महाराज, पुत्रवधामुळें ज्यांचं हृदय शोकानं विव्हल झालं आहे, असे हे कौरवेशाच्या राणीवशासह इकडंच येत आहेतः आणि देवी गांधारी आणि दुर्जय यांना वाट दाखवीत आहेत.

आर्या (गीति.)

वीर्याची खाणचि हा, चक्षुस दे शतसुतांत वाटुनिया ।
दर्पें उद्यत भूपति, घे अवलंबास कनकयष्टिचिया ॥
वाटुनि भय देवांतें कीं हा घेईल स्वर्गलोकातें ।
रिपुतिमिरें स्वांजलिनें, ताडुनि नेत्रीं विनिर्मिलें यातें ! ॥३६॥

[ नंतर धृतराष्ट्र, गांधारी, दोघी दुर्योधन-स्त्रिया व त्याचा पुत्र दुर्जय असे प्रवेश करितात. ]

धृतराष्ट्रः—बाळा ! कुठें आहेस तूं ?

गांधारीः—बाळ ! कुठं रे आहेस तूं ?

दोघी राण्याः—महाराज ! कुठं आहांत ?

धृतराष्ट्रः—हाय ? हाय ? काय दुःख हें !

आर्या ( गीति. )

परिसुनिया मर्दियलें कपटानें मम सुतास आज रणीं ।
मम नयनाश्रू टाकिति, जन्मांधा अधिक अंध मज करुनी ॥३७॥

गांधारी ! तूं हं सगळं सहन करून अजून जगून आहेस !

गांधारीः—हो. ही मी हतभागी जिवंत आहे !

दोघी राण्याः—महाराज ! महाराज !

दुर्योधनः—हाय ! हाय ! माझ्याहि स्त्रिया रडत आहेत !

श्लोक [ मंदाक्रांता. ]

या पूर्वीं तें असुख मजला स्पर्शलें ना गदेचें ।
आतां मातें स्मरति अवघे घाव मोठे तियेचे ! ॥

कां कीं येथें करुनि उघडीं मस्तकें आपुलालीं ।
राज्ञी माझ्या गलितहृदया येति ह्या पायचाली ! ॥३८॥

धृतराष्ट्रः—गांधारी ! आपल्या कुलाचा मूर्तिमंत अभिमान असा मानी दुर्योधन कुठें दिसतो आहे कां ?

गांधारीः—नाहीं दिसत महाराज.

धृतराष्ट्रः—कसा बरं दिसत नाहीं ? ज्या कालीं पुत्राची अत्यंत जरूरी, अशा कालां तो माझ्या दृष्टीस पडत नाहीं ! असं असून देखील मी अजून जिवंत आहे ! हायरे अधमा, यमा !

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

ज्या म्यां जन्म दिला असे सुतशतां, जे धीर, मानी महा ।
युद्धीं शत्रु-विमर्दनीं प्रकटिती जे वीर्यतेजा पहा ॥
त्यांहीं अर्पियल्या तिलांजलि-जला, पृथ्वीतलीं वाहतां ।
सेवाया धृतराष्ट्र, तो नच असे का योग्य त्या सर्वथा ? ॥३९॥

गांधारीः—बाळा, सुयोधना ! बोल माझ्याशीं दोन शब्द. त्याच प्रमाणं शंभर पुत्र नाश पावल्यामुळं दुःखित झालेल्या हतभागी महाराजांशीं तरी कांहीं बोल !

बलदेवः—हाय, हाय ! ही भगवती गांधारी !

[ मोठी साकी. ]

निज पुत्रांची तशि पौत्रांची वदनें निरखायाचें ।
कौतुक सारें लोप पावलें आहे या देवीचें ॥
दुर्योधन-मृति-जनित-शोक तो गिळितो धैर्य जियेचें ।
धारण ती करि नयन-बंध हा चिन्हचि पतिधर्माचें ।
भिजला जो आतां ॥ संतत नयनाश्रू झरतां ! ॥४०॥

धृतराष्ट्रः—बाळा, दुर्योधना ! हे अठरा अक्षौहिणींच्या महाराजा ! कुठं आहेस बाबा तूं ?

दुर्योधनः—हा जिवंत आहे मी अजून.

धृतराष्ट्रः—हे शतपुत्रांमधील ज्येष्ठ पुत्रा ! प्रत्युत्तर दे मला.

**दुर्योधनः**—( आपल्याशीं ) यांना निराळ्या प्रकारानें हकीगत सांगावी. ह्या घडलेल्या प्रकारामुळें मला लाज वाटत आहे.

**धृतराष्ट्रः** ये, ये पुत्रा ! चल, मला नमस्कार कर, ये.

**दुर्योधनः**—हा-हा आलोंच मी. ( उठण्याचा प्रयत्न करीत असतां पडतो. ) हाय, हाय ! हा दुसरा प्रहार झाला माझ्यावर ! किती असह्य आहे हें !

**श्लोक** [ वृत्त-अनुष्टुभ ]

**केशग्रहें, गदापातें। हरितो पाण्डुनंदन।**
**ऊरू जैशा, तसें माझें। गुरुपादाभिवंदन ! ॥४१॥**

**गांधारीः**—( दोघी सुनांस ) इकडे या मुलींनों !

**दोघी राण्याः**—आर्ये ! ह्या आलों आम्हीं.

**गांधारीः**— आपल्या पतीला शोधून काढा.

**प्रत्येक राणीः**—ही चालले मी हतभागी शोधायला.

**धृतराष्ट्रः**—कोण आहे हा ? माझ्या वस्त्राचा पदर धरून कोण मार्ग दाखवितो आहे मला हा ?

**दुर्जयः**—आजोबा ! मी आहे तो दुर्जय.

**धृतराष्ट्रः**—आमचा नातू ! बाळा, दुर्जया ! आपल्या पित्याला हुडकून काढ पाहूं.

**दुर्जयः**—मी अगदीं दमून गेलों आहें.

**धृतराष्ट्रः**—जा, हुडकून काढ जा. म्हणजे बापाच्या मांडीवर तुला विश्रांति घ्यायला सांपडेल.

**दुर्जयः**—आजोबा ! हा जातों मी तर. ( जवळ जाऊन ) बाबा ! कुठं आहांत तुम्हीं ?

**दुर्योधनः**—हंः ! हा सुद्धां आला ! साऱ्या अवस्थांमध्यें हृदयांत वाळगलेला पुत्रस्नेह माझ्या अंगाचा दाह करून सोडीत आहे ! कारण—

**आर्या ( गीति )**

**दुःख न ज्या लव ठावें, मम अंकीं जो करी सदा शयन।**
**काय म्हणेल मला हा सुत दुर्जय जित अशा पित्या बघुन ! ॥४२॥**

दुर्जयः—हे महाराज जमिनीवरच बसले आहेत कीं !

दुर्योधनः—बाळा ! तूं कां आलास इथं ?

दुर्जयः—तुम्हांला यायला वेळ लागला म्हणून.

दुर्योधनः—अरेरे ! अशा स्थितींत पुत्रस्नेहानं हृदय करपून जातं.

दुर्जयः—बाबा ! मी आतां तुमच्या मांडीवर बसणार. (मांडीवर बसूं लागतो)

दुर्योधनः—(त्याचं निवारण करुन) दुर्जया ! दुर्जया ! (एकीकडे) अरे ! अरे ! केवढा दुःखद प्रसंग !

दिंडी [वृत्त.]

उचंबळवी जो तनय हृदीं प्रीति ।
मूर्त नेत्रोत्सव ! एक वत्समूर्ती ! ॥
काल फिरतां चंद्र हा प्रकृतिशीत ।
वन्हिरूपा घेऊनि दाह देत ! ॥४३॥

दुर्जयः—बाबा ! मी मांडीवर बसत असतां मला दूर कां करितां ?

दुर्योधनः— आर्या. (गीति)

आसन-सुख अनुभविलें, बाळा ! जें तूं पुरा, न तें उरलें ।
या पुढती तुज आसन जेथें बसशिल तिथेंच तें ठरलें ! ॥४४॥

दुर्जयः—म्हणजे ? महाराज जाणार आहेत तरी कुठं असे ?

दुर्योधनः—जिकडं माझे शंभर बंधू गेले तिकडं त्यांच्या मागोमाग.

दुर्जयः—मलाहि न्या तर तिकडं.

दुर्योधनः—जा बाळ ! वृकोदराला सांग जाऊन हें.

दुर्जयः—चला, माझ्या बरोबर या महाराज. तुम्हांला हुडकताहेत.

दुर्योधनः—कोण हुडकताहेत, बाळ ?

दुर्जयः—आजोबा-आजी-आणि सगळाच राणीवसा.

दुर्योधनः—तूं जा, बाळ ! माझ्याच्यानं येववत नाहीं.

दुर्जयः—तर मी घेऊन जातों तुम्हांला.

दुर्योधनः—बाळ ! तूं लहान आहेस रे !

**दुर्जयः**—( इकडे तिकडे फिरून ) अहो आजोबा, अहो आजीबाई ! इकडे आहेत महाराज.

**दोघी राण्याः**—हाय ! हाय ! हेच महाराज !

**धृतराष्ट्रः**—कुठं आहेत महाराज ?

**गांधारीः**—कुठं आहे माझा बाळ ?

**दुर्जयः**—हे पहा महाराज—इथं जमिनीवर बसले आहेत !

**धृतराष्ट्रः**—हाय ! हाय ! काय ? हे महाराज ? ( आश्चर्यानें )

साक्या.

**कनकस्तंभा समान होती भव्य जयाची मूर्ती ।**
**धरणिपतींचा इंद्र एक हा, ऐशी लोकीं कीर्ती ॥**
**तोच आज हा दीन होउनी पडला धरणीवरती ।**
**भग्न अर्गलार्धाच्या सम ही याची दुःस्थिति जगतीं ! ॥४५॥**

**गांधारीः**—बाळा ! सुयोधना ! तूं थकून गेला आहेस अगदीं.

**दुर्योधनः**—आई ! मी तुझा मुलगा ना ?

**धृतराष्ट्रः**—अरे, ही कोण ?

**गांधारीः**—महाराज ! मी निर्भय असे वीरपुत्र प्रसवणारी आहे !

**दुर्योधनः**—मी आजच जन्माला आलों असं मला वाटतं ! तात ! आतां दुःख करून काय होणार ?

**धृतराष्ट्रः**—बाळा । आतां या पुढं कसला मी दुःखी होणार ?

आर्या ( गीति )

**रणयज्ञीं होमियले वीर्यबलोत्पन्न तनय शत मम हे ।**
**मेले पूर्विच जरि ते, पडतां तूं एक, होति मृत अजि हे ॥४६॥**
**( पडतो )**

**दुर्योधनः**—हाय, हाय ! हे तर पडले ! बाबा ! आईचं सांत्वन करून तिला धीर द्या.

**धृतराष्ट्रः**—बाळा ! कोणत्या प्रकारानं धीर देऊं तिला ? काय—सांगू काय तिला ?

**दुर्योधनः**—युद्धांत पाठ न दाखवितां मारला गेलों—असं सांगून धीर

द्या तिला. बाबा ! आपला शोक आवरून धरल्यानंच माझ्यावर अनुग्रह होईल.

श्लोक [ वृत्त–उपजाति. ]

त्वदीय पायांविण अन्य पायीं ।
ललाट माझें नमलेंचि नाहीं ॥
मातें न ती अग्निशिखा प्रचंड ।
दाही, जरी पेटत होमकुंड ! ॥
जो मान घेऊनि जगांत आलों ।
मानेंचि त्या आज दिवीं निघालों ॥४७॥

धृतराष्ट्रः— श्लोक [ वृत्त–व. ति. ]

मी वृद्ध, जीवित मदीय असार सारें ।
जन्मांध लोचनविहीन असे, पहा रे ! ॥
धैर्या धरीत परि अंतरिं तीव्र दुःख ।
देई मला प्रबल दुर्धर पुत्रशोक ! ॥४८॥

बलदेवः—हाय, हाय ! केवढं संकट हें !

आर्या–( गीति. )

दुर्योधना विषयिंची ज्याची आशा समूळ मावळली ।
त्या जन्मांधा नांवहि कळवाया शक्ति मुळिं मला नुरली ! ॥४९॥

दुर्योधनः—आई ! तुला विनंति आहे माझी—

गांधारीः—बोल बाबा, काय विनंति आहे ?

आर्या–( गीति. )

वंदुनि तव पद वदतों, जरि केलें पुण्य–संग्रहा कांहीं ।
मज मातृलाभ होवो, जननी ! तूझाचि अन्य जन्मींही ! ॥५०॥

गांधारीः—अगदीं माझ्या मनांतलीच गोष्ट तूं बोललास.

दुर्योधनः —( राणीस ) मालवी ! तूंहि ऐकः—

श्लोक [वृत्त– शा. वि.]

भ्रू ह्या पावत भंग संगरिं गदाघांताप्रती साहतां ।
हारांचें स्थल हें प्रहाररुधिरें या व्यापिलें सर्वथा ! ।

पाही बाहु मदीय हे व्रणभरें स्वर्णांगदें सुंदर ।
युद्धीं हा न पती पराङ्मुख तुझा ! क्षत्रे ! रडें आवर ॥५१॥

**राणी मालवी:**—मी अजून पूर्व वयांत असून बाला आहे, आणि इकडची सहधर्मचारिणी आहें म्हणून रडतें.

**दुर्योधन:**—( दुसऱ्या राणीस ) पौरवी ! तूंहि ऐक,

**श्लोक** [ वृत्त–शा. वि. ]

लोकीं मान्य अशा करूनि विविधा यज्ञांस वेदोक्त ग्यां ।
केलें त्या यजना, तसें प्रिय शतां बंधूस जोडूनिया– ॥
शत्रूंच्या शिरिं नाचलों, न कधिं ही म्यां आश्रितां त्यागिलें ।
त्या अष्टादशवाहिनी-नृपतिनां मी निग्रहें दापिलें ! ॥
माना पाहुनिया स्वकीय पतिच्या त्या मानिनी कामिनी ।
अश्रुतें नच ढाळिती लव कधीं, हें जाण गे मानिनि ! ॥५२॥

**राणी पौरवी:**—इकडच्या बरोबर सहगमन करण्याचा माझा पुरा निश्चय झाला आहे; तेव्हां आतां मी मुळीं देखील रडणार नाहीं.

**दुर्योधन:**—दुर्जया ! तूंहि ऐक.

**धृतराष्ट्र:**—गांधारि ! हा काय बरं सांगणार आहे ?

**गांधारी:**—मी दिखील त्याच विचारांत पडलें आहें !

**दुर्योधन:**—(दुर्जयास) बाळ ! माझ्या प्रमाणेंच पाण्डवांची सेवा करीत जा. भगवती कुंती मातेच्या आज्ञेनुसार वागत जा. अभिमन्यूच्या आईला आणि द्रौपदीला—दोघींनांहि आपल्या स्वत:च्या आईसारखाच मान दे. हें पहा बाळ,—

**श्लोक** [ वृत्त–शा. वि. ]

" होतें श्लाघ्य यदीय वैभव, असा मत्तात दुर्योधन ।
ज्याची ती अभिमानदीप्ति कधिंही गेली न मंदावुन ॥
देतां तुल्य रिपूस तोंड समरीं ये मृत्यु त्या लागुन !" ।
ऐसा शोक नको करूंस, तनया ! दे सर्व तो टाकुन ॥
धर्माचा सुविशाल बाहु धरि जो त्या उत्तरीया प्रती ।
त्यातें स्पर्शुनि पांडवांसह तुवां ती ती करावी कृती ।

द्यावें त्वां मजला तिलांजलि-जला मन्नाम उच्चारितां ।
तेणें उत्तमलोक-लाभ मजला होईल गा, हे सुता ॥ ५३ ॥

बलदेवः—अहो ! वैराचं पर्यवसान आतां पश्चात्तापांत झालं ! अरे ! हा आवाज कसला ऐकूं येतो ?

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

जातां थांबुनि भेरिनाद, रणिंचे सन्नाह नानापरी ।
होई युद्धठिकाण मूक सगळें निःशब्द ऐशापरी, ॥
होतां चामर, छत्र, बाण, कवचें हीं क्षिप्त कैशीतरी, ।
तैसे सारथि, वीर सर्व मरुनी ते झोंपतां भूवरी,— ॥
या ऐशा समयीं स्वकार्मुकगुणें हा कोण शब्दा करी ? ।
ज्यानें वायसवृंद गोंधळुनिया घोंगावतों अंबरीं ॥ ५४ ॥

[ पडद्यांत ]

श्लोक [ वृत्त—इंद्रवंशा. ]

दुर्योधनें सज्ज करून कार्मुक ।
आरंभिला जो रणयज्ञ मारक ॥
अशून्य तो नाहिं अजून जाहला ।
मी त्या मखा नेइन शेवटाला ॥
यज्ञीं नसे तो यजमान जेधवां ।
अध्वर्युला ये अधिकार तेधवां ॥ ५५ ॥

बलदेवः—अरे, हा गुरुपुत्र अश्वत्थामा इकडेच येत आहे.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

दृष्टी स्पष्ट, विशाल ही विकसल्या त्या पद्मपत्रापरी, ।
याचे बाहु सुदीर्घ, लोंबति पहा त्या स्वर्ण—यूपा परी ॥
हा वीर्यें निज उग्र कार्मुक करें ओढीतची येतसे ।
तेणें इंद्रधनुष्य शीर्षिं धरिल्या मेरूपरी कीं दिसे ! ॥ ५६ ॥

[ नंतर अश्वत्थामा प्रवेश करितो. ]

अश्वत्थामाः—(“पूर्वोक्त ५५ वा श्लोक “दुर्योधनें सज्ज” इ. म्हणून) अहो ! युद्धाच्या धुमश्चक्रींत दोन्ही सैन्य—समुद्रांचा संगम होऊन त्या-

वेळीं वर आलेल्या शस्त्ररूपीं नक्रांनीं ज्यांचीं शरीरें कापून काढलीं आहेत, ज्यांच्या पैकीं आतां फारच थोडे शिल्लक राहिले आहेत, ज्यांचें मंद प्राण-श्वासोश्वास हळू चालल्यामुळें-केवळ धुगधुगी धरून राहिले आहेत, आणि युद्धाची ज्यांना हौस आहे, असे राजे लोकहो ! ऐका, ऐका आपण—

( साक्या )

कपटें ज्याच्या ऊरु भंगिल्या कुरुपति मी तो नाहीं ।
विफल जयाचें शस्त्र होइ तो सूत-सुतहि मी नाहीं ! ॥
खळबळुनीया विजयभूमिवर एकलाच या राहे ।
द्रोणपुत्र हा ! उग्रत-शस्त्राचि अश्वत्थामा पाहे ! ॥ ५७ ॥

ज्यांत विजयकीर्तीचा लाभ पुन्हां मिळवितां येणार नाहीं असें हें समर-वैभव स्वीकारून मला तरी काय करावयाचें आहे ? (इकडे तिकडे फिरून) छेः पण असं नाहीं उपयोगी ! मी तातानां तिलांजलि देण्यांत गर्क आहे असं पाहून त्यांनीं कुरुकुलाला ललामभूत असणाऱ्या या कौरवेशाची कप-टानं वंचना केली आहे ! पण ह्यावर विश्वास कोण ठेवणार ? कारण—

श्लोक [ वृत्त. शा. वि ]

राजे जोडुनि अंजली, करतलीं कोदण्ड घेऊनिया ।
ते एकादश वाहिनीपति रथीं वा पृष्ठिं दंतींचिया, ॥
झेलायास वचास राहति उभे ज्याच्या,-तयाला अहा ।
जिंकी काळ सुयोधना अतिरथ्या, हें व्यक्त झालें पहा ! ॥
ज्यांच्या भार्गव टाकि तीव्र कवचां बाणेंचि कीं विंधुनी ।
तो गांगेय, तसाच तात मम हे योद्धे जयाचे रणीं ॥
जो मानी नृप पांडवां अवगणी रोषें, तयाला अहा ।
जिंकी काळ सुयोधना नृपतिला, हें स्पष्ट झालें पहा ! ॥ ५८ ॥

तर मग आतां हा गांधारीपुत्र दुर्योधन गेला आहे तरी कुठं ? ( इकडे तिकडे फिरून, निरखून ) अरे ! समर-समुद्र पार झालेला हा कौरवेश, ठार झालेले हत्ती, घोडे, वीर आणि मोडलेले रथ यांनीं बनलेल्या या तटाच्या मध्यभागीं पडला आहे.

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

ज्याचा रत्नकिरीट खालिं पडुनी ते केश होती चल ।
रत्नांचे मुकुटाचिया किरण ते होती तसे चंचल ॥
गात्रें आर्द्र गदाप्रहार–जनितें रक्तें,–क्षतें वाहुन, ।
तो हा मोक्षशिलेंवरी पहुडला युद्धांत दुर्योधन ॥
होता पश्चिमभागिं अस्त, दिसतो जैसा रवी अंबरीं ।
संध्येच्या अरुणप्रभेंत बुडतां, तैसाचि हा संगरीं ! ॥ ५९ ॥

( जवळ जाऊन ) हे कुरुराज ! काय ही तुमची अवस्था !

दुर्योधनः—हे गुरुपुत्रा ! हें असंतोषाचं फल आहे !

अश्वत्थामाः—हे कुरुराज ! सत्काराच मूळ मी जिंकून प्राप्त करून येईन.

दुर्योधन—काय–करणार काय असं तूं ?

अश्वत्थामाः—ऐक मी काय करणार तें—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

युद्धा सज्जचि जो बसूनि गरुडा पाठीवरी येतसे ।
ज्यातें चार प्रचंड बाहु असुनी, चक्रासि जो घेतसे ॥
कृष्णा फेंकिन त्या सपांडव रणीं, वर्षुनि शस्त्रां महा ।
जेवीं देंति चिताड चित्रफलका फेंकूनि हस्तें पहा ! ॥ ६० ॥

दुर्योधन—छेः छेः या नादांत आतां तूं पडूं नको.

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

भूम्यंकीं अभिषिक्त भूप सगळे निद्रिस्थ झाले पहा ! ।
देहा ठेविति भीष्म, कर्णहि तसा स्वर्गास गेला अहा ! ॥
माझ्या दृष्टि समोर बंधु शत ते युद्धांत झाले मृत ! ।
झालों मीहि पहा असा ! गुरुसुता ! टाकी धनुष्याप्रत ! ॥ ६१ ॥

अश्वत्थामाः—अहो, कौरवेश्वर !

आर्या ( गीति. )

भीमें केशां कर्षुने, करुनी युद्धीं गदाप्रहारांतें ।
हरिलें ऊरूसवें कां मानी कुरुच्या समस्त दर्पातें ? ॥ ६२ ॥

**दुर्योधनः**—छेः छेः असं नको म्हणूं. मान हा राजांना प्राण आहे. आणि मी केवळ मानासाठींच शत्रुनिग्रहाचं काम पत्करलं ! गुरुपुत्रा ! असं पहा कीं—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

हस्तें कर्षुनि केश खेंचिलि असे द्यूतीं सती द्रौपदी ।
सौभद्रा वधिलें रणीं न गणुनी कीं बाल तो अल्प–धी ॥
द्यूतीं जिंकुनि पांडवांस कपटें वैरा स्मरूनी मनीं— ।
ज्याया आश्रय वन्य हिंस्र पशुचा त्यां धाडिलें काननीं ॥
स्वल्पांशें मम हर्ष हे हरिति या युद्धव्रता सेवुन ।
हें आहे किति अल्प ! ती मम कृती होती किती भीषण ! ॥६३

**अश्वत्थामाः**—मी तर सर्व तऱ्हेनें प्रतिज्ञा करून चुकलों आहे !

आर्या ( गीति )

तुमची, मत्प्राणांची, वीरांची शपथ घेउनी कथितों ।
वरुनि निशायुद्धासी पाण्डुसुता दग्ध संगरीं करितों ! ॥ ६४ ॥

**बलदेवः**—गुरुपुत्र अश्वत्थाम्याचंच हें भाषण असलं पाहिजे !

**अश्वत्थामाः**—कोण ? हलायुध बलराम कीं काय हे ?

**धृतराष्ट्रः**—एकून साक्ष ठेऊन ही वंचना होणार तर !

**अश्वत्थामाः**—दुर्जया ! असा इकडे ये.

आर्या [ गीति. ]

वडिलार्जित जें पहिलें, जनक पुन्हां मिळवि आत्म–बाहूबळें ।
हो नृप अभिषेकाविण राज्यीं त्या विप्रभणित-वचन-बलें ॥६५॥

**दुर्योधनः**—अहाहा ! माझ्या मनाला वाटत होतं तेंच केलंस ! माझे प्राण आतां मला सोडून चालले आहेत. हे पहा शंतनु आदिकरून माझे पितृ–पितामह ! हे पहा कर्णाला पुढें करून आलेले माझे शंभर बंधू ! हा पहा ऐरावताच्या मस्तकावर बसलेला, जावळ धारण करणारा, इंद्राच्या हातांत हात घालून माझ्याकडे रागानें पाहणारा अभिमन्यु ! हा मलाच अनुलक्षून कांहीं बोलत आहे. ह्या ऊर्वशी आदिकरून अप्सरा माझ्या जवळ येऊन ठेपल्या ! हे मूर्तिमंत महासागर ! ह्या गंगाप्रभृति महा नद्या ! हें हजार

हंस जोडलेलें वीरांना घेऊन जाणारें विमान ! हें मला नेण्यासाठीं काळानं पाठिवलं आहे ! हा-हा आलोंच मी. [ स्वर्गस्थ होतो. ]

[ पडदा पडतो ]

धृतराष्ट्रः—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

जातों आज तपोवनाप्रति असे जें सज्जनांचें धन ।
होई निष्फळ राज्य पुत्र-निधनें ! धिःकार त्या लागुन ॥

अश्वत्थामाः—

जातों सौप्तिक-मर्दना उचलुनी बाणा करें माझिया ॥

सर्वः—

शत्रू पावुनि नाश, भूप अमुचा रक्षो धरित्रीस या ॥ ६६ ॥

( सर्व जातात. )

ऊरुभंग समाप्त.

शुभं भूयात् ।

# " दूत घटोत्कच " नाटकाचें कथासूत्र.

भारतीय महायुद्धाचे पहिले दहा दिवस संपून भीष्म पतन पावल्यावर गुरु द्रोणाचार्यांच्याकडे सेनाधिपत्य आलें. हें त्यांच्याकडे पांच दिवसपर्यंत होतें. ह्या अवधींत त्यांनीं चक्रव्यूह रचला. त्यावेळीं अर्जुन संशप्तकांत गुंतला असल्यामुळें अर्जुनपुत्र अभिमन्यु व्यूहभेद करण्याकरितां चक्रव्यूहांत शिरला. या प्रसंगीं ह्या एकट्या बालवीरावर कौरवपक्षीय अनेक वीर तुटून पडले आणि त्यांनीं रणनीति गुंडाळून ठेऊन त्याचा अत्यंत निर्दयपणें वध केला ! हें वृत्त अर्जुनाला कळतांच त्यानें अभिमन्यूच्या वधांत पुढाकार घेणाऱ्या जयद्रथाचा वध करण्याची व इतरांस शासन करण्याची घोर प्रतिज्ञा केली. अभिमन्यूच्या वधाचें वृत्त एका वीरानें येऊन धृतराष्ट्रास कळविलें. तो वध करण्यांत जयद्रथाचें प्रमुखत्वानें अंग होतें हें धृतराष्ट्राला कळतांच त्याला वाटलें कीं, आतां जयद्रथ व त्याचे बरोबरच आपले उरलेले सारे पुत्र निःसंशय ठार होणार ! धृतराष्ट्राचे जवळच गांधारी व त्याची कन्या दुःशला—जयद्रथाची पत्नी—ह्या दोघींही होत्या. अभिमन्यू हा श्रीकृष्णाचा अत्यंत लाडका भाचा आणि साऱ्या पांडवांचा अत्यंत आवडता पुत्र होता, हें सर्व कौरवपक्षाकडील मंडळींनां ठाऊक होतें; आणि अभिमन्यूचा वध झाल्यामुळें पांडव कसें आकाशपाताळ एक करून टाकतील याचीही त्यांना कल्पना होती. अभिमन्यूचा वध करण्यांत जयद्रथानें पुढाकार घेतल्याची गोष्ट दुःशलेस कळतांच तिचा धीर सुटला आणि ती गडबडून गेली. गांधारीचीही तीच अवस्था झाली. धृतराष्ट्रानें त्या आलेल्या वीराला सर्व हकीगत विचारली. त्यानें जयद्रथवधाची घोर प्रतिज्ञा अर्जुनानें केली असल्याचें त्यांस सांगतांच धृतराष्ट्राचा धीर सुटला आणि तो निराश होऊन,—पुढें आपल्या पुत्रांस खात्रीनें मृत्यू येणार अशा समजुतीनें-त्यांस तिलांजलि देण्याकरितां गंगातटाकीं जाण्यास उद्युक्त झाला !

इतक्यांत अभिमन्यूवधाच्या विजयवार्तेमुळें आनंदांत गर्क असणारा दुर्योधन मामा नको म्हणत असतांहि शकुनि दुःशासनासह धृतराष्ट्रास प्रणाम करण्याकरितां त्यांच्या शिबिरांत आला. त्या सर्वांनीं धृतराष्ट्राला नमस्कार केले. पण धृतराष्ट्रानें त्यांना उलट आशीर्वाद दिले नाहींत. हें अर्थातच

त्यांना चमत्कारिक वाटलें म्हणून अशीर्वाद न देण्याचें कारण काय म्हणून त्यांनीं त्यास विचारलें. तेव्हां धृतराष्ट्र म्हणालाः—“ जीविताशा सोडून ज्यांनीं कृष्णार्जुनांना प्राणाहून प्रिय असणाऱ्या बालाचा वध केला त्यांना आशीर्वाद देऊं कसा ?” असें म्हणून, “ज्या तुमच्या प्रसादानें माझ्या एकुलत्या एक मुलीवर वैधव्याची कुठार पडण्याचा प्रसंग आला त्या तुमचे हें बालवधाचें निंद्य कृत्य करितांना हात गळून कसे पडले नाहींत ? अर्जुनाचा पराक्रम तुम्हांला माहीत नाहीं काय,” असें तो उद्गारला. त्यावर दुर्योधन म्हणाला “कर्णासारखे अर्जुनाच्या तोडीचे वीर आमच्याकडे असतां, अर्जुनाला इतकें भिण्याचें काय कारण ?” यांचा असा संवाद होत आहे तोंच धरणिकंप होऊन शत्रुपक्षाकडून जयघोषाचे शब्द ऐकूं आले. आणि एका वीरानें येऊन अर्जुनानें जयद्रथवधाची प्रतिज्ञा केली असल्याचें सांगितलें. हें ऐकून दुर्योधन म्हणालाः—“माझी एवढी मोठी सेना आहे कीं, तिच्यांत जयद्रथाला मी कोठल्याकोठेंच दडवून ठेवीन, आणि शत्रूंनांच अग्निकाष्ठें भक्षण करण्यास लावीन !” त्यावर धृतराष्ट्र म्हणाला “ बाबारे. कृष्णचक्षुरूपी बाणांचा प्रवेश सर्वत्र आहे, हें लक्षांत ठेव ! ”

धृतराष्ट्र हे शब्द उद्गारतो न उद्गारतो तोंच हिडिंबापुत्र घटोत्कच श्रीकृष्णाचा संदेश घेऊन त्यांच्या पुढें येऊन उभा राहिला. तेव्हां “आपल्या शत्रुभवनांत ये आणि कृष्णाचा धिटाईचा संदेश काय आहे तो सांग.—” असें म्हणून दुर्योधनानें त्याचें स्वागत केलें ! घटोत्कचानें त्याच्याकडे लक्ष न देतां धृतराष्ट्राकडे वळून त्यानें त्यांना पांडवांचे प्रणाम सांगून नंतर आपणाहि प्रणाम केला. पण अभिमन्यु-वध नुकताच झाला असल्यामुळें धृतराष्ट्रास हा प्रणाम रुचला नाहीं. नंतर घटोत्कच जेव्हां म्हणाला कीं, “श्रीकृष्णाचा तुम्हांला कांहीं संदेश आहे,” तेव्हां “काय आज्ञा आहे श्रीकृष्णांची ? ” असें म्हणून धृतराष्ट्र आपलें आसन सोडून उठूं लागला. घटोत्कचानें “ उठण्याचें कारण नाहीं, बसूनचं ऐकावा कृष्णसंदेश—” असें सांगून त्यानें तो त्यास ऐकविला. “ एका पुत्राच्या वधामुळें जर अर्जुनाची अशी अवस्था होते तर शतपुत्रांच्या वधानें तुझी काय होईल ? यापुढें पुत्रदर्शनाकामीनें तुझ्या प्राणांचा बळी घेऊन ते त्याचेकडून जाळून टाकले जाऊं नयेत. एवढ्याकरितां तूं आपलें मन घट्ट करून ठेव ! ” हा कृष्ण-संदेश ऐकून दुर्योधनानें घटोत्कचाचा उपहास चालविला. तेव्हां त्याबद्दल

तिरस्कार दर्शवून घटोत्कचानें दुर्योधनास सांगितलें कीं "श्रीकृष्णाचा तुम्हांलाहि एक निरोप आहे." त्यावर दुर्योधन उद्गारला:–"माझ्यासारख्या पृथ्वीपतिला जो राजाहि नाहीं अशाचा निरोप!" दुर्योधनाचे कृष्णनिंदेचे हे शब्द घटोत्कचास सहन झाले नाहींत. तो म्हणाला–"पुत्रवधानें खवळून गेलेल्या अर्जुनानें उचललेलें शस्त्र फेकलें म्हणजे तुम्हां सर्वांचा नाश होईल!" ह्या त्याच्या भाषणाची शकुनीनें व दु:शासनानें फार हेटाळणी केली. त्यामुळें हें प्रकरण विकोपाला जाऊन घटोत्कच युद्धास सिद्ध झाला. त्यानें सर्वांना आपल्यावर चालून येण्याविषयीं आव्हान केलें! पण धृतराष्ट्रानें मध्यें पडून त्याला शांत करण्याचा प्रयत्न केला. ह्यावेळीं दुर्योधन घटोत्कचाला म्हणाला:—"कृष्णाला सांग कीं माझे बाण तुझ्या निरोपाला रणांगणांत उत्तर देतील!" हे शब्द ऐकतांच धृतराष्ट्राचा निरोप घेऊन घटोत्कच परत जावयास निघाला. जातां जातां त्यानें श्रीकृष्णाचा शेवटचा संदेश त्यांना सांगितला. तो संदेश असा होता:—

येतां तो उदयास भास्कर उद्यां त्याच्या सवें येइल।
येथें पांडवरूपि काळ तुमचा, तुम्हांस जो मर्दिल!॥

असें ह्या चिमुकल्या नाटकाचें वीररसोत्पादक कथामूत्र आहे.

हें नाटक व्यायोगातच मोडतें.

---

# "दूत घटोत्कच" नाटकांतील पात्रें.

**पुरुष पात्रें:—**

**धृतराष्ट्र**......कुरुपति, दुर्योधनाचा पिता.

**दुर्योधन**......हस्तिनापूरचा राजा; धृतराष्ट्राचा ज्येष्ठ पुत्र.

**दु:शासन**......धृतराष्ट्राचा द्वितीय पुत्र.

**शकुनि**....,...दुर्योधनाचा मामा; गांधार देशाचा राजा.

**भट**..........एक कौरवपक्षीय वीर.

**घटोत्कच**......भीमसेनाचा पुत्र.

**स्त्रीपात्रें:—**

गांधारी.......धृतराष्ट्राची पत्नी.

दु:शला...... " कन्या.

प्रतिहारी.....अंत:पुरावरील द्वाररक्षक स्त्री.

सूत्रधार.

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

महाकवि श्रीभास प्रणीत

# दूत घटोत्कच नाटक.

[ नांदी झाल्यावर सूत्रधार प्रवेश करितो. ]

सूत्रधार.— श्लोक [ वृत्त—व. ति. ]

जो एक आश्रय असे भुवनत्रयाचा ।
जो युक्ति—योजक असे सकला सुरांचा ॥
योजी उपाय अवनास्तव जो तयांच्या ।
तो श्रीधर प्रभु करो अवना जगाच्या ॥
जो हें जगत्त्रितय—नाटक चालवीत ।
प्रस्तावना परिसमाप्तिहि जो करीत ॥
जो वस्तुतंत्र—रचनीं धरि कार्यभार ।
रक्षो तुम्हांस विभु तो भव—सूत्रधार ॥ १ ॥

आर्यमिश्रांना माझी अशी विनंति आहे कीं, —(कांहीं ऐकलेसें करून) अरे, पण मी ही विनंति करण्यांत गर्क असतां हा गलका कसला बरं ऐकूं येत आहे ? हं, पाहूंच तर.

[ पडद्यांत. ]

“ अरे ! अरे ! कळवा—कळवा—आतांच्या आतां कळवा—”

सूत्रधारः—ठीक, ठीक. आलं लक्षांत. कृष्णासहवर्तमान अर्जुनाला संशप्तकांतील सैन्यानं गुंतवून टाकलं अस्तां, पूर्वी घडून आलेल्या भीष्म-वधामुळें क्रोधाला पेटलेल्या कौरवांनीं कुमार अभिमन्यूला वेढून आक्रमून टाकलं आहे ! पण आतां,—

साकी.

येउनि अर्जुन पुनरपि गांठिल, चित्तीं हें आणोनी ।
जों पार्थाच्या रथमार्गातें निरखिति सभय दृशांनीं— ॥

तोंच नृपति हे अभिमन्युशरें नष्टसंज्ञ होवोनी ।
जाती शिबिरां आपआपल्या,–रणकर्मा टाकोनी ! ॥ २ ॥

[ जातो.

ही " स्थापना " झाली.

---

[ तदनंतर एक भट ( वीर ) प्रवेश करितो. ]

भटः—शतपुत्रांच्या प्राप्तीमुळें ज्यांचें पितृत्व श्लाघनीय झालें आहे, आणि विज्ञानाच्या योगानं ज्यांचा विनय, वर्तन, आणि दूरदर्शित्व हीं विस्तार पावलीं आहेत, त्या धृतराष्ट्र महाराजांना आतांच्या आतां कळवा-एकदम कळवा कीं, जो सुभद्रासुत—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

मर्दूनि वीर, रथ, वाजि, करी, रणांत ।
जो क्षोभवी रिपुचमूप्रति त्या नितांत ॥
जो बाल दावि रणिं अर्जुन–वीरकर्म ।
हा ! हा ! तया वधिति आचरुनी अधर्म ! ।
वेगें नृपालशत–वीर चहूं कडूनी ॥
धांवूनि, गांठुनि तयास बळें करूनी ।
त्या देवलोकगत पांडु पितामहाच्या ॥
अंकावरी निजविती, शयनार्थ त्याच्या ! ॥ ३ ॥

[ नंतर धृतराष्ट्र, गांधारी, दुःशला, व प्रतिहारी प्रवेश करितात.

धृतराष्ट्रः—( ऐकून ) कसं-कसं म्हटलंत ?

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

हा ! हा ! कोण अशा वदूनि वचना माझ्या श्रुती दूषवी ।
सांगाया प्रिय वृत्त येउनि, मला दुष्टाक्षरें ऐकवी ! ॥
लागे डाग जयां अम्हां शिशुवधाच्या पातकाचा महा ।
गर्जूनी कुरुवंश–नाश सुचवी निःशंक त्यां कोण हा ? ॥ ४ ॥

गांधारीः—महाराज ! एवढंच नव्हे, पण हेंही स्पष्ट दिसतं कीं, ह्या गृहकलहांत आपल्या सर्व पुत्रांचा सर्वस्वी नाश होणार आहे !

धृतराष्ट्रः—गांधारि ! दिसतं खरं असं.

गांधारीः—( सभय ) पण हें केव्हां घडून यायचं आहे महाराज !

धृतराष्ट्रः—गांधारि ! ऐक.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

ज्याचा प्रज्वळला प्रकोप अजि ह्या सौभद्र—मृत्यूमुळें, ।
ज्याच्या रश्मि, तसा प्रतोद, कुपित श्रीकृष्ण—हस्तीं रुळें, ॥
ज्याचें उग्र धनू सहाय्यक, असा कौंतेय तें खेंचुनी—।
हें साधील समग्र आजचि, तदा ही शांत हो मेदिनी ! ॥५॥

गांधारीः—हे बाळा, अभिमन्यो ! ह्या असल्या प्रकारचा उत्तम उत्तम पुरुषांचा संहार करणारा हा गृहकलह चालू असतां त्यांत आमच्या दुर्भाग्यानें आम्हांला बुडवून तूं कोठें गेलास ?

दुःशलाः—ज्याच्यामुळं आज उत्तरेला वैधव्य प्राप्त झालं आहे, त्यानंच आज आपल्याकडील तरुण स्त्रियांवर वैधव्य वाढून आणलं आहे.

धृतराष्ट्रः—बरं पण हा संकटसागर तरून जायला हा सेतू तरी कोणी बांधला ?

भटः—( पुढें येऊन ) मी महाराज !

धृतराष्ट्रः—तूं कोण ?

भटः—मी जयत्रात आहे, महाराज !

धृतराष्ट्रः—जयत्रात !

( साकी )

अभिमन्यूतें कोणी वधिलें ? कोण जिवाला विटला ?
पांडव—पंचाग्नीचें केलें इंधन कुणि अपुल्याला ? ॥ ६ ॥

भटः—महाराज ! पुष्कळशा राजांनीं एकत्र जमून कुमार अभिमन्यूला ठार केलं. परंतु विशेषंकरून जयद्रथ कारण झाला आहे.

धृतराष्ट्रः—काय ? जयद्रथ कारण झाला ?

भटः—होय महाराज !

धृतराष्ट्रः—हाय ! तर जयद्रथ मेलाच !

[ हें ऐकून दुःशला रडूं लागते ]

ही रडते आहे कोण ?

**प्रतिहारी:**—महाराज ! राजकन्या दुःशला.

**धृतराष्ट्र:**—बाळे ! पुरे, पुरे हें रडणं ! कारण असं पहा—

आर्या ( गीति )

प्राणा स्वकीय ज्यानें अर्जुन–बाणांस लक्ष्य ते केले ।
त्या तव पतिला, वत्से! बहुधा सौभाग्य तव न तें रुचलें ! ॥७॥

**दुःशला:**—असं जर आहे तर बाबांनीं मला आज्ञा द्यावी, म्हणजे मीहि–जिथं आपली सून उत्तरा आहे तिथं–तिच्याच जवळ जाईन !

**धृतराष्ट्र:**—बाळे ! उत्तरेकडे जाऊन तिला तूं काय म्हणणार ?

**दुःशला:**—बाबा ! तिच्याकडे जाऊन तिला मी असं म्हणेन कीं:—आजपासून मीहि तुझ्या सारखाच वेष ग्रहण करायला आलें आहे !

**गांधारी:**—बाळे ! छे: छेः असं अमंगल भाषण करूं नकोस. अगं, तुझा पति अजून जिवंत आहे.

**दुःशला:**—आई ! एवढं कुठं आहे माझं भाग्य ? अगं श्रीकृष्ण ज्याचा पाठिराखा आहे त्या धनंजयाचं अप्रिय केलं असतां कोण बरं जिवंत राहील ?

**धृतराष्ट्र:**—ही दीनवाणी दुःशला बरोबर बोलली ! कारण हा अभिमन्यू–

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

जो वाढे, चिर लाभुनी हरिभुजा त्याच्या उशीकारणें ।
कृष्णाचा–शयनार्थ लाभत जया तो अङ्क आत्मार्पणें ॥
जो प्रेमें मदमत्त त्या हलधरा हो दूसराची मद ।
पार्थाचा–सुरतुल्य विक्रमि अशा–जो एक प्रेमास्पद ।
त्याचा घात करून कोण अपुल्या ह्या दुष्कृतीनीं तगे ?
या लोकीं चिर जीवितास धरुनी,–तो कोण कैसा जगे ! ॥८॥

अरे, जयत्राता ! स्वतःच्या पुत्राची ही अशी अवस्था झाल्याचं पाहिल्यावर त्या गाण्डीवधन्व्यानं पुढं काय केलंन ?

**भट:**—महाराज ! हा प्रकार अर्जुन तिथं असतांना घडला असं कां वाटतं आपल्याला ?

**धृतराष्ट्र:**—काय ? तर मग अर्जुनहि तिथं नव्हता म्हणतोस ?

**भट:**—होय, नव्हता महाराज !

धृतराष्ट्रः—मग हें असं कसं घडून आलं ?

भटः—ऐकावं महाराजांनीं. श्रीकृष्णाचं सहाय्य असलेल्या अर्जुनाला संशप्तकांतील सैन्यानं गुंतवून टाकलं असतां, कुमार अभिमन्यू—बाळपणामुळें त्याला भावी संकट न कळल्यामुळें—युद्धाला तयार झाला !

धृतराष्ट्रः—हाय ! हाय ! मग बरोबरच झाला म्हणायचा त्याचा वध ! गुहेंत वाघ असतां गुहेंत जाण्याची दुसऱ्या कोणाला छाती होईल? बरं पण बाकीचे पांडव काय करीत आहेत ?

भटः—ऐकावं महाराजांनीं, ते—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

त्या अर्जुनास सुतदर्शन तें कराया ।
प्रेता चितेवरि न ठेविति, ऐक राया ! ॥
त्याचेवरी नृपति जे करिती प्रहार ।
तन्नाम पांडुसुत घेति अनेक वार ! ॥ ९ ॥

धृतराष्ट्रः—गांधारि ! चल ये तर मग, आपण गंगातटाकींच जाऊं या.

गांधारीः—महाराज ! तिथं जाऊन काय स्नान करायचं ?

धृतराष्ट्रः—ऐक, गांधारी !—

श्लोक [ वृत्त—इं. वज्रा. ]

स्वीयापराधेंचि तुझ्या सुतांना ।
येणार मृत्यू म्हणुनी तयांना ॥
मी आजची तार्पतसें तयांते
देऊनिया स्वीयकरें जलातें ! ॥ १० ॥

[ नंतर दुर्योधन, दुःशासन, व शकुनि हे प्रवेश करितात. ]

दुर्योधनः—वत्सा ! दुःशासना !

श्लोक [ वृत्त—गीतिका ]

अभिमन्युच्या निधनें पहा अजि वैर हें स्थिर जाहलें ! ।
जय पावलों रणिं मर्दुनी रिपु येति जे चढुनी बळें ॥
मधुसूदनाप्रति गर्व जो उपटूनि तो अजि टाकिला ! ॥
मम वैभवा समवेत या नव तेज ये मम कीर्तिला ! ॥ ११ ॥

दुःशासनः—अहो,—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

युद्धीं आक्रमुनी जयद्रथबलें ती शत्रुसेना महा ।
सौभद्रा अपरार्जुनास वधिलें बाणें असंख्यें पहा ॥
होतो संकटिं थोर भीष्म—निधनें, तें आज होई दुरी ।
पुत्रा मर्दुनि बाण तीव्र खिळिले त्या पांडवांच्या उरीं ! ॥१२॥

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

शकुनिः—

स्वपौरुषा आज रणीं जयद्रथ— ।
अतर्क्य—भूपां,—कृतिनेंचि दावित ॥
सुतासवें, अप्रतिमा यशासही— ।
हरी तयांच्या, घनघोर विग्रहीं ॥ १३ ॥

दुर्योधनः—मामा !

शकुनिः—काय वत्सा ?

दुर्योधनः—मामा ! जरा इकडं या. वत्सा, दुःशासना ! तूंहि इकडं यें पाहूं. आपण धृतराष्ट्र तातांना नमस्कार करूं या.

शकुनिः—छेः वत्सा दुर्योधना ! या भानगडींत न पडलेलंच बरं. कारण—

श्लोक [ वृत्त—हरिणी ]

गृहकलह हा ताता तूझ्या रुचे न खरोखरी ।
प्रिय तनय त्या पांडूचे ते, म्हणून परोपरी— ॥
तुजसह अम्हां देती दोषा, किती तरि निंदिती; ।
वदातिल अम्हीं जातां तेथें कठोर वचांप्रती ! ॥
जय मिळवुनी ऐसा मोठा, रणास त्यजूनिया ।
मुदित वदनें जाणें तेथें न होइल मान्य त्यां ! ॥ १४ ॥

दुर्योधनः—मामा ! छेः छेः असं म्हणूं नका. काय होईल तें होवो. तातांना आपण सर्वजण नमस्कार हा करूंयाच. ( इकडे तिकडे फिरून धृतराष्ट्रास ) तात ! मी हा दुर्योधन आपल्याला नमस्कार करीत आहे.

दुःशासनः—तात ! मी हा दुःशासन आपल्याला नमस्कार करीत आहे.

शकुनिः—हा मी शकुनि आपल्याला प्रणाम करितों.

सर्वजण:—आपणांकडून आम्हांला आशीर्वाद मिळत नाहीं, हें कसं ?

धृतराष्ट्र:—बाळा ! काय आशीर्वाद ?

आर्या-( गीति. )

कृष्णार्जुनहृदयचि जो वधुनी त्या बालकास सौभद्रा ।
आशा न ज्यां जिवांची त्यां आशी देउं मी कशी भद्रा ! ॥१५॥

दुर्योधनः—तात ! आपल्याला ही भीती कशामुळं वाटते ?

धृतराष्ट्रः—काय ? कशामुळं ही भीति वाटते म्हणतोस ?

श्लोक [ वृत्त—भु. प्र. ]

कुळा आमुच्या शोभवीलें अनेका—।
सुतांनीं, परी कन्यकेनेंचि एका ॥
सुतांच्या शताहून ती एक कन्या ।
मला वाटते लाभली पूर्ण धन्या ! ॥
तुम्हां बांधवांच्या प्रसादें तियेतें ।
अहा ! निंद्य वैधव्य येणार वाटे ! ॥
तयाचीच भीती मला वाटताहे ।
विचारा दुज्या चित्तिं थारा न पाहे ! ॥ १६ ॥

दुर्योधनः—पण इथं जयद्रथाचा काय संबंध ?

धृतराष्ट्रः—वरप्राप्तीच्या जोरावर त्यानं पांडवांना पीडा दिली आहे.

दुर्योधनः—काय, त्यानं पीडा दिली आहे ? तशी ती दुसऱ्या पुष्कळ जणांनींहि दिली आहे ?

धृतराष्ट्रः—मोठी खेदाची गोष्ट !

( साकी )

निर्दय खळ ते पुष्कळ मिळुनी प्रहारितां बालास—।
एकट्यास त्या, पतन न घडलें केंवि तदीय भुजांस ? ॥१७॥

दुर्योधनः—तात !

आर्या-( गीति. )

कपटें वृद्धा भीष्मा वधितां गळल्या न अरि-भुजा जरि त्या ।
युव-विक्रमी शिशूतें वधितां गळतील तरि कशा अमुच्या ? ॥१८॥

धृतराष्ट्रः—पुत्रा, दुर्योधना ! अरे, भीष्माचा घात आणि अभिमन्यूचा घात हे सारखेच काय ?

दुर्योधनः—तात ! कां बरं सारखे नाहींत ?

धृतराष्ट्रः—अरे, ऐक कां तें—

आर्या (गीति. )

इच्छामरणी होते भीष्म महाभाग जे रणीं निजले ।
निज उपदेशानेंची आत्मानंदींच ते सदा रमले ॥
हा तर केवळ बालक जणुं पहिला कोंब अर्जुना फुटला ! ।
कुरुवंशनाथ जो कीं ! अंकुर त्याचा असे तुम्हीं खुडला ! ॥१९॥

दुःशासनः—तात ! वयानें तो बालक असला तरी कृतीनें कांहीं तो बालक नव्हता. अभिमन्यूनें—

धृतराष्ट्रः—काय ? काय ? कोण दुःशासन बोलतो आहे ?

दुःशासनः—होय महाराज !

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

होतों आम्हि पहात, युद्ध करितां, प्रत्यक्ष या लोचनीं
हातीं उज्वल इंद्रवज्रसम त्या चापाप्रती घेउनी
होता विद्ध करीत तो नृपवरां बाणां बहू वर्षुनी
जैसा भास्कर रश्मिना वितरुनी टाकी जना वेष्टुनी ॥२०॥

धृतराष्ट्रः—हाय ! हाय ! फारच खेदाची गोष्ट !

आर्या [ गीति. ]

असुनी बालक जरि करि अभिमन्यू एकलाचि समर असें ॥
तरि सांग पुत्रनिधनें होउनि संतप्त पार्थ करिल कसें ? ॥२१॥

दुर्योधनः—काय ? कसें काय करील ?

धृतराष्ट्रः—असें करील—कीं जे तुमच्यातले जगतील, तेच तें बघतील

दुर्योधनः—तात ! असा कोण—आहे तरी कोण अर्जुन ?

**धृतराष्ट्र:**—काय ? अर्जुनाचा पराक्रम तुला माहीत नाहीं ?

**दुर्योधन:**—हो, नाहीं माहीत.

**धृतराष्ट्र:**—तर मग तो मलाहि माहीत नाहीं. परंतु अर्जुनाचा पराक्रम जाणणारे पुष्कळ आहेत, त्यांना विचार !

**दुर्योधन:**—तात ! अर्जुनाचा पराक्रम ज्यांना माहीत आहे असे कोण आहेत ? कोणाला विचारूं मीं ?

**धृतराष्ट्र:**—ऐक, पुत्रा !

**साक्या.**

निवातकवचा वधुनि तयाच्या प्राणा उपहारातें ।
देउनि ज्यातें पूजियलें त्या विचार इंद्राप्रति तें ॥
विविधास्त्रांनीं लढुनि ज्याशीं, तोषविलें समरांत ।
किरातरूपी तया शिवाशीं विचार अर्जुन-वृत्त ॥
भुजंगमाहुति असती प्रिय ज्या, विचार त्या अग्नीतें ।
तोषविलें ज्या विजयें अर्पुनि त्या खांडव-विपिनातें ॥
निगडित केलें युद्धामध्यें जिंकुनि ज्यानें तुजला ।
त्या चित्रांगद गंधर्वाला विचार तद्-वृत्ताला ! ॥ २२ ॥

**दुर्योधन:**—हेंच जर अर्जुनाचें वीर्य असेल, तर त्याच्या तोलाचे वीर आमच्या सैन्यांत नाहींत कीं काय ?

**धृतराष्ट्र:**—पुत्रा ! असल्यास,—कोण बरं ते ?

**दुर्योधन:**—हा कर्णच नाहीं का एक.

**धृतराष्ट्र:**—म्हणजे बिचाऱ्या कर्णाचें हंसेंच हें !

**दुर्योधन:**—तें कां ?—कस हसं ?

**धृतराष्ट्र:**—ऐक,—

**श्लोक [ वृत्त—शा. वि. ]**

ज्याचें इंद्र हरीतसे कवच तें, अज्ञात ज्या दक्षता ।
ज्यातें अर्धरथीच वीर गणिती, दानींच ज्या शूरता ॥
ज्याचें निष्फल होत अस्त्रबल तें, जें वंचनें लाभलें ।
त्यातें अर्जुन-पात्रता कधिंतरी येईल कां ही कळें ? ॥

त्यातें अर्पिति इंद्र, रुद्र, शुचि, ते अस्त्रें सुदिव्यें जरी ।
लाभोनी गुरु थोर, काय तरि त्या ये अर्जुनाची सरी ? ॥२३॥

शकुनिः---आमची हेटाळणी करायला आपण समर्थ आहांत !

धृतराष्ट्रः---हें शकुनीच बोलत आहे का ? अरे, शकुनि !

आर्या ( गीति )

द्यूतीं रत जो तूं त्या केलें जें कर्म तेंच विस्तरुनी ।
कुरुकुल-वैरानल हा न शमे, भडके शिशूंचिया हननीं ! ॥२४॥

दुर्योधनः---अरे !

आर्या ( गीति )

अवचित उठत असे हा सह-गर्जित भूमिकंप कोठुनिया ? ॥
या उल्कापातांनी वाटे हें गगन जात उजळुनिया ! ॥ २५ ॥

धृतराष्ट्रः---पुत्रा ! मला असं वाटतं कीं---

दिंडी.

पौत्र झाला आजि हा रणीं ठार ।
बघुनि पीडित तो इंद्र हृदयिं फार ॥
म्हणुनि उल्कारूपेंचि अश्रुबिंदू ।
ढाळिताहे, दाटुनी शोक-सिंधू ! ॥ २६ ॥

दुर्योधनः---जयत्राता ! तूं जा, आणि पांडवांच्या शिबिरांकडून शंख, दुंदुभि आणि सिंहनाद यांचे आवाज मिश्र होऊन ऐकूं येणारा हा गलका कशामुळें होत आहे तें समजून घेऊन ये.

भटः---जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन पुनः परत येऊन ) संशप्तकांतील वीरांनीं तेथें गुंतवून ठेवलेला अर्जुन संशप्तक सोडून परत आला. परत आल्यावर आपल्या मृतपुत्राचें शव आपल्या मांडीवर घेऊन, तो अश्रूंनीं भिजवून सोडीत असतां, श्रीकृष्णानं त्याचा उपहास केल्यामुळें, अर्जुन प्रतिज्ञा करून चुकला आहे !

दुर्योधनः---( आपल्याच विचारांत गर्क असलेला ) काय ? काय म्हणतोस ?

भटः---आणि---

आर्या [ गीति. ]

त्याच्याच प्रतिज्ञेनें हृदयीं होऊनि तुष्ट नृपतींनीं ।
त्याच्याच विक्रमानें पावुनि उत्साह मुदितशा वदनीं ॥
आतांच प्राप्त झाला विजय, असें मानुनी सुवीरांनीं ।
केला जयघोष महा एकाकी हा मिळूनि सकलांनीं ॥
नाद-प्रकर्ष ह्यापरि होउनि सर्वत्र जाय तो घुमुनी ।
तेव्हां मोठे मोठे पार्थिव पृथ्वीधरेंद्र हादरुनी ॥
एकाकारचि होउनि पडतां आक्रांत होउनी धरणीं ।
तत्क्षणिं कंपित झाली जैशी व्हावी भयाकुला तरुणी ! ॥२७॥

धृतराष्ट्रः— श्लोक. [ वृत्त अनुष्टुभ ]

प्रतिज्ञेच्याच घोषानें । कांपली ही वसुंधरा ॥
धनुष्या स्पर्शितां वाटे । त्रैलोक्यहि हलेल हें ॥ २८ ॥

दुर्योधनः—काय ? अशी प्रतिज्ञा तरी काय केली आहे त्यानं ?

भटः— आर्या ( गीति. )

" वधुनी मम पुत्रातें, त्यांतचि आनंद मानिला ज्यांनीं ।
त्यांना सूर्यास्ताच्या पूर्वी उदईक वधिन बाणांनीं ॥ २९ ॥

अशी प्रतिज्ञा आहे त्याची !

दुर्योधनः—त्याची प्रतिज्ञा भंग पावेल असा मी प्रयत्न करितों.

धृतराष्ट्रः—अरे, काय प्रयत्न करणार तूं ?

दुर्योधनः—माझ्या अकरा अक्षौहिणी सेनेनं मी जयद्रथाला पार दडवून ठेवीन ! आणखी मग—

श्लोक. [ वृत्त—इं. व. ]

आज्ञापिती द्रोण जसें तशाच— ।
व्यूहा अभेद्या विरचूनि साच ॥
शत्रूस टाकीन करूनि खिन्न ।
इच्छा जयांच्या फळल्या मुळीं न ॥
योद्धयांसवें हस्तिसवें स्वतातें ।
घेतील घालूनि हुताशनीं ते ! ॥ ३० ॥

धृतराष्ट्र — आर्या ( गीति. )

जावो क्षित्युदरीं रिपु, कीं जावो अंबरांत तो चढुन।
ते कृष्णचक्षु—सायक जातिल त्याच्या कुठेंहि मागून ॥ ३१ ॥

श्लोक [ वृत्त—अनुष्टुभ ]

नित्य शासन—दक्षा या । नृपाला क्रूर ह्या अशा ।
बोलता अन्य हें कोणी । येता त्या मृत्यु तत्क्षणीं ॥ ३२ ॥

[ इतक्यांत घटोत्कच प्रवेश करितो. ]

घटोत्कचः—अहो, मी हा—

श्लोक [ शा. वि. ]

ज्या दुष्टें अभिमन्यु-नाश करण्या संप्रेरिले वीर ते।
आलों आज तया अनार्य-हृदया देखावया शत्रुतें ॥
सांगायास्तव चक्रपाणि-वच तें, जातों रिपूच्या पुढें— ।
जैसा इंद्र-गजेंद्र अंकुशभयें जाई बलीच्या पुढें ॥ ३३ ॥

( खालीं पाहून ) देवडीवरच्च आंत जायला हें दुसरं एक दार दिसत आहे. तर आतां इथंच खालीं उतरावं ( उतरून ) आपण, कोण काय हे आतां माझं मीच सांगतो. ( जवळ जाऊन )

आर्या [ गीति ]

हैडिंब घटोत्कच मी, आलों घेउनि निरोप यदुपतिचा।
भेटायास गुरुजना,— जो निज दोषेंचि होइ रिपु अमुचा ॥

दुर्योधनः—ये, ये ! निज रिपुभवनीं, कौतूहल बहु गमे मना माझ्या।
हा मी दुर्योधन, मज आयकवी उद्धटा वचा हरिच्या ! ॥३४॥

घटोत्कचः—( आंत प्रवेश करून ) अरे ! हे तर धृतराष्ट्र महाराज आहेत इथं ! यांची आकृति-ठेवण-मोठी सुंदर आणि भव्य आहे! आश्चर्य! आश्चर्य !

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

हा आहे जरि वृद्ध, त्या सुरकुत्या याच्या न अंगावरी
ह्याचे स्कंधहि पीळदार असुनी ते पुष्ट ही दीसती ॥
याचा आदर वाटतो, जणुं शतां पुत्रांमुळें उद्भवे
याचें रूप तसेंच वीर्य सकलां देवांस ना साहवे ॥

वाटे घेइल स्वर्ग हा म्हणुनिया अत्यंत भीतीमुळें
देवांनीं धृतराष्ट्र-देह रचुनी जन्मांध या निर्मिलें ! ॥३५॥

( धृतराष्ट्रास ) आजोबा ! आपल्याला प्रणाम करीत आहे हा.

धृतराष्ट्रः—ये, ये. पुत्रा ! ये.

आर्या [ गीति. ]

प्रिय वच जरि तव आहे, लागेना गोड माझिया श्रुतिशीं
कारण निजबंधूंच्या नाशें तूं व्यथित-हृदय बा असशी
मीही मम तनयांच्या दोषानें मूढ जाहलों आहे
तेव्हां तुझ्या मनांतिल आशय लक्षांत ये न मम पाहे ! ॥३६॥

घटोत्कचः—अहाहा ! महाराजांचं दर्शन केवढं कल्याणकारक आहे ! सर्व कल्याणाचं प्रसवस्थान जे आपण पितामह त्यांना भगवान् चक्रायुधाचं असं सांगणं आहे—

धृतराष्ट्रः—( आसनावरून उठून ) काय आज्ञा आहे भगवान् चक्रायुधांची ?

घटोत्कचः—छेः छेः छेः उठायला नको असं. आसनावर बसूनच जनार्दनाचा संदेश ऐकावा आपण.

धृतराष्ट्रः—( बसून ) सांग तर भगवान् चक्रायुधांची काय आज्ञा आहे ती.

घटोत्कचः—ऐकावं पितामहानीं. भगवानांच्या तोंडून उद्गार निघाले ते असेः—'हाय, हाय ! हे वत्सा ! हे बाळा, अभिमन्यो ! हे कुरुकुलदीपका हे यदुकुल-पल्लवा ! अरे, तूं आपल्या मातुलाला—ह्या जनार्दनाला—टाकून देऊन आपल्या आजाच्या भेटीच्या इच्छेनें स्वर्गाला गेलास ना ? ' अभिमन्यूबद्दल असे दुःखोद्गार काढून आपल्याला उद्देशून श्रीकृष्ण म्हणालेः—'अहो, पितामह ! एका पुत्राच्या वधामुळं जर अर्जुनाची अशा प्रकारची अवस्था होते तर आपली शतपुत्रांच्या वधानं—काय होईल बरं ? एवढ्या करितां तुम्हीं आतां ताबडतोब आपलं मन अगदीं घट्ट करून ठेवावं;—अशा करितां कीं, पुत्रशोकामुळं उत्पन्न होणाऱ्या अग्नीनं आहुति म्हणून तुमच्या प्राणांचा बळी घेऊन ते जाळून टाकूं नयेत ! '

धृतराष्ट्रः— आर्या ( गीति. )

सक्रोध कृष्ण वदला वच हें निश्चित करूनि निज मतितें ॥
सकल क्षात्रवधार्थचि सज्जधनू पार्थमूर्ति मज दिसते ! ॥ ३७ ॥

दुर्योधनः—( घटोत्कचास ) अरे ! हें तुझं बोलणं हंसू येण्या सारखंच आहे.

घटोत्कचः—हंसू येण्या जोगं असं काय आहे यांत ?

दुर्योधनः—हें आहे हंसू येण्या जोगं,—

आर्या [ गीति. ]

मारील एकटाची अर्जुन नृपमंडलास समरांत—
मत्सरयुत कृष्ण असें वदत असे देव-मंत्रणें दिसत ! ॥३८॥

घटोत्कचः—मला त्या चक्रपाणी—[आर्या—गीति]

श्रीकृष्णें प्रेषियलें, ऐकविण्या पार्थ काय करणार,—
त्या दूता तुम्हि हंसता, युक्त तुम्हांलाचि हा सदाचार ! ॥ ३९॥

आणखी, दुर्योधना ! तुलाहि पण श्रीकृष्णांचा एक निरोप आहे.

दुःशासनः—अरे ! क्षत्रियाचा उपमर्द करणाऱ्या ! बस्स, पुरे—पुरे आतां तुझा तो निरोप !

श्लोक [ वृत्त—इं. व. ]

पृथ्वीवरी सर्वहि पार्थिवांते
आज्ञा जयाची द्रुत मान्य होते
संदेश त्यातें अजि धाडिताहे
राजा न ही जो ! किति धाष्टर्य पाहे ! ॥४०॥

घटोत्कचः— कसं—कसं म्हणता ? चक्रधर श्रीकृष्णांना तुम्ही अराजा समजता ! राजा समजत नाहीं ? मोठी खेदाची गोष्ट !

श्लोक [ वृत्त. शा. वि ]

ज्यांचा दर्प तसाच मानहि गळे ऐशा नृपांते करी
बंधांतून विमुक्त, मर्दुनि जरासंधाप्रती श्रीहरी ॥
होतें पाहत राजमंडल जधीं तें दीन होऊनिया
नेई भीष्मक—कन्यका हरि तधीं सर्वांस धर्षूनिया ॥

लक्ष्मी मूर्तिमती जया पदतलीं सानंद सोत्साहते
आज्ञेची जणुं वाट पाहत उभी शय्यागृहीं राहते ॥
सर्वांच्या स्तुतिला सुपात्र हरि जो राजा नृपांचा असे
तो चक्रायुध, भूपते ! तुजप्रती कैसा न राजा दिसे ! ॥४१॥

दुर्योधनः—दुःशासना ! वत्स, पुरे. उगीच वाद कशाला ?

[ श्लोक—वृत्त अनुष्टुभ ]

असो राजा, अराजा कीं । बळी कीं दुर्बळी असो ॥
या वादें लाभ तो काय ? । सांग जें त्वत्प्रभू वदे ॥४२॥

घटोत्कचः—हो, हो. तो आमचा प्रभु आहे. मग काय—मग काय म्हणणं आहे आपलं ? ते भगवान् नारायण साऱ्या त्रिभुवनाचे नाथ आहेत, प्रभु आहेत. विशेषें करून ते आमचे प्रभु आहेत. शिवाय दुसरी गोष्ट, अर्जुन खवळून जाऊन—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

जेव्हां पुत्रवधामुळें उचलुनी उग्रास्त्र तें फेंकिल, ॥
तेव्हां युद्ध—मुखीं सुदुष्कर असें कांहीं न त्या राहिल ! ॥
आला त्या क्षणिं तो विनाश समजा त्या क्षत्रियां सर्वही ! ॥
भूपांचीं पडुनी शतावधि शवें, पावो लघुत्वा मही ! ॥४३॥

शकुनिः— आर्या ( गीति. )

केवळ शब्दोच्चारें ये जिंकाया वसुंधरा जरि ही ॥
जिंकिलि वसुंधरा तरि तुम्हीं ही, मान्य हें अम्हां पाही ! ॥
उच्चारुनिया वदनें वाक्या मागून वाक्य जरि येई— ॥
क्षत्रिय—वध करण्यातें, तरि सर्व क्षत्र—हनन तें होई ! ॥४४॥

घटोत्कचः—अरे, अरे ! हा शकुनि बोलतो आहे ! अरे, शकुने !

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

फासे फेंकुनि दे करस्थ, शकुने ! अष्टापदा त्या रची
जो बाणग्रहणास युद्ध—समयीं होईल गा युक्तची ॥
रे ! येथें अबलापहार नच वा, ना राज्य-तंत्रें महा
प्राणांचा पण येथ, तीक्ष्ण शर ते सौख्यार्थ येथें पहा ! ॥४५॥

दुःशासनः—अरे तुरे करून—

श्लोक [ वृत्त—स्त्रग्धरा ]

मर्यादा सोडुनी तूं वदशि कटु वचें, तुच्छ, तैशीं कठोर
हस्तातें चाळवूनी, अवगणिशि अम्हां मांडुनी चार चार !।
मातेच्या पासुनी ये तुजशिं जरि असा दर्प उग्रस्वरूप
आम्हींही राक्षसांची प्रतिकृति वरितों उग्र रुद्रस्वरूप ! ।।४६।।

घटोत्कचः—शांतं पापं, शांतं पापं ! राक्षसांच्यापेक्षां देखील तुम्ही जास्त क्रूर आहां. कारण—

श्लोक [ वृत्त—हरिणी ]

रजनिचर ते देखूनीया स्वबांधव निद्रित
जतुसदनिं त्या जाळायातें कधींहि न वांञ्छित ! ।।
रजनिचर ते केशस्पर्शा स्वबंधु—वधूचिया
कधिं न करिती स्वीयें हस्तें कुबुद्धि धरूनिया ! ।।
निज—सुतवधा केलें नाहीं कधींहि निशाचरीं
समर घडलें वेळोवेळां स्मरें नच हें परी ।।
विकृत—वपु कीं उग्राचारी असोत निशाचर
त्यजिति न दया केव्हांही ते जरीहि निशाचर ! ।।४७।।

दुर्योधनः— आर्या ( गीति )

आलास दूत होउनि, नच येथें संगरार्थ आलास !
घेउनि जा संदेशा कुरु कधिं करिती न दूत—घातास ! ।।४८।।

घटोत्कचः—काय, काय ? मला दूत म्हणून माझी हेटाळणी करितोस? अरे, पण तें नकोच तमं. मी दूतच नव्हे.

आर्या [ गीति. ]

तव दर्पोक्ति पुरे ही ! या सगळे चालुनी प्रहारार्थ ।।
गुण-विच्छेदें हतबल अभिमन्यु न, हा हिडिंब-सुत येथ! ।।४९।।

मी अल्पवयी असलों तरी पण माझी ही अशी दांडगी इच्छा आहे,—

आर्या. ( गीति )

मुष्टी उभारुनी ही, चावित ओष्ठास तिष्ठलों येथें ! ।
युद्धा उठो पुरुष तो,—जो इच्छी देखण्या यमालय तें ! ।।५०।।

**धृतराष्ट्रः**—या कुमारा घटोत्कचा ! शांत कर–शांत कर आपला कोप. मी काय म्हणतों तें ऐक.

**घटोत्कचः**—कोप आवरून धरणं माझ्या शक्तीच्या बाहेरचं आहे. तरी पण पितामह म्हणतात तर मी दूतच आहे. भगवान् नारायणांना काय आहे आपली विनंति ?

**दुर्योधनः**—कुणाला विनंति ? त्याला मी असं म्हणतों म्हणून सांग कीं:–

**श्लोक** [ वृत्त–शा. वि. ]

**" कां ऐशा बहु भाषणास करिशी ? आम्हीं तुला जिंक्य न ॥**
**तूतें उत्तर कोण दे ? तुज मिळे तें जेथ चालें रण ! ॥**
**जेव्हां जाइन मी नृपावलिसवें युद्धार्थ त्या संगरीं ॥**
**तेव्हां तूं बघशील ती नृपशतच्छत्रावली त्यांवरी ॥**
**राही तेथ उभा कटी कसुनिया त्या पांडवांच्या सह ॥**
**माझे बाण तिथेंचि उत्तर तुला देतील ते दुःसह ॥५१॥**

समजलास ?

**घटोत्कचः**—पितामह ! हा मी येतों तर.

**धृतराष्ट्रः**—कुमारा ! ये, ये.

**घटोत्कचः**—अहो, राजे लोक हो ! श्रीकृष्ण जनार्दनाचा शेवटचा संदेश ऐका: —

**श्लोक** [ वृत्त–शा. वि. ]

**धर्माचार वरा, स्वकीय जन जे त्यांचें करा चिंतन ।**
**जें जें इच्छितसा मनांत सगळें टाका रणीं सारुन ॥**
**येतां तो उदयास भास्कर उद्यां, त्याच्या सवें येइल ।**
**येथें पांडवरूपि काळ तुमचा, तुम्हांसि जो मर्दिल ! ॥५२॥**

हाच भगवान् श्रीकृष्णाचा शेवटचा संदेश !

[ सर्व जातात. ]

**"दूत घटोत्कच" समाप्त.**

**शुभं भुयात्.**

# 'अभिषेक' नाटकाचें कथासूत्र.

रामायणांतील कथेच्या आधारें लिहिलेलीं भासकवीचीं जीं दोन नाटकें आज उपलब्ध आहेत. त्यांपैकीं अभिषेक नाटक हें दुसरें नाटक होय. प्रतिमानाटकाला जर पूर्वरामायण म्हटलें तर ह्या नाटकाला भासाचे उत्तररामायण म्हणतां येईल. किष्किंधा, सुंदर व युद्धकांड या रामायणांतील कांडांचा कथाभाग यांत कवीनें आणला आहे. प्रतिमानाटकाचें जसे ७ अंक आहेत तर याचे ६ आहेत. हें अभिषेकनाटक ज्या अर्थी रामायणांतील कथाभागावर लिहिलेलें आहे त्या अर्थी यांत श्रीरामचंद्राच्या अभिषेक-प्रसंगाशिवाय दुसरा कोणचा कथाभाग अभिप्रेत असणार ? यांत सीताहरणानंतर रामचंद्र सुग्रीवाशीं सख्य करून, लंकेवर चालून जाऊन रावणाचा वध करून सीतेस सोडवून आणीत आहेत, हा कथाभाग मोठ्या कौशल्यानें गुंफिला असून नंतर सीता-शुद्धि होऊन रामचंद्र तिचा स्वीकार करीत आहेत आणि याच वेळीं त्यांना राज्याभिषेक होत आहे असें दाखविलें आहे. यामुळें हें नाटकाचें नांव यथार्थ झालें आहे. पण कवीनें याच नाटकांत आणखीहि दोन राज्याभिषेकांच्या घटना मोठ्या चातुर्यानें जुळवून आणून त्या योग्य ठिकाणीं सूचित केल्या असल्यामुळें ह्या नांवाला अधिकच याथार्थ्य आणि रमणीयत्व आलें आहे. हे दोन अभिषेक म्हणजे एक सुग्रीवाचा आणि दुसरा बिभीषणाचा. पहिल्या अंकाच्या शेवटीं वालीच्या वधानंतर सुग्रीवाच्या अभिषेकाची तयारी करण्यास रामचंद्र लक्ष्मणास आज्ञा करीत आहेत. आणि चवथ्या अंकांत बिभीषण रावणाला सोडून जेव्हां रामचंद्राला शरण येतो तेव्हां रामचंद्र 'आजपासूनच तूं लंकेश्वर हो' असें म्हणून त्यास आशीर्वाद देत आहेत आणि पुनः रावणवधानंतरहि ते त्याला 'लंकाधिपते' !' म्हणून संबोधित आहेत. ह्या दोन्ही सूचक गोष्टींमुळें नाटकाच्या नांवासंबंधानें आम्हीं वर केलेलें विधान किती समर्पक आहे तें वांचकांच्या लक्षांत येईल.

नाटकारंभीं स्थापनेमध्यें रामलक्ष्मण सुग्रीवाला वालीचे सिंहासनावर स्थापण्याकरितां किष्किंधा नगरीला गेले असल्याचें दाखविलें आहे. त्या पुढील प्रवेशांतील कथाभाग असाः—रामाच्या शरप्रभा-

याची खात्री पटलेले सुग्रीव आणि हनूमान् हे रामलक्ष्मणास किष्किंधेच्या जवळ घेऊन गेले. तेथें गेल्यावर सुग्रीवानें मोठ्यानें भुभुःकार करून वालीला युद्धास पाचारण केलें. वालीची पतिव्रता पत्नी तारा वालीचें वस्त्र धरून त्याला न जाण्याविषयीं परोपरीं विनवूं लागली. परंतु वालीनें तिला निष्ठुरपणें अंतःपुरांत जावयास सांगितलें आणि तो सुग्रीवापुढें एकदम दत्त म्हणून येऊन उभा राहिला. तेव्हां अर्थातच वाली-सुग्रीवाचें मोठें द्वंद्व-युद्ध सुरूं झालें. द्वंद्वांत वालीच्या प्रहारानें सुग्रीव पडला हें पाहून हनूमान् घाबरला. रामानें त्याला धीर दिला आणि नंतर एकाच बाणानें वालीला पृथ्वीतलावर पाडिलें. आपल्यास कपटानें मारल्याचा वालीनें रामावर आरोप केला. रामचंद्रानीं तूं अमूक कारणास्तव दण्ड्य होतास म्हणूनच तुझ्यावर बाण टाकला, म्हणून त्यास सांगितलें. तेव्हां वाली निरुत्तर झाला आणि रामास शरण गेला. प्राणोत्क्रमणापूर्वी वालीनें आपल्या अंगद नामक पुत्राला सुग्रीवाचें स्वाधीन करून त्याचें पारिपालन करण्याविषयीं त्यास विनविलें आणि आपल्या गळ्यांतील वानरकुलाचें कुलधन असलेली हेममाला त्यानें सुग्रीवास अर्पण केली ! सुग्रीवालाहि या प्रसंगीं अत्यंत गहिंवरून आलें. यानंतर थोड्या वेळानें वालीचें प्राणोत्क्रमण झालें व रामानें त्याचे और्ध्वदेहिक उरकण्याविषयीं सुग्रीवाला आज्ञा केली, आणि सुग्रीवाच्या अभिषेकाची तयारी करण्याविषयीं लक्ष्मणास सांगितलें. ह्या नाटकाच्या पहिल्या अंकांत येथपर्यंत कथाभाग आला आहे.

दुसऱ्या अंकाच्या आरंभीं विष्कंभकामध्यें हनूमान् मारुती सीताशोधार्थ समुद्र उल्लंघून लंकेस गेल्याचें सुचविलें आहे; या पुढें येणाऱ्या प्रवेशांतील कथाभाग असा:—राक्षसींनीं परिवेष्टित अशी सीता एका उद्यानांत आपल्या पतीच्या चिंतनांत निमग्न होऊन बसली होती. इतक्यांत मारुती लंकेतील सर्व ठिकाणीं सीतेचा शोध करीत सीता ज्या अशोकवृक्षाच्या खालीं बसली होती तेथें आला. तेथें विद्रुप राक्षसींच्या घोळक्यांत चंद्रकोरेसारखी प्रभावती सीता पाहतांच, ती सीता असल्याचें त्यानें तर्कानें ताडिलें. तो तिच्यापुढें जाण्याचें मनांत योजितो तोंच लंकेश्वर रावणाची स्वारी मशाली पेटवून तेथें येत असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याबरोबर तो त्या अशोक वृक्षावर चढून त्या वृक्षाच्या एका ढोलींत—पुढें काय प्रकार होतो तो पाहण्याकरितां-लपून बसला. रावणाच्या तोंडांतून काय काय तारे तुटतात ते तो निमूटपणें ऐकत होता.

रावण सीतेला नानाप्रकारांनीं वश करूं पहात होता पण त्यांत त्याला यश न येतां सीतादेवी त्याला शाप देण्यास उद्युक्त झाली ! पतिव्रतेच्या तेजापुढें रावण संमूढ होऊन गेला. याचवेळीं स्नानाची वेळ झाल्याची वर्दी आल्या-मुळें तो आपल्या परिवारासह तेथून निघून गेला.

रावण तेथून निघून जातांच मारुति त्या वृक्षाच्या ढोलींतून बाहेर पडून सीतेपुढें येऊन उभा राहिला आणि त्यानें आपण रामाकडून सीताशोधार्थ तेथें आल्याचें तिला सांगितलें. पण त्याच्या बोलण्यावर तिचा एकदम विश्वास बसेना. तिला वाटलें कीं, हा एखादा राक्षसच वानराचें रूप घेऊन आपल्याला फसविण्याकरितां तर आला नसेल ! तो रामाकडील वृत्त सांगत होता म्हणूनच तिनें त्याचें बोलणें मुकाट्यानें ऐकून घेतलें. त्याच्या तोंडून सीतावियोगामुळें झालेल्या रामाच्या स्थितीचें वर्णन ऐकून सीतेचें हृदय आनंद आणि दुःख अशा दोन्हींच्यामध्यें झोकें घेऊं लागलें. या नंतर मारुतीचा तिला विश्वास वाटून तिनें रामासंबंधानें दुसरेहि कांहीं प्रश्न त्याला विचारिले. त्याचे तोंडून रामाची झालेली दीन स्थिति ऐकून तिला फार खेद झाला. तेव्हां मारुतीनें तिला—" खेद करूं नकोस, रामचंद्र धनुर्बाण सज्ज करून लंकेच्या रोखानेंच रावणाचें निर्मूलन करण्याकरितां येत आहेत, " असें सांगून धीर दिला, आणि रामाला तेथें घेऊन येण्याचें तिला अभिवचन देऊन तो तेथून निघाला. पण आपण लंकेंत आल्याचें रावणाचे कानावर जावें म्हणून त्यानें त्रिकुटाचा व त्या भोंवतालच्या अरण्याचा विध्वंस करून टाकण्याचें ठरविलें. येथें द्वितीय अंक संपला.

तिसऱ्या अंकाचे आरंभीं रावणाच्या शंकुकर्ण नामक सेवकानें—एका वानरानें रावणाच्या अशोकवनिकेचा विध्वंस केल्याची बातमी लंकेश्वराचे कानावर घातली. ती ऐकून रावणानें त्या वानराला पकडून आणण्याची आज्ञा केली. त्यानें त्या वानरास धरून आणण्याकरितां पहिल्यानें हजार किंकर पाठविले, पण त्या वानरानें वृक्ष फेंकून त्या सर्वांचा वध करून टाकल्यामुळें रावणानें त्याचेवर आपल्या अक्ष नामक कुमाराला पाठविलें. कुमार गेल्याचे पाहून त्याच्या मदतीला रावणाचे दुसरे पांच सेनापतिहि धांवून गेले. पण मारुतीनें ह्या सर्वांचाहि वध केल्यामुळें रावणाचा दुसरा पुत्र इंद्रजित् क्रोधानें संतप्त होऊन त्या वानरावर धांऊन

गेला आणि त्यानें मारुतीला पाशांनें बद्ध करून रावणापुढें आणिलें. मारुती इंद्रजिताचे हातीं. आपण होऊनच सांपडला होता. यांत त्याचा हेतू खुद्द लंकेशाची गांठ पडावी हाच होता. आणि म्हणूनच तो शत्रूच्या हातीं लागला. त्या महा पराक्रमी वानराला पाहून रावणाला वाटलें कीं, इतका विध्वंस करणारा हा वानर म्हणजे पार्वतीनें आपल्याला दिलेला शापच तर प्रत्यक्ष मूर्तरूपानें आला नसेल ना ! रावणाच्या आज्ञेवरून इतक्यांत बिभीषणहि तेथें आला; त्यानें " सीता हरण करून समर्थाशीं वैर करण्याची तुम्हांला विपरीत बुद्धी झाली आणि त्याचमुळें हा सर्व प्रकार ओढवला, " असें रावणास सांगितलें. पण हें रावणास कसें रुचणार ? धरून आणलेल्या वानरास पाहून रावणानें बिभीषणास विचारिलें:—" हें सर्व याचेंच काम काय ? " तेव्हां मारुतीनेंहि रावणाला " अहो राजे ! आपलें कुशल आहेना ? " असा धिटाईचा प्रश्न केला. ' तूं कोण ? ' म्हणून विचारितां त्यानें आपण अंजनीपुत्र हनुमान् असल्याचें त्याला सांगितलें, आणि नंतर ' रामाची आज्ञा ऐक ! ' असें मारुती त्याला म्हणाला. हें रावणाला सहन झालें नाहीं. त्यानें मारुतीला ठार करून टाकण्याचा हुकूम केला, पण बिभीषणाचें सांगण्यावरून रावण रामाचें काय म्हणणें आहे तें ऐकण्याला तयार झाला. 'माझ्या बाणानें मी तुला यमसदनाला पाठवायला येतो आहें ! ' एवढाच श्रीरामचंद्राचा निरोप होता. तो निरोप ऐकून रावण खदखदा हंसला. व आपल्या पराक्रमाची घमेंड मारूं लागला, तेव्हां हनुमानानें त्याला विचारलें कीं, " इतका जर तूं पराक्रमी—तर सीतेचें असें कपटानें हरण कां केलेंस ? " बिभीषणहि यावर ' हनुमानानें योग्य प्रश्न विचारिला, ' असें उद्गारला ! पण हें रावणास रुचलें नाहीं. बिभीषणानें रावणाला—" सीतेची मुक्तता करून आपला कुलक्षय वाचवा," म्हणून सल्ला दिला. तेव्हां रावण उद्गारला:—"सिंहाला कोल्ह्याचें भय कसलें ? " रामासंबंधानें असे तुच्छतेचे शब्द ऐकतांच मारुती त्याला अरे तुरे करून बोलूं लागला. तेव्हां—'त्याच्या शेपटीला आग लावून त्याला सोडून द्या ! ' असा रावणानें हुकूम केला. शंकुकर्ण हनुमानाला घेऊन गेला. जातां जातां हनुमानानें रावणास बजाविलें कीं, ' राम येऊन लौकरच तुझ्या लंकेचा विध्वंस करून तुला आपल्या बाणानें ठार करतील ! ' अशा प्रकारें मारुती तेथून गेल्यावर बिभीषणानेंहि त्याला

'सीतेला सोडून देऊन समर्थांशीं वैर करण्याचें टाक'—म्हणून सांगितलें. पण रावणाला हें यत्किंचितहि रुचलें नाहीं. त्याला वाटलें कीं, बिभीषण सर्वस्वी शत्रूची कड घेऊनच बोलत आहे. रावण क्रुद्ध झाला आणि त्यानें बिभीषणाला आपल्या डोळ्यापुढून दूर करण्याची आज्ञा केली! ही आज्ञा ऐकतांच बिभीषण म्हणालाः—"मी तुझ्या आज्ञेनुसार आपण होऊनच जातों, पण तूं कामक्रोध टाकून देऊन योग्य तेंच आचरण कर," असें म्हणून बिभीषण रामाचा आश्रय करून राक्षसवंशाचा उद्धार करण्याच्या हेतूनें रामाकडे जावयास निघाला. इकडे रावणहि बिभीषण गेल्यामुळें लंकानगरीच्या रक्षणाची कामगिरी आतां त्याच्यावरच पडल्यामुळें ती व्यवस्था करण्याकरितां तेथून निघून गेला. येथें तिसरा अंक संपला.

चौथ्या अंकाचें आरंभीं रामचंद्र कपिसेनेसह समुद्रावर जाऊन पोंचताहेत तोंच तेथें त्यांना बिभीषण शरण आला. बिभीषणाला लंकेतून घालवून दिल्याचें वृत्त हनूमानाकडून रामचंद्राला पूर्वींच कळलें होतें. तेव्हां रामचंद्रांनींहि त्याला 'यापुढें तूंच लंकेश्वर हो' म्हणून सांगितलें. नंतर रामानें समुद्र उल्लंघून जाण्याचें मनांत आणिलें. त्याबरोबर भगवान् वरुण तेथें प्रगट झाले आणि त्यांनीं समुद्र दुभंग करून त्यांतून रामाला लंकेस जाण्याचा मार्ग दिला. अशा प्रकारें राम सर्व सैन्यासह समुद्र उल्लंघून लंकेला जाऊन पोचले. सुवेल पर्वतावर वानर सेनेचा तळ पडला. इतक्यांत वानर सेनापति नीलानें ज्यांच्या ठावठिकाणाचा कांहीं पत्ता नाहीं असे दोन वानर धरून आणिले. शोधाअंतीं तें शुक आणि सारण या नांवाचें रावणाचे अत्यंत विश्वासांतील मंत्री असल्याचे बिभीषणाकडून कळून आलें. इतर सल्लागार मंडळी त्यांना शासन करावें म्हणून सांगत असतांहि रामचंद्रांनीं त्या दोघांना सोडून दिलें आणि त्यांच्या बरोबरच त्यांनीं आपण युद्धार्थ आलों असल्याचा रावणास निरोप पाठविला. ते दोघे मंत्री निघून गेलें आणि इकडे रामहि आपल्या सैन्याची तपासणी करण्याकरितां चालते झालें. येथें चौथा अंक संपला.

पांचव्या अंकाच्या आरंभींच्या विष्कंभाकांत रावणाचा कंचुकी विद्युज्जिव्हास बोलावून आणवून त्याला रावणाच्या आज्ञेनुसार रामलक्ष्मणांची दोन हुबेहूब शिरकमळें तयार करून आणावयास सांगतो. आणि या पुढील प्रवेशांत लंकेंत राम आल्यामुळें आनंदित झालेल्या सीतादेवीला अशुभ चिन्हें

होत असल्याचें दाखविलें आहे. याच प्रसंगीं रावण सीतेला धाकदपटशा दाखवून वश करावी ह्मणून तिच्याकडे आला. वाटेंत त्याला लंकेंतील लक्ष्मी आपलें राजभवन सोडून, रामाकडे जात असल्याचें आडळलें. पण रावणानें 'रामाला मारून मी तुला पकडून ठेवीन'—ह्मणून सांगितलें आणि तो थेट सीतेकडे आला. त्याच्या मागोमागच एक राक्षस रामलक्ष्मणांचीं शिरकमळें घेऊन आला आणि कुमार इंद्रजितानें त्यांचा वध केला असल्याचें त्यास सांगितलें. हें वृत्त ऐकून सीता मुर्च्छा येऊन पडली. शुद्धीवर आल्यावर ती 'ज्या खड्गानें आर्यपुत्रांचा वध झाला त्याच खड्गानें मलाही मारून टाका असें ती म्हणाली! इतक्यांत तेथें दुसरा एक राक्षस रामलक्ष्मणाकडून कुमार इंद्रजिताचा वध झाल्याची बातमी घेऊन अकस्मात् आला. त्याबरोबर रावण मुर्च्छा येऊन पडला! तो सावध होतो न होतो तोंच राम लंकेवर चढाई करून आल्याचें वृत्त त्याला कळलें. त्याबरोबर तो संतापानें—"ह्या सीतेच्या पायींच माझे भाऊ पुत्र, मित्र सर्व ठार झाले तर हिलाच अगोदर ठार करून मग त्या रामलक्ष्मणांचा वध करून टाकतो!" असें म्हणून तें साहस करण्यास तो उद्युक्त झाला. पण इतक्यांत एका राक्षसानें स्त्रीवधापासून त्याला परावृत्त केलें. तेव्हां रावण—'आज तूं माझ्या बाणानें विद्ध-हृदय झालेला राम पाहशील!' असें सीतेला सांगून, चढाई करून येणाऱ्या रामाला तोंड देण्याकरितां तो निघून गेला. आणि देवी सीता रामाचा विजय होण्याबद्दल देवांची प्रार्थना करूं लागली. येथें पांचवा अंक संपला.

सहाव्या—अर्थात् शेवटच्या—अंकाच्या विष्कंभकांत कवीनें तीन विद्याधर आणून त्यांच्या मुखानें रामरावणाच्या युद्धाचें विस्तारानें वर्णन केलें आहे. या युद्धांत रामानें ब्रह्मास्त्र योजिलें आणि त्यायोगें रावण पडला असा ह्या युद्धाचा शेवट दाखविला आहे. या पुढें येणाऱ्या प्रवेशांत राम रावणाचा वध करून व बिभीषणाला लंकेश्वर करून लक्ष्मणासह सीतेचें समाधान करण्याकरितां जावयास निघतात तोंच सीतादेवी तेथें येत असल्याचें रामाला लक्ष्मण आणि बिभीषण याचेंकडून कळलें. तेव्हां रामाच्या तोंडून—"ती राक्षसाच्या स्पर्शामुळें दूषित झाली असून इक्ष्वाकुकुलाला कलंकभूत अशी झाली आहे, तेव्हां तिचें मुखावलोकन करणें इष्ट नव्हे!" असे उद्गार बाहेर पडले! रामाचे हे निश्चयाचे उद्गार सीतादेवीच्याहि कानीं पडले. त्याबरोबर तिनें अग्निप्रवेश करण्याचें ठरवून रामाज्ञा मागितली, व रामानें ती

दिलीहि. बिभीषणानें मध्यस्थी करून रामाला ह्या गोष्टीपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पण रामाच्या एकवचनी व निश्चयी स्वभावापुढें त्याचें कांहीं एक चाललें नाहीं ! सीतेनें अग्निप्रवेश केला ! पण तेथें प्रत्यक्ष अग्निनारायणच मूर्तरूपानें प्रगट झाले आणि त्यांनीं " ही सीता अपाप आणि शुद्ध असून सर्व लोकांना वंद्य अशी आहे, असें रामाला सांगून तिचा स्वीकार करण्याविषयीं त्याला सांगितलें. तेव्हां रामानेंहि तिचा स्वीकार केला. तेव्हां आकाशांतून गंधर्वांनींहि अभिनंदनपर गायन करून रामाचा जयजयकार केला. त्याचप्रमाणें तें युद्ध पाहण्यास आकाशांत विमानें घेऊन येणाऱ्या देव, देवर्षि, सिद्ध विद्याधर, गंधर्व, अप्सरा, इत्यादिकांनींहि त्यांत भरच टाकली. नंतर अग्निनाराणांनीं रामाला अभिषेकाकरितां आंत नेलें. तेथें सर्व देवांनीं रामचंद्राला आभिषेक केला. आभिषेक झाल्यावर आग्निनारायण अभिषिक्त रामाला सीतेसह बाहेर घेऊन आले. तेव्हां रामचंद्र लक्ष्मणाला म्हणाले:—'ज्या तातांनीं कैकेयी मातेचें प्रिय करण्याकरितां पूर्वी माझा अभिषेक रहित केला होता, त्याच तातांनीं आज —ते स्वर्गस्थ असूनहि—अत्यानंदानें मला हा अभिषेक करविला आहे ! ' रामचंद्र लक्ष्मणापाशीं हें बोलत आहेत तोंच अग्निनारायणांनीं अयोध्यावासी प्रजाजन कुमार भरत शत्रुघ्नांना पुढें करून आले असल्याचें रामचंद्राला सांगितलें. त्याबद्दल रामचंद्रानेंहि आपला आनंद प्रदर्शित केला. याच वेळीं महेंद्रादि देवांनींहि रामचंद्राला शुभ आशीर्वाद दिले. नंतर अग्निनारायणांनीं ' तुझें आणखी काय प्रिय करूं ? ' म्हणून रामाला विचारलें, त्यावर रामचंद्र म्हणाले:—" भगवान् प्रसन्न असल्यावर आतां मागावयाचें काय आहे ! " अशा प्रकारें ह्या अंकाचा व त्या बरोबरच नाटकाचा शेवट होत आहे. अशा प्रकारें ह्या नाटकाचें कथासूत्र आहे.

रूपकाचे जे दहा प्रकार आहेत त्यांपैकीं **नाटक** म्हणून जो एक प्रकार आहे त्यांत हें अभिषेक नाटक मोडतें.

---

# ' अभिषेक ' नाटकांतील पात्रें.

**पुरुष पात्रें:—**

रामः— ... ... अयोध्येचा राजा दशरथ याचा वडील पुत्र.
लक्ष्मणः— ... ,, ,, द्वितीय पुत्र.
हनूमान्ः— ... वायुपुत्र मारुती.
सुग्रीवः— ... वालीचा धाकटा भाऊ.
वालीः— ...... किष्किंधेचा वानर राजा.
अंगदः— ...... वालीचा पुत्र.
नीलः— ...... वानरपक्षीय सेनापती.
कांचुकीय (वानर) वालीचा कंचुकी.
बलाध्यक्ष ( ,, ) कपिसेनेवरील एक अधिकारी.
ककुभः— ( ,, ) } वानर पक्षांतील बातम्या
बिलमुख ( ,, ) } इकडे तिकडे पोंचविणारे हेर.
कपिसेनेंतील इतर वानर.

रावणः— ( राक्षस ) लंकेचा राजा.
बिभीषणः— ( ,, ) रावणाचा धाकटा भाऊ
कांचुकीयः— ( ,, ) रावणाचा कंचुकी
शंकुकर्णः— ( ,, ) ,, सेवक
विद्युज्जिव्हः— ( ,, ) ,, ऱ्या पदरचा एक मुखवटे वगैरे करणारा.

**स्त्री पात्रें:—**

सीताः— ... रामाची पत्नी, मिथिलेश्वर जनकाची कन्या.
ताराः— ... वालीची पत्नी.
विजयाः— ... रावणाची द्वारपालिका,

सूत्रधार, पारिपार्श्वक; तीन विद्याधर; वरुणदेव, व अग्निदेव.

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

महाकवि श्रीभास प्रणीत

# अभिषेक नाटक.

[ नांदी झाल्यानंतर सूत्रधार प्रवेश करितो. ]

सूत्रधार.— श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

विश्वामित्र-मखास विघ्न करिती जे त्यांस संहारिता ।
युद्धीं दुष्ट विराध, दूषण, खर क्रव्याद निर्दालिता ॥
दर्पे धुंद कबंध वानर-नृपा जो जाहला मर्दिता ।
जो दैत्येंद्र-कुलाप्रती वधितसे, तो हो अम्हां रक्षिता ॥ १ ॥

आर्यमिश्रांना माझी अशी प्रार्थना आहे कीं—( फिरून पाहून ) अरे, पण मी यांना ही प्रार्थना करणार इतक्यांत कोणाचा बरं हा शब्द ऐकूं येत आहे ? हं समजलों !

( पडद्यांत )

" सुग्रीवा, इकडं, इकडं. "

[ पारिपार्श्वक प्रवेश करितो. ]

पारिपार्श्वकः—आर्य !

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

हा चण्डनाद सहसा उठला कुठून ।
जो जातसे श्रुति–विदारण हें करून ॥
संचारितां भयद मेघ नभांतुनी ते ।
जाती जई क्षुभित होउनि चंडवातें ॥
तेव्हां उठे जलद–गर्जित तें भयाण ।
हा नाद भासत मनास तया समान ॥ २ ॥

सूत्रधारः—अरे, मारिषा ! हा एवढा घोष कशाचा चालला आहे हें तुला कळलं नाहीं ? अरे, सर्व लोकांच्या नेत्रांना प्रियकर असा जो

रघुकुल-प्रदीप राम-सीतेच्या हरणामुळं जो संतप्त झाला आहे त्याची, आणि त्या साऱ्या आस्वलांचा आणि वानरांचा शास्ता-धष्टपुष्ट मान असणारा-व त्याच्या स्त्रीवर बलात्कार करून ज्याला देशोधडीस लावला आहे अशा त्या वालीबंधु सुग्रीवाची-अशा दोघांच्या-एकमेकांस मदत करण्याच्या प्रतिज्ञा होऊन ते आतां सुवर्णमाला धारण करणारा साऱ्या वानरांचा प्रभू जो वाली त्याचा वध करण्याच्या उद्योगांत आहेत. त्या संबंधानं हा घोष आणि या गर्जना ऐकूं येत आहेत. आणि याच कामाकरितां हे दोघे—

श्लोक. [ वृत्त—अनुष्टुभ ]

राज्य-विभ्रष्ट इंद्रातें । स्थापाया त्या पदीं पुन्हा ।
झाले हरिहर प्राप्त । तैसेची आज हे पहा ॥
राज्य-विभ्रष्ट सुग्रीवा । स्थापाया त्या पदीं पुन्हा ।
राम लक्ष्मण हे आले । तैसेची आज हे पहा ॥ ३ ॥

[ दोघेहि जातात. ]

ही स्थापना झाली.

---

[ नंतर राम, लक्ष्मण, सुग्रीव व हनूमान् हे प्रवेश करितात. ]

**रामः**—सुग्रीवा ! असा इकडे इकडे उभा रहा.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

होई छिन्नविभिन्नदेह सहसा माझ्या शरा सेवितां ।
ऐसा पाहशि शत्रु आज अपुला भूमीवरी लोळता ! ॥
राजा ! टाक भयास, सन्निध उभा तूं राहि एक क्षण, ।
तों तूं वालिस पाहशील समरीं म्यां टाकिलें मर्दुन ! ॥ ४ ॥

**सुग्रीवः**—देव ! मी आर्यांच्या प्रसादानं देवांचंहि राज्य घेण्याची अपेक्षा करनि, मग ह्या वानर-राज्याची ती गोष्ट काय ? कारण—

श्लोक [ वृत्त—उभा. ]

थोर वनांतिल साल तरू नभिं जात, हिमालय-शृंगपरी ।
सप्त अशा विटपांस विभेदुनि वेगबळें निज, कार्य-करी—॥



**वाली**:—काय ! काय ! सुग्रीव माझी पादसेवा करणार ! [ अभि० ३

तो शर पारचि पृथ्वि विदारुनि जात रसातळिं आत्मबळें—
स्नान करून समुद्रिं, फिरे मग मागुति; सायक हे असले—॥
वालि—वधार्थचि तूं धरिशी करिं, हे प्रभु! संशय कैंवि उरे?
हे रघुवीर! सुरेश्वर! सायक हा सुटतां तव, शत्रु नुरे! ॥५॥

**हनूमान्:—** आर्या (गीति.)

नृपवर! तव वदनांतुनि पडती बाहेर शब्द त्यानींच।
लोपविलें भय अमुचें, शोकाची होय पूर्ण हानीच! ॥
सुग्रीवातें द्याया मिळवुनि जय, गिरिकडेचि त्वां यावें।
रघुवीरा! यत्कांती सजल घनाशींच साम्यता पावे ॥ ६ ॥

**लक्ष्मणः—**आर्य! या पाणथळपणावरून असं वाटतं कीं **किष्किंधा** या वनांतच कुठं तरी जवळपास असली पाहिजे.

**सुग्रीवः—**बरोबर आहे कुमारांचं म्हणणं.

आर्या (गीति.)

किष्किंधा ही आली, मगरमिठी वालिची जिला पडली।
ही तव भुजें नृपाळा! नीतिबळें पाहिजेच रक्षियली ॥
राही येथ उभा तूं नरवीरा! गर्जनेंचि मी करिन—
संज्ञाहीन महीला, तैसें ह्या गिरिवरास हदरून ॥ ७ ॥

**रामः—**ठीक आहे. जा तूं.

**सुग्रीवः—**जशी प्रभूंची आज्ञा. (इकडे तिकडे फिरून वालीस उद्देशून) अरे!

श्लोक [ वृत्त—अनुष्टुभ ]

अपराधा तसें त्यागा। नाठवीतां तुझ्या विभो!
पादसेवा तुझी युद्धीं। सुग्रीव करूं इच्छितो ॥ ८ ॥

[ पडद्यांत ]

" काय? काय? सुग्रीव माझी पादसेवा करणार?"

[ नंतर वाली व त्याचें वस्त्र ओढून धरून त्याला जाऊं न देणारी तारा प्रवेश करितात. ]

**वालीः—**काय? काय? सुग्रीव माझी पादसेवा करणार?

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

तारे ! मदीय वसनाप्रति सोड, सोड !
लोपे तुझी वदनलोचनकांति गोड ॥
कां होशि, गे ! मम निवारणिं तूं प्रवृत्त ?
होऊनि येत असतां रिपु हा प्रमत्त !॥
सर्वांग रक्तमय होउनिया रणांत ।
पाही तया अजिं रणीं रणधूळ खात ॥ ९ ॥

ताराः—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं, सुग्रीव कांहीं इकडे क्षुल्लक कारणाकरितांच केवळ येत नसेल ! तर जायचंच तर अमात्य मंडळींचा विचार घेऊन तरी जावं.

वालीः—आः

श्लोक [ व. ति. ]

चंद्रानने ! अवन इंद्र करो रिपूचें ।
कीं आश्रय-स्थल असो शिव तो तयाचें ॥
जो घे त्रिशूल करिं पाजळुनी सुरेख ।
तोही प्रहार करण्या न धजेल देख ! ॥
तो विष्णु, फुल्ल कमलापरि नेत्र ज्याचे ॥
ये ना समीपहि, करील प्रहार कैचे ? ॥ १० ॥

ताराः—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. निदान माझ्यावर अनुग्रह करण्याकरितां म्हणून तरी जाऊं नये.

वालीः—माझा पराक्रम तर ऐक—

श्लोक [ वृत्त— तारा. ]

तारे ! पूर्वीं मी अमृत-मंथन-सुप्रसंगीं ।
गेलों होतों त्या अमरदानवदैत्य-संगीं ॥
केलें हास्या म्यां विकट, मंथन-दर्शनानें ।
तैं शेषाग्रें तीं धरुनि कर्षियलीं बलानें ॥
आलीं बाहेरी उफळुनी बुबुळें तयाचीं ।
तों सर्वांच्याही मुखिं चढे रुचि विस्मयाची ! ॥ ११ ॥

ताराः—एवढी–एवढी भीक घालावी मला.

वालीः—आः! मी सांगतों त्या प्रमाणं ऐक. चल, आंत चालती हो.

ताराः—ही चाललें मी. केवढी मंदभागी मी!

वालीः—हां. तारा गेली. तर आतां ह्या सु-ग्रीवाला मी भग्न-ग्रीव करून टाकतों! ( एकदम त्याचे जवळ जाऊन ) सुग्रीवा! उभा रहा, उभा रहा.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

ताराया इंद्र तो येवो। कीं येवो मधुसूदन।
येतां नेत्र–पथीं माझ्या। जिवें जाशी न येथुन॥ ११॥

इकडं–इकडं ये असा.

सुग्रीवः—जशी महाराजांची आज्ञा!

[ दोघांचें द्वंद्व होतें. ]

रामः—हा–हा वाली,–

[ श्लोक वृत्त–शालिनी ]

चावे दंता, फाडि नेत्रांस रक्त।
ऊर्ध्वा दाढा, घट्ट मुष्टी वळीत!॥
युद्धीं ठोकी गर्जना मोठमोठ्या।
तेणें कांती ये कपींद्रा अहो! त्या!॥
कालाग्नी तो वांच्छुनी जाळण्यातें–।
येई, तेव्हां दावि ऐशा प्रभेतें!॥ १२॥

लक्ष्मणः—आर्यांनीं ह्या सुग्रीवालाहि पहावं––

श्लोक [ वृत्त–लक्ष्मण. ]

विकसित कमला समान नेत्र रक्त।
दृढभुज कनकाङ्गदेंचि पूर्ण युक्त॥
नृपति-निकट वानर–स्वभाव जात।
गुरुस न गणितां त्यजूनि मान्य नीत॥ १४॥

अरे, अरे! वालीच्या प्रहारानं सुग्रीव पडला!

हनूमान्ः—हाय! हाय! काय हें!. ( घाबरून रामा समीप जाऊन ) देवांचा विजय असो. ह्यांची–ही अशी अवस्था झाली! तर हे देव,—

आर्या ( गीति. )

बलवान् कपींद्र वाली, दुर्बल सुग्रीव हा धनी माझा ।
देखुनि दीनस्थिति ही, स्मरुनी शपथेस, पुढिल पथ योजा ॥१५॥

रामः—हनूमन् ! असा व्यर्थ घाबरूं नको. आतां प्रत्यक्ष काय घडून येतं तेंच पहा. ( बाण सोडून ) हा–हा पहा वाली पडला !

लक्ष्मणः—हा–हा वाली—

श्लोक [ वृत्त–मालिनी ]

सकल तनु जयाची माखली शोणितानें ।
अरुण रुचिर कांती टाकिली लोचनानें ॥
कठिण बहुत झाले दीर्घ बाहू जयाचे ।
अभिमुख जणुं होई लोकिं जाया यमाचे !
शर सहन कराया त्राण ज्याच्या न देहीं ॥
कशितरि वपु ओढी शक्ति-हीनाचि पाही ! ॥ १६ ॥

वालीः—( मूर्च्छित झालेला सावध होऊन, बाणावरील नांवाचीं अक्षरें वाचून रामास )

श्लोक [ वृत्त–प्रहर्षिणी. ]

बा रामा ! तुज नृपधर्म मानित्यातें ।
युद्धीं हें कपटचि फार युक्त होतें ! ॥
धर्माचें हृदयचि पूर्ण ज्यास ठावें ।
त्या वीरा कपट असें कसें रुचावें ? ॥
लोकांच्या छल-हरणीं प्रवृत्त व्हावें ।
त्यानें, कां नय अनया न त्या स्मरावें ? ॥
हे रामा ! तुज नृपधर्म–रक्षकातें ।
युद्धीं हें कपटाचि फार शोभवीतें ! ॥ १७ ॥

मोठी खेदाची गोष्ट ! कीं:–

आर्या [ गीति. ]

सौम्य स्वरूप तुमचें, असतां तुम्हि तेंवि पात्र सुयशाचें ।
कपटें विंधुनि मजला, वाढविलें क्षेत्र कीं अपयशाचे ॥ १८ ॥

हे राघवा! मी आपल्या भावाशीं युद्ध करण्यांत गुंतलों असतां, तुम्हीं—तुमच्या ह्या वल्कल–वेषाला न साजणाऱ्या, आंत एक आणि बाहेर एक अशा अंतःकरणानं–आड लपून कपटानं माझा अधर्म्य असा वध केला आहेत!

**रामः**—काय आडून? आणि अधर्म्य वध केला आहे म्हणतोस?

**वालीः**—निःसंशय!

**रामः**—छेः असं मुळींच नाहीं. कारण असं पहाः—

श्लोक [ वृत्त. अनुष्टुप. ]

जाळीं टाकूनि लपुनी। वधणें इष्ट त्या मृगा।
तूं वध्य, शाखामृग तूं,। दण्ड्य छद्मेंचि तूं, अगा! ॥१९॥

**वालीः**—एकून मला आपण दण्ड्य–शिक्षेला पात्र–असा समजता?

**रामः**—संशय कसचा?

**वालीः**—कोणच्या कारणामुळं दण्ड्य?

**रामः**—अगम्यागमनामुळें.

**वालीः**—अगम्यागमनामुळं? हा तर आमचा वानरांचा धर्मच आहे.

**रामः**—वा: फारच योग्य! अरे,—

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

इंद्र तूं वानरांचा त्या। धर्माधर्मास जाणता।
केलेंस पशु–वृत्तातें। भ्रातृजाया–समागमें॥ २० ॥

**वालीः**—भ्रातृदारागमनाचा दोष आम्हां दोघांकडून सारखाच घडला असून मी एकटाच दंडाला पात्र झालों, आणि सुग्रीव मात्र नाहीं, हें कसं?

**रामः**—तूं दण्ड्य असल्यामुळं तुला शिक्षा केली. जो (शास्त्रानें) दण्ड्य नाहीं त्याला शिक्षा करितां येत नाहीं.

**वालीः**— श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

ज्येष्ट–बंधु वधूतें जो–भ्रष्टवी दण्ड्य तो नव्हे!।
भ्रातृ–दाराभिमर्शानें। दण्ड्य मी, कैंवि राघव? ॥ २१ ॥

**रामः**—एवढंच नव्हे तर वडील भावानें धाकट्या भावाच्या पत्नीशीं गमन करणं हें दण्ड्य आहे!

वालीः—मी आतां निरुत्तर झालों. आपण माझं शासन केल्यामुळं मी आतां पापमुक्त झालों आहें.

रामः—तसंच होवो.

सुग्रीवः—हाय ! हाय !

श्लोक [ वृत्त–पुष्पिताग्रा. ]

गजपतिसम त्वद्गती असे ही ।
भुज तव हस्ति–करा समान पाही ॥
भुजयुगधृत–अंगदें गळूनी ।
क्षितितळिं लोळति शत्रुच्या शरानीं ॥
अहह ! पडाति त्या सर्वेचि दंड ।
हृदय तयें मम होत हें दुखंड ! ॥ २२ ॥

वालीः— सुग्रीवा ! पुरे कर, पुरे कर बाबा–आतां हा शोक ! हा लोकधर्म असाच आहे.

[ पडद्यांत. ]

" हाय हाय, महाराज ! "

वालीः—सुग्रीवा ! स्त्रीजनांचं निवारण कर, निवारण कर. माझ्या अशा स्थितींत तिनं मला पाहणं उचित नव्हे.

सुग्रीवः—जशी महाराजांची आज्ञा. हनूमान् ! ही कामगिरी मी तुझ्यावर सोंपवितों.

हनूमान्ः—जशी कुमारांची आज्ञा. [ जातो.

[ नंतर वालीपुत्र अंगद व हनूमान् प्रवेश करितात. ]

हनूमान्ः—अंगदा ! असा इकडून–इकडून ये.

अंगदः— छंद [ दिंडी ].

वानरांचा तैसाचि आस्वलांचा ।
भूप झाला तो भक्ष्य त्या यमाचा ! ॥
ऐकुनीया जें दुःख मला होई ।
शक्ति तेणें मम सकल गळुनि जाई ! ॥
पाय उचलाया बळहि नुरें कांहीं ।
प्रयासें मी येतसे येथ पाही ! ॥ २३ ॥

हनूमान् ! कुठं आहेत महाराज ?

**हनूमान्**—हे पहा महाराज.

आर्या ( गीति. )

भंगुनि हृदय शरानें, येथें हा भूतलीं पहा पडला ! ॥
क्रौंच-गिरिश्रेष्ठ जसा गुह-शक्तीनें विभिन्न झालेला ॥ २४ ॥

**अंगदः**—( जवळ जाऊन ) हाय, हाय ! महाराज !

श्लोक [ वृत्त-हरिणी. ]

बलयुत किती होता ताता ! सुखांत विराजित ! ॥
अखिल वसुधा संचाराला पुरी न तुम्हांप्रत ! ॥
अहह ! कपिचे होतां राजे ! परिस्थिति ती फिरे ।
शिथिल सगळीं गात्रें झालीं, न चेष्टित त्यां उरे ! ॥
शरवर तसा ग्रासी तुम्हां, पडे तव देह हा ! ।
रुचत अजि कां वीर-स्वर्ग-प्रयाण तुम्हां अहा ! ॥ २५ ॥

( असें म्हणून भूमीवर पडतो. )

**वालीः**—अंगदा ! अंगदा ! असा खेद करूं नकोस. हे सुग्रीवा !

श्लोक. [ वृत्त-उपजाति ]

जे होति माझे अपराध कांहीं ।
ते सर्वथा तूं विसरून जाई ॥
त्यजूनि रोषा कपिच्या नृपानें, ।
धर्मा वरावें बहु आदरानें ॥
या अंकुरा रक्षुनि मत् कुलाच्या ।
सेवी व्रता तत्परिपालनाच्या ॥ २६ ॥

**सुग्रीवः**—जशी महाराजांची आज्ञा !

**वालीः**—हे राघवा ! ह्यांच्या हातून यदाकदाचित् जर कधीं वानर-स्वभावामुळें अपराध घडले तर त्याबद्दल क्षमा करायला आपण समर्थ आहां.

**रामः**—त्याची काळजी करूं नकोस.

**वालीः**—सुग्रीवा ! आपल्या कुलाचं कुलधन असलेली ही सुवर्णमाला तूं स्वीकार.

—०—

सुग्रीवः—हा अनुग्रह आहे माझ्यावर.

वालीः—हनूमन् ! पाणी घे पाहूं थोडं.

हनूमान्ः—जशी महाराजांची आज्ञा. (जाऊन परत येऊन) हें पाणी

वालीः—(आचमन करून) माझे प्राण मला जणूं सोडून जात आहेत. ह्या गंगा आदिकरून महानद्या, ह्या ऊर्वशी आदिकरून अप्सरा, माझ्याकडे येत आहेत. वीरांना वाहून नेण्याकरितां हें हजार हंस जुंपलेलें विमान त्या यमानं मला घेऊन जाण्याकरितांच पाठिवलं आहे. ठीक ठीक. हा आलोंच मी ! ( स्वर्गस्थ होतो. )

सर्वजणः—हाय ! हाय ! महाराज !

रामः—हाय ! वाली स्वर्गवासी झाला. आतां याचा अंत्यसंस्कार उरक

सुग्रीवः—जशी महाराजांची आज्ञा.

रामः—लक्ष्मणा ! सुग्रीवाच्या अभिषेकाची तयारी होऊं दे.

लक्ष्मणः—जशी आर्याची आज्ञा.

[ सर्व जातात. ]

[ प्रथम अंक समाप्त. ]

# अंक २ रा.

[ नंतर 'ककुभ' वानर प्रवेश करितो. ]

**ककुभः**—( आपल्याशीं ) कार्याची बहुतेक सिद्धी झाल्यामुळं वानरांच्या टोळ्यांचे सारे म्होरके सध्यां खाण्यांत गर्क झाले आहेत. तर आपणहि आतां खाद्य पदार्थांचा थोडा फार समचार घ्यावा.

**[ बिलमुख वानर प्रवेश करितो. ]**

**बिलमुखः**—मला सुग्रीव महाराजांनीं धाडला आहे. आर्य रामचंद्रांनीं केलेल्या उपकारांची फेड करण्याकरितां म्हणून सीतेच्या शोधार्थ पाठविलेले सारे वानर चारी दिशांहून परत आले आहेत, त्यांपैकीं दक्षिणापथाकडे गेलेल्या कुमार अंगदाची बातमी काढून लौकर ये, म्हणून सांगितल्या वरून मी इथं आलों. तर हे कुमार कुठ बरं गेले असतील? ( इकडे तिकडे फिरून समोर पाहून ) हे तर आर्य ककुभ. तर आतां यांनाच विचारावं. ( जवळ जाऊन ) कसं काय—आर्यांचं कुशल आहेना ?

**ककुभः**—अरे बिलमुखा ! तूं कुठून आलास !

**बिलमुखः**—आर्य ! महाराजांच्या आज्ञेवरून मी कुमार अंगदाल पाहण्यासाठीं आलों आहें.

**ककुभः**—आर्य रामचंद्र आणि महाराज खुशाल आहेत ना ?

**बिलमुखः**—हो, खुशाल आहेत.

**ककुभः**—काय ? महाराजांची काय इच्छा आहे ?

**बिलमुखः**—सीताशोधार्थ दक्षिणापथाकडे गेलेल्या कुमार अंगदाकडील बातमी काढून लौकर येण्याविषयीं मला महाराजांची आज्ञा झाली आहे.

**ककुभः**—तें कार्य अर्धमुर्ध सिद्धीस गेल्याचं तुला ठाऊक नाहीं का ?

**बिलमुखः**—नाहीं! तें कसं काय ?

**ककुभः**—ऐक, कसं तेंः—

आर्या ( गीति. )

**सीता-वृत्त समजतां, खगपति संपातिच्या कडून खरें ।**
**मारुति महेन्द्र—गिरिवरि, चढला जेथें गजेंद्रगण विचरे ॥**

मग लंका गांठाया निज तनुबलवीर्यसार तो योजी ।
उल्लंघुनी समुद्रा गेला तो पार सर्वथा आजी ! ॥ १ ॥

तर चल ये, आपण आतां कुमारांच्या चरणासन्निधच जाऊं या.

[ जातात. ]

विष्कंभक समाप्त.

---

[ तदनंतर राक्षसींनीं परिवेष्टित अशी सीता प्रवेश करिते. ]

**सीता**:—धिःकार ! धिःकार असो मला अभागिनीला ! हें माझं हृदय किती तरी कठिण ! आर्यपुत्रांची आणि माझी ताटातूट झाली, मला ह्या राक्षसाच्या घरीं आणून ठेवली, आणि इथं तर अनिष्ट, ऐकू सुद्धां नयेत अशीं,—आणि ज्याच्या मनास जशीं वाटतील तशीं—भाषणं ऐकून घ्यावीं लागतात: इतकं असूनहि माझे प्राण माझ्या कुडीला सोडून जात नाहींत ! तेव्हां मी हतभागिनीच नव्हे कां ! तरी पण मी आर्यपुत्रांच्या बाणावरील माझ्या श्रद्धेमुळं कसें तरी आपलें समाधान करून घेतें. पण आज हें असं कां बरं होतं आहे ?--लोहाराची भट्टी धूम भडकून पेटली असतां तिच्यावर जलसिंचन करावं त्याप्रमाणं माझ्या हृदयांत आज ही थोडीशी तरी प्रसन्नता कां बरं उत्पन्न व्हावी ? माझ्या संबंधानं आर्यपुत्रांचं हृदय प्रसन्न झालेलं असलं पाहिजे, आणि म्हणूनच मला ही प्रसन्नता वाटत असली पाहिजे. पण तिकडं त्यांचं तरी अंतःकरण प्रसन्न व्हावला काय बरं कारण झालं असावं ?

[ नंतर हातांत अंगठी घेतली आहे असा हनूमान् प्रवेश करितो. ]

**हनूमान्**:—( लंकेत प्रवेश करून ) अहो ! रावणाच्या वाड्याची काय ही रचना !

श्लोक [ वृत्त—पुष्पिताग्रा. ]

कनक—खचित चित्र तोरणांनीं । बहुविध रंगविली सुभूषणांनीं ।
मणिगण बसवूनि जागजागीं । जडवुनि विद्रुम ते अनेक भागीं ॥
असति अमित येथ हीं विमानें । सुधवल, चित्रित, रम्य तीं सुवर्णें ।
विलसत अशि ही नभांत लंका । अमरपुरी जणुं काय निष्कलंका ॥२॥

अहो !

आर्या [ गीति. ]

सर्वोत्कृष्ट अशा या पावुनि दशकंठ राज्य–लक्ष्मीतें ।
अवलंबुनी असत्पथ होई उद्युक्त नाश करण्यातें ! ॥ ३ ॥

( सर्वत्र हिंडून ) मी बहुतेक सर्व लंकेभर हिंडून आलों आहें, आतां:–

श्लोक ( वृत्त–शा. वि. )

दुर्गी गुप्त बघून, म्यां हुडकिलीं अंतःपुरें, प्रांगणें ।
स्नानागार, विमान–सौधभवनें उद्यानराजी, वनें ॥
पानागार, सुरम्य राजभवनें, प्रासाद, ते हर्म्ये ही ।
एकांतांतिल गुप्त भाग सगळे मी हिंडलों सर्व ही ।
सारे शोधियले परंतु मजला ती रामपत्नी अहा !
कोठेंही नच ये दिसून, गमतो वायां खटाटोप हा ॥ ४ ॥

असो. आतां ह्या वाड्याच्या शिखरावर चढून तिथून पहावं. ( तसें करून ) ओहोः ह्या अंतःपुराच्या बागा ! ह्या बागांत जाऊन शोध करावा. ( आंत शिरून चोहोंकडे पाहून ) अहो! या बागांचं केवढं हें ऐश्वर्य !

श्लोक ( वृत्त–पृथ्वी. )

विशाल तरु–पंक्तिच्या मधुनि रम्य नाना स्थळें ।
सुशोभितचि दीसती प्रचुर रत्न-रागामुळें ॥
सुवर्णि जडवूनिया रुचिर पोंवळीं, नीळ ते ।
धरेस सजवीयलें, अमित तत्प्रभा फांकते ॥
तयें अधिक कांति ये रुचिर वृक्षराजीप्रती ।
सुनंदनवनापरी दिसत रम्य दीप्ती अती ! ॥५ ॥

आणखी—

श्लोक ( वृत्त–शा. वि. )

स्वर्णाचे रस ज्यावरी विलसती ऐसे गिरी सुंदर, ।
नाना अंडज, नांदतीं जलचरें, जीच्यांत चेतोहर–॥
ऐशा म्यां किति वापिका निरखिल्या; तशीं अनेक स्थलें–।
जेथें वृक्ष अपार नित्य असती संयुक्त पुष्पें फळें ॥
सारी–एकुन एक–रावणपुरी शोधून मी पाहिली ।
देवी भूमिसुता न रावण–गृहीं कोठें परी देखिली! ॥ ६ ॥

अरे, ह्या इकडच्या प्रदेशांत इतकें प्रभावान् असं कोण बरं दिसत आहे हें ? तर आतां इकडंच नीट न्याहळून पाहूं या. (तसें करून) अरे! कोण बरे ही ?

श्लोक ( वृत्त–अनुष्टुप. )

वेष्टिती सिंहकटितें । विद्रूपा राक्षसी महा ।
नील मेघांतली वीज । तैशी ही शोभते पहा ॥ ७ ॥

ही तरः—

श्लोक [ वृत्त–मालिनी. ]

भुजगसदृश कृष्णा एकवेणी धरीत ।
दिसत निज पतीचे चिंतनीं दत्त-चित्त ॥
सुकृश कटि जियेची मोजण्या ये करानें ।
तनुहि कृश गमे ही अन्न तें वर्जिल्यानें ।
वदन भिजविताती अश्रु; ही म्लान देवी—॥
सरसिज–वनमाला आतपें शुष्क जेंवीं ॥ ८ ॥

अरे ! इथं ह्या मशालीचा उजेड कुठला ? ( पाहून ) अरे, हा तर रावण ! हा—

श्लोक [ वृत्त–मालिनी ]

मणि–खचित किरीटें शीर्ष शोभें, सुढाळ ।
रुचिर नयन याचे ताम्रवर्णी, विशाल ॥
प्रतिपदिं दिसतें हा धुंद झाला मदानें ।
करि गमन जसा तो हस्ति उन्मत्त दानें ॥
युवति–जन–समूहीं भासतो राक्षसेंद्र ।
जणुं निवहिं मृगींच्या संचरें तो मृगेंद्र ! ॥ ९ ॥

आतां काय बरं करावं ? ठीक आहे, आतां असंच ! ह्या अशोक वृक्षावर चढावं, आणि याच्या ढोलींत बसून राहून, सगळी हकीकत पूर्णपणें समजून घ्यावी. ( तसें करितो. )

[ नंतर रावण आपल्या परिवारासह येतो. ]

रावणः— श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

ज्या मीं दानवदैत्यदेवचमुतें उच्छेदिलें संगरीं ।
दिव्यास्त्रांप्रति योजुनी, लव न ती भीती यदभ्यंतरीं ॥

ज्या मीं इंद्रकुलीशदंतिकृत ते आघात ही साहिले ।
त्यांचे या हृदयावरी व्रण बहू अद्यापिही राहिले ॥
त्या माझ्यावरि मैथिली न फिरवी प्रेमान्विता दृष्टिला ।
क्षुद्र क्षत्रिय तापसावरि परी प्रेमा हिचा गुंतला ! ॥ १० ॥

एकंदरींत दैवाचें निरानिराळीं विघ्नें आणण्याचें हें विलक्षण कसबच आहे!

( वर पाहून ) हा–हा तर चंद्रमा ! हा—

छंद [ दिंडी. ]

चकाके हा दर्पणासम रुप्याच्या ।
पीडि हृदया वृष्टिनें चंद्रिकेच्या ॥
नभीं उगवे, चढताच चंद्र पाही ! ।
कुमुद–बांधव हा परी मला दाही ! ॥ ११ ॥

( इकडे तिकडे फिरून ) ही सीता इथं वृक्षमूलाचा आश्रय करून बसली आहे. ही ध्यानामध्यें अगदीं गढून गेलेली दिसते, उपवासामुळं हिचं तोंड अगदीं वाळून गेलं आहे, हिला अशी पाहून असं वाटतं कीं, ही जशी कांहीं आपल्या स्वतःच्या देहांतच प्रवेश करण्याची इच्छा करीत आहे कीं काय ! हिनें आपलें स्तन आणि पोट हीं दोन्हीं न दिसतील अशीं झांकून घेतलीं आहेत; हिच्या सभोंवतीं ह्या राक्षसी कोंडाळं घालून बसल्या आहेत, त्यामुळें ही गडद अंधकारांत लुप्त झालेल्या चंद्रकोरेप्रमाणं दिसत आहे. हिनंः—

आर्या [ गीति. ]

ऐश्वर्या, सुखभोगा, तैसें मजला झुगारुनी दिधलें ।
नच वश मज ही होई, हृदय हिचें मानवावरी जडलें ॥१२॥

हनुमान्:—हां ! आतां सगळं ध्यानांत आलं.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप ]

हीच ती राजतनया । मैथिली, राम–कामिनी ।
सिंहा पाहून भ्यालेल्या । हरिणीसम पीडिली ॥ १३ ॥

रावणः—( सीतेच्या जवळ जाऊन )

श्लोक [ वृत्त—इं. व. ]

सीते ! त्यजी कठिन हें व्रत उग्र मोठें ! ।
हे भामिनी ! भज अजीं मज एक चित्तें ॥
त्या मानवा विसर त्यास 'गतायु' मानी ।
गेला तुझ्या समज कामपथा मधूनी ॥
भद्रे ! मलाचि भज भामिनि । एक चित्तें ।
सोडी व्रतास, करि दूर तसें तयातें ॥ १४ ॥

**सीताः**—हा मूढ रावण उपहासालाच पात्र आहे. कारण कसं बोललं असतां आपलं कार्य साधेल याचंहि याला तारतम्य नाहीं !

**हनूमान्ः**—( क्रोधानें ) अरे ! ह्या रावणाचा केवढा हा गर्व ! हा—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

दोर्दण्डा, सायका, किंवा । कोदण्डा प्रति त्या तशा ।
न जाणतांचि रामाच्या । संबोधी त्या 'गतायु'—सा ! ॥१५॥

मला क्रोध आवरत नाहींसा झाला आहे. तर आतां असंच ! आर्य रामचंद्राचं कार्य आतां मीच टाकतों उरकून. अथवा—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

लंकेशा मर्दितां मी ह्या । सिद्ध कार्यचि होइ तें ।
जरी तो मजला मारी । महत्कार्यचि नासतें ! ॥ १६ ॥

**रावणः**— श्लोक [ वृत्त-व. ति. ]

हे सुंदरी ! मुदुल—काय ! सुरम्य—नेत्रे ।
सोडी स्वकीय कबरीप्रति आत्महस्तें ॥
स्वीकारि या दशशिरा हृदयार्पणानें ।
यावीण शांत नच हो मन हें कशानें ! ॥ १७ ॥

**सीताः**—हंः ज्या अर्थी हा पापी राक्षस अजून पर्यंत जिवंत आहे, त्या अर्थी धर्मच उलटला आहे म्हणायचा !

**रावणः**—हें पहा, देवि !

**सीताः**—शाप घे !

**रावणः**—हः—हः हः हः ! अरे ! काय हें पतिव्रतेचं तेज !

आर्या-( गीति. )

ज्यानें त्या देवांचा केला रणिं मोड दानवांचाही।
त्या मज सीताशब्दें केलें कीं मूढ, तीन वर्णाहीं ॥ १८ ॥

[ पडद्यांत ]

"महाराजांचा विजय असो ! लंकेश्वरांचा विजय असो ! स्वामींचा विजय असो ! देवाचा विजय असो ! दहा घटका होऊन गेल्या, स्नानाची वेळ निघून चालली ! इकडून-इकडून यावं महाराजांनीं."

[ रावण परिवारासह निघून जातो. ]

हनूमान्‌—बरं झालं, हा रावण इथून निघून गेला. तसंच ह्या राक्षसस्त्रियांनाहि झोंप लागली आहे. हीच वेळ देवीजवळ जायला मोठी छान आहे. ( ढोलींतून उतरून ) सौभाग्यवती देवीचा जयजयकार असो.

श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

प्रेषिलें मजला रामें । नरेंद्रें तुज शोधण्या ।
तुझ्या विषयिंच्या स्नेहें । दुःख-पीडित तो असे ! ॥ १९ ॥

सीताः—( आत्मगत ) कोण बरं असावा हा ? कदाचित् हा कोणी दुष्ट राक्षस आर्यपुत्रांचा आपण स्नेही आहों असा खोटाच बहाणा करून हें वानराचं रूप धारण करून मला फसवूं तर पहात नसेल ना ? फशीव म्हणावं,-आपण आपलं मुकाट्यानं बसावं म्हणजे झालं !

हनूमान्‌ः—काय ? देवीला माझा विश्वास नाहीं वाटत ? दुसरी कसलीहि शंका मनांत आणूं नका. देवींनीं माझं म्हणणं ऐकून घ्यावं.

श्लोक [ वृत्त-अनु० ]

इक्ष्वाकुकुलदीपानें । सुग्रीवस्नेह साधुनी ।
मजला-हनुमानाला । धाडिलें तव शोधनीं ॥ २० ॥

सीताः—( आत्मगत ) कोणी का असेना. हा आर्यपुत्रांचं नांव सांगत आहे एवढ्याकरितांच कां होईना, पण मी याच्याशीं बोलतें.(उघड) बाबा ! काय हकीकत आहे आर्यपुत्राकडची ?

हनूमान्‌ः—ऐकावी देवींनीं—

श्लोक [ वृत्त-मालिनी. ]

ग्रहण करि न कांहीं अन्न, न त्राण तेणें; ।
सुकुन वदन जाई, होतसें पांडु वर्णें ! ॥

( साकी-वृत्त. )

पतिवत्सल ही, प्रभाव पतीचा परिचित पूर्ण असूनी।
विश्वासीना मम वचनावरि शोकें विव्हल म्हणुनी ! ॥
देहातें पहिल्या। टाकुनि घे जणुं दुसऱ्या ह्या ! ॥ २४ ॥

( उघड ) देवी ! तर आतां मी—

श्लोक [ वृत्त—पुष्पिताग्रा ]

विलसति धनु बाण यत्करांत।
पति तव आणिन देवि ! शीघ्र येथ ॥
मग पति निकटस्थ राहुनीया।
सहजचि देशिल शोक टाकुनीया।
त्यजिशिल मग संशयास पाही।
मजवरिच्या, नृपकन्यके ! अशाही ॥ २५ ॥

सीताः—बाबारे ! माझी ही दीन स्थिति ऐकून, आर्यपुत्र शोकानं विव्हळ होणार नाहींत अशा प्रकारानं तूं त्यांना माझं वृत्त सांग.

हनूमान्ः—जशी देवींची आज्ञा.

सीताः—जा, तुझी कार्यसिद्धि होवो.

हनूमान्ः—हा अनुग्रहच होत आहे माझ्यावर. (इकडे तिकडे फिरून) आतां मी इथं आल्याचं ह्या रावणाला कसं बरं कळवावं ? अथवा—असंच !

श्लोक [ वृत्त—मंदारमाला ]

ज्याच्यावरी कोकिलांचीं कुलें सर्वदा राहती आश्रया सेवुनी।
तैशीच तीं पद्मवृंदें जिथें विकसुनी टाकिती फार आल्हादुनी ॥
नाना तरू चारुते ज्यावरी, जो पयोदापरी नील कांती धरी।
त्या-ह्या त्रिकूटाप्रती काननाच्या सवें चूर्णितों आज मी मत्करीं ॥
जो रावणा राज्यवृद्धीमुळें होतसे दर्प तो टाकितो नाशुनी ! ।
मत्तां नृपां सर्वदा दण्डणें युक्तची उग्र मार्गाप्रती सेवुनी ॥ २६ ॥

[ जातात. ]

दुसरा अंक समाप्त.

---

# अंक ३ रा.

[ नंतर **शंकुकर्ण** प्रवेश करितो. ]

**शंकुकर्णः**—कोण आहे हे इथं ? **कांचन-तोरण** द्वारांत कोण उभं आहे ?

[ प्रतिहारी प्रवेश करिते. ]

**प्रतिहारीः**—आर्य ! मी विजया आहें. काय आहे काम ?.

**शंकुकर्णः**—विजये ! जा, जा. महाराजांना-लंकेश्वरांना लौकर जाऊन सांग कीं, अशोकवनिका बहुतेक उध्वस्त होऊन गेली आहे ! कारण:—

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

राज्ञी मण्डोदरी ही, प्रिय असति जिला भूषणें पल्लवांचीं ।
तोडीना पल्लवां ज्या उपवनिं, धरुनी आवडी भूषणांची॥
त्या उद्यानीं अशोकीं मलय अनिल जे सर्वदा वाहताती ।
स्पर्शाया पल्लवां ते धजति न जणुं कीं भीतिनें व्याप्त होती ! ॥
कोणाच्याही करांचा कधिं शिशुतरुतें जेथल्या स्पर्श नाहीं ।
ती ही उध्वस्त सारी दशमुख-वनिका, सांग, होऊनि राही ! ॥१॥

**प्रतिहारीः**—आर्य ! नेहमीं महाराजांच्या चरणाजवळ राहणाऱ्या तुमच्या सारख्याची उडालेली ही धांदल अगदींच अपूर्व दिसतें ! तेव्हां आहे काय हें?

**शंकुकर्णः**—होय, ती आहे खरी तशी. हें कार्य झटपट उरकलं पाहिजे. तर महाराजानां त्याची अगदीं तातडतोब वर्दी दे. जा, जा लौकर.

**प्रतिहारीः**—आर्य ! ही कळवितें मी जाऊन. [ जाते.

**शंकुकर्णः**—( समोर पाहून ) अरे ! हे महाराज लंकेश्वर इकडंच येताहेत. हे—

श्लोक [ वृत्त—चामर. ]

रक्त अंबुजासमान रक्त उग्र-लोचन ।
येत क्रुद्ध होउनी त्वरें इथेंचि रावण॥
दावितात मार्ग ज्यास स्वर्ण-दीप उज्वल।
येइ तो युगांतिचाच काय सूर्य केवल ! ॥ २ ॥

[ नंतर वर वर्णन केल्याप्रमाणें रावण प्रवेश करितो. ]

**रावणः**—अरे दूता !

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

**हां सांग, सांग मज शीघ्रचि वृत्त सर्व ।**
**मी ऐकितों वच तुझें दिसतें अपूर्व ! ॥**
**सोडूनि सर्व भय, वांच्छुनि मृत्युपाश ।**
**केलें अजीं बिकट या कुणि साहसास ? ॥**
**रम्या अशोक-वनिका कुणि ध्वंसिली ही ? ।**
**केला तथें मम महा उपमर्द पाही ! ॥ ३ ॥**

**शंकुकर्णः**—( जवळ जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो. जो आल्याची कुणाला वार्ताहि नाहीं अशा एका वानरानं उन्मत्तपणानं ही अशोक-वनिका पार उध्वस्त करून टाकली आहे !

**रावणः**—( तुच्छतापूर्वक ) काय—वानरानं म्हणतोस ! जा, त्याला तात्रडतोब पकडून घेऊन ये.

**शंकुकर्णः**—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

**रावणः**—ठीक आहे, ठीक आहे म्हणावं !

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

**जो कांपवीत समरांत जगत्त्रयातें ।**
**त्याच्या जरी करिति हे सुर विप्रियातें,**
**लागेल त्यां त्वरितची अमृताशनातें– ।**
**त्याचेंच शाल्य–फल त्यांप्रति चाखण्यातें ! ॥ ४ ॥**

[ **शंकुकर्ण** प्रवेश करितो. ]

**शंकुकर्णः**—महाराजांचा विजय असो. महाराज ! तो वानर मोठा बलवान् आहे. कमलाचा देंठ खुडून टाकावा त्याप्रमाणं त्यानं सालवृक्ष उपटून टाकले आहेत, दारुपर्वताचं त्यानं आपल्या मुष्टीच्या आघातानंच चूर्ण केलं आहे, आणि लतागृहें आपल्या तळहातानींच चुरडून टाकलीं आहेत; तसंच त्यानं आपल्या भुभुःकारानेंच प्रमदवनाच्या राक्षसांना बेशुद्ध करून सोडलं आहे ! तेव्हां त्याला पकडण्याला समर्थ होईल असं सैन्यच त्याच्यावर पाठविण्याची महाराजांनीं आज्ञा करावी.

रावणः—तर मग त्या वानराला पकडून आणायला हजार किंकर जाऊं देत.

शंकुकर्णः—जशी महाराजांची आज्ञा. [ जाऊन, पुनः परत येऊन. ] महाराजांचा विजय असो !

आर्या [ गीति. ]

अमुच्याचि महा वृक्षां फेंकुनि अमुच्याचि किंकरा वरते ।
त्या द्रुमयोधी कपिनें वधिले तत्क्षणिं महा प्रबल जरि ते ॥ ५ ॥

रावणः—काय ? त्यांचा वध केला म्हणतोस ? तर त्या वानराला पकडून आणण्याची माझी आज्ञा आहे म्हणून कुमार अक्षाला सांग.

शंकुकर्णः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

रावणः—( विचारांत मग्न होऊन )

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

कृतास्त्र, शूर, बलवान् । हा कुमार कपिप्रती— ।
आणील बद्ध करुनी । किंवा ठार करील त्या ! ॥ ६ ॥

( शंकुकर्ण प्रवेश करितो )

शंकुकर्णः—महाराजांनीं तावडतोब आणखी सैन्य पाठवावं.

रावणः—तें रे का ?

शंकुकर्णः—ऐकावं महाराजांनीं. कुमार त्या वानरावर चालून जात असल्याचं पाहून महाराजांची आज्ञा नसतांहि दुसरे पांच सेनापति त्यांच्या मदतीला गेले.

रावणः—बरं, मग ?

शंकुकर्णः—मग ते धांवून आल्याचं पाहून, त्या वानरानं थोडसं भ्याल्यासारखं दाखवून दाराचा आश्रय केला आणि मग त्या दरवाजाचा सोन्याचा अडसर घेऊन त्यानं पांचीहि सेनापतींना ठार केलं.

रावणः—आणि मग पुढें ?

शंकुकर्णः—नंतर कुमार अक्षांना, जो—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

गेला धांवुनि, क्रुद्ध होवुनि, रणीं आरक्तशा लोचनीं ।
ज्याचे धांवति अश्व तीव्र गतिनें ऐशा रथीं बैसुनी ॥

तो वेगें मग सोडि त्या रिपुवरी बाणावरी बाण ते ।
प्रावट्-कालिक-वृष्टिचीच सर ज्या वृष्टिप्रती शोभते ॥
ह्या बाणां चुकवून, तो कपि उडी मारूनि तत् स्यंदनीं ।
कंठा दाबुनि, मुष्टिघात करुनी टाकी तया मर्दुनी ! ॥ ७ ॥

रावणः—( क्रोधानें ) आः काय—काय ?

आर्या [ गीति— ]

थांब म्हणावें आतां गांठुनि कपि-जंतुका तुझें मीच ।
करितों क्षणांत भस्मचि माझ्या क्रोधाग्निच्या कणांनींच ! ॥ ८ ॥

शंकुकर्णः—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. कुमार अक्षांचा वध झाल्याचं ऐकून कुमार इंद्रजित क्रोधानं संतप्त होऊन त्याच्यावर चालून गेले आहेत.

रावणः—तर मग तूं जा, आणि या पुढील काय हकीगत आहे ती सारी समजून घेऊन ये.

शंकुकर्णः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

रावणः—कुमार अस्त्रविद्येंत निपुण आहे.

आर्या [ गीति. ]

युद्धामध्यें होतो वध, किंवा विजयलाभ वीरातें ।
कार्य जरी हें क्षुद्रचि ! चिंतेनें तरिहि चित्त हुरहुरतें ! ॥९॥

[ शंकुकर्ण प्रवेश करितो. ]

शंकुकर्णः—महाराजांचा विजय असो. लंकेश्वरांचा विजय असो ! भद्रमुखांचा विजय असो !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

कुमारांचें कपीसंगें । घोर संगर जाहलें ।
युद्धान्तीं वानरातें त्या । पाशें शीघ्रचि बांधिलें ! ॥१०॥

रावणः—इंद्रजितानं शाखामृगाला बांधून टाकलं यांत आश्चर्य तें काय ? कोण आहे इथं ?

[ एक राक्षस प्रवेश करितो. ]

राक्षसः—महाराजांचा विजय असो.

रावणः—जा, बिभीषणाला बोलावून घेऊन ये इथं.

राक्षसः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

रावणः—(शंकुकर्णास) तूंहि जाऊन त्या वानराला घेऊन ये तों पर्यंत.

शंकुकर्णः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

रावणः—( विचारांत पडून ) केवढी खेदाची गोष्ट ही !

आर्या ( गीति. )

सुर दानव मिळती तरि लंका घ्याया मनेंहि धजति न ते ! ।
अवगणुनी लंकेशा, परि हें मर्कट कसें इथें शिरतें ! ॥ ११ ॥

शिवाय

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

श्रीकंठाच्या प्रसादा मिळवुनि, चढुनी जाउनी त्या मदानें ।
त्रैलोक्या जिंकियेलें सुर असुर तसे युद्धिं म्यां विक्रमानें ॥
गर्वें कैलासिं गेलों हदरुनि अवघ्या टाकुनी त्या गिरीतें ।
दुर्गेतें, शंकरातें, गणपरिवृत त्यां कांपवीलें स्वहस्तें ॥
नंदीचा, पार्वतीचा, मजकडुनि तदा जाहला मानभंग ।
त्यांनीं शापा दिलें; तो कपि-वपु धरुनी येत का शाप सांग ॥१२॥

[ नंतर बिभीषण प्रवेश करितो. ]

बिभीषणः—( विचारांत निमग्न असा आपल्याशीं ) खरोखरच महाराजांना ही विपरीत बुद्धि झाली आहे. कारणः—

आर्या [ गीति ]

रामा सीता द्यावी ऐसें किति वेळ त्यास मी कथिलें ।
सुहृदांच्या शोकाचें मूळचि जो त्यास परि न हें रुचलें ! ॥१३॥

( रावणाजवळ येऊन ) महाराजांचा विजय असो !

रावणः—बिभीषणा ! ये, ये. बैस.

बिभीषणः—हा, हा बसलों मी. ( बसतो. )

रावणः—बिभीषणा ! तूं असा खिन्न कां दिसतोस ?

बिभीषणः—हिताची गोष्टहि आपले स्वामी ऐकत नाहींत असं पाहिलं म्हणजे त्यांच्या पदरीं असलेल्या सेवकजनांना खेदच व्हायचा !




**रावण**:—अरे, ए वानरा ! कोण तूं ! आणि आमच्या अंतःपुरांत इतक्या धिट ईनं काय म्हणून प्रवेश केलास !

[ अभि० पृ. २५

**रावणः**—ती गोष्टच जाऊं दे कशी. तूंहि त्या वानराला धरून आणायला जा पाहूं अगोदर.

**बिभीषणः**—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

[ नंतर राक्षस धरून आणीत आहेत असा हनूमान् प्रवेश करितो.]

**सर्वः**—अरे ए ! इकडून इकडून.

**हनूमान्ः**— **श्लोक** [ वृत्त—अनुष्टुप. ]

**त्या दुरात्म्या राक्षसानें । जिंकिलें न मला पहा ।**
**मीच त्याचे करीं गेलों ! । देखाया राक्षसेंद्र हा ! ॥ १४ ॥**

( रावणाजवळ येऊन ) अहो राजे ! आपलं कुशल आहे ना ?

**रावणः**—( तुच्छतापूर्वक ) बिभीषणा ! याचंच कां हें सारं काम ?

**बिभीषणः**—महाराज ! याच्यापेक्षांहि तें अधिक आहे.

**रावणः**—तुला काय माहीत ?

**बिभीषणः**—' कोण तूं ? '—म्हणून विचारावं महाराजांनीं त्यालाच.

**रावणः**—अरे, ए वानरा ! कोण तूं ? आणि आमच्या अंतःपुरांत इतक्या धिटाईनं काय म्हणून प्रवेश केलास ?

**हनूमान्ः**—मी कोण—काय, तें ऐका,—

**श्लोक**— [ वृत्त—अनुष्टुप. ]

**अंजनी जननी माझी । मी मरुत्-पुत्र औरस ।**
**हनूमान् बोलती मातें । राघवें मज धाडिलें ॥ १५ ॥**

**बिभीषणः**—महाराज ! काय—ऐकलत ?

**रावणः**—काय ऐकायचं ?

**बिभीषणः**—हनूमन् ! काय निरोप आहे त्या राघवांचा ?

**हनूमान्ः**—ऐक ! रामांची आज्ञा ऐक.

**रावणः**—काय—काय ! रामाची आज्ञा ? अरे ! ह्या वानराला ठार करून टाका !

**बिभीषणः**—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. दूतांनीं कोणतेहि अपराध केले तरी ते अवध्य आहेत; शास्त्रानींच ठरविलं आहे हें. तेव्हां

रामाचं काय म्हणणं आहे तें ऐकून मग काय करायचं असेल तें करावं महाराजांनीं.

**रावणः**—अरे, वानरा ! काय म्हणतो तो मानव ?

**हनूमान्ः**—अरे ! ऐक—

श्लोक [ वृत्त—इं. व. ]

घे शंकराच्या महदाश्रयातें । कीं दुर्गमा जाइ रसातलातें ।
गात्रें तुझीं भिन्न करीन सर्व । योजूनिया बाण महा अपूर्व ॥
धाडीन तूतें यमदर्शनास। माझ्या शरानेंचि, यमालयास ! ॥१६॥

हें आहे त्यांचं म्हणणं !

**रावणः**—हः हः हः हः

श्लोक [ वृत्त—प्रहर्षिणी ]

दिव्यास्त्रीं सकल सुरां पराभवीलें ।
दैत्यांचें अधिपति सर्व दास केले ॥
पौलस्त्या,—हरुनि सु-पुष्पकास त्याचें-
केलें म्यां हतबल, दर्पहीन साचें ॥

त्या माझ्यावरति मनुष्य राम काय—।
येतो हा, मजशिं करावया अपाय ? ॥ १७॥

**हनूमान्ः**—असे जर आपण पराक्रमी—तर मग त्यांच्या बायकोचं कपटी वेष घेऊन कां हरण केलंत?

**बिभीषणः**—हनूमानांनीं योग्य प्रश्न विचारला. कारण —

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

मायेनें वारुनी रामा । भिक्षुवेषास घेउनी ।
राक्षसेंद्रा ! तिला त्वांचि । नेलें कपट योजुनी ! ॥१८॥

**रावणः**— बिभीषणा ! एकून तूंहि शत्रूचाच पक्ष घेतोस ?

**बिभीषणः**— श्लोक [ वृत्त—इं. व. ]

व्हा, शांत राजन् ! वचना मदीय—
ऐका, जयें हो हित युष्मदीय ।

देऊनि टाका रघुराज-पत्नी
त्यानें टळे सर्व विपत्ति, हानि ॥
इच्छीं न मी राक्षस-पुंगवाच्या-
हस्तें विघाता निज अन्वयाच्या ! ॥ १९ ॥

रावणः—बिभीषणा ! अरे, तूं असं भलतंच भय काय बाळगतोस ?

श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

सटा दीर्घ अशा सिंहा । मृग केवीं वधील तो ?
प्रचंड मत्त हस्तीतें । कोल्हा मारील काय तो ?॥२०॥

हनूमान्‌ः—अरे, रावणा ! ज्याच्या दैवानं उलट खाल्ली आहे अशा राघवासंबंधानं तूं असं बोलणं योग्य आहे कां ? असं बोलूं नकोस या पुढं.

वृत्त ( ओंवी )

दुष्टात्म्या ! हे रात्रिंचरा ! । क्षीण-पुण्या, गत-सारा ! ।
वदनें वदशी नीच गिरा । शोभे काय, रावणा ?॥
वीर अतुल वीराग्रणींत । जो प्रतिदेवेंद्र अवतरत ।
त्रिभुवनांचा एकनाथ । तो तूं काय दूषावा ? ॥ २१ ॥

रावणः—काय ? अरे तुरे म्हणतो हा मला ? जा, ठार करून टाका या वानराला ! अथवा दूताचा वध करणं दोषार्ह होईल ! तेव्हां-शंकुकर्णा ! याच्या शेपटीला आग लाऊन सोडून दे या वानराला.

शंकुकर्णः—जशी महाराजांची आज्ञा. ( हनूमानाम ) चल, इकडून ये असा.

रावणः—अथवा इकडं ये पाहूं जरा. ( हनूमानास )

हनूमान्‌ः—हा आलों.

रावणः—त्या मानवाला माझा असा निरोप जाऊन सांग कीं—

श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

रामा ! दारापहरणें । आहे म्यां खंडिलें तुला ! ।
धनुष्याचा जरी दर्प । देई संगर तूं मला !॥ २२ ॥

हनूमान्‌ः—तें लौकरच पाहशील !

श्लोक [ वृत्त पुष्पिताग्रा ]

रघुवर–वर–चाप–नाद–घोष ।
श्रवण करूनिच पावशील नाश ! ॥
बघशिल झणिं तूं त्वदीय लंका ।
विगत-यशा विवशाच ती सुरेखा ! ॥
तट, विपणि, सुगोपुरें तुटोन ।
बघशिल तूं तिज सर्व छिन्न भिन्न ! ॥
कपिगण चुरितील आत्महस्तीं ।
प्रमदवनें असतील जीं सभोंतीं ! ॥ २३ ॥

रावणः—अरे ! घेऊन चला या वानराला माझ्या समोरून !

राक्षसः—अरे, इकडून, इकडून, ये.

[ राक्षसां बरोबर हनूमान् जातो ]

बिभीषणः—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. महाराजांच्या हिता-संबंधानंच आणखी कांहीं बोलायचं आहे.

रावणः—बोल, बोल. चांगलं आणि श्रेयस्कर असेल तें ऐकायला तयारच आहों आम्हीं.

बिभीषणः— मला असं वाटतं कीं, राक्षसकुलाचा विनाश अगदीं जवळ येऊन ठेपला आहे !

रावणः—कशामुळें ?

विभीषणः—महाराजांच्या विरुद्धाचरणामुळं.

रावणः—माझं कोणतं विरुद्धाचरण ?

बिभीषणः—सीताहरण–हेंच.

रावणः—सीताहरण केलं यांत दोष कोणचा ?

बिभीषणः—दोष अधर्माचा आणि–

रावणः—तुझ्या ह्या ‘ आणि ’ शब्दानं तुला आणखीहि कांहीं बोलायचं आहे असं दिसतं. तर बोल,–तुला काय बोलायचं आहे तें.

बिभीषणः—तें–असें–कीं,–

रावणः—बिभीषणा ! अरे अशी लपवा लपवी कां ! चोरून नको ठेऊस माझ्या पासून कांहीं. तूं जर खरं न बोलशील तर तुला माझ्या प्राणांचीच शपथ आहे !

**बिभीषण:**—महाराजांचं अभय असेल तर सांगतों.

**रावण:**—अभय आहे, चल. बोल झटदिशी.

**बिभीषण:**—समर्थाबरोबर वैर करण्याचा प्रसंग येणार !

**रावण:**—( क्रोधानें ) काय ? काय म्हटलंस ? समर्थाबरोबर वैर !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

घेउनी शत्रु–पक्षास । न भीतां राक्षसाधम ।
क्रोधाग्नी तीव्र पेटेशा । वचनाप्रति बोलतो ! ॥ २४ ॥

कोण आहे इथं ?

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप० ]

बंधुत्वासी उपेक्षूनी । शत्रु–पक्षास जो धरी ।
नको डोळ्यापुढें माझ्या । त्या येथून करा दुरी ! ॥ २५ ॥

**बिभीषण:**—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. मी आपण होऊनच जातों.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप० ]

आज्ञेनेंच तुझ्या जातों । न दोषें माझिया, नृपा ! ॥
कामक्रोधास टाकूनी । योग्य तेंच करी सदा ॥ २६ ॥

( इकडे तिकडे फिरून ) आतां—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

मी आजची कमल–लोचन राघवाला ।
जो घे करीं धनु भयानक, त्या नृपाला ॥
जो राम रावण–वधार्थ करी प्रतिज्ञा ।
त्यालाच आश्रयुनि, मानिन मी तदाज्ञा ॥
जो आश्रय–स्थल असे शरणागताचे ।
त्याच्या कृपेंविण जगीं हित हो कुणाचें ? ॥
झाला विनष्ट अजि राक्षसवंश त्यातें ।
उद्धारण्या फिरुनि, सेविन तत्पदातें ! ॥ २७ ॥

[ जातो.

**रावण:**—अरे ! हा बिभीषण गेलाच कीं निघून ! तर आतां या लंका-नगरीच्या रक्षणाची व्यवस्था मलाच पाहिली पाहिजे. [ जातो.

तिसरा अंक समाप्त.

# अंक ४ था.

[ नंतर वानरांचा कांचुकीय प्रवेश करितो. ]

**कांचुकीयः**—अहो, अहो बलाध्यक्ष ! वानरसेनेला युद्धाची सारी तयारी करायला सांगा.

[ बलाध्यक्ष येतो. ]

**बलाध्यक्षः**—आर्य ! हा खटाटोप कशाकरितां बरं ?

**कांचुकीयः**—सन्मान्य हनूमानांनीं आर्य रामाच्या सीतादेवीसंबंधाची बातमी आणली आहे.

**बलाध्यक्षः**—काय-काय आहे बातमी ?

**कांचुकीयः**—ऐकावं-

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

**शोकानें अति दुःखिता नृपसुता लंकेमध्यें ठेविली ।**
**तीतें-टाकुनि सर्व धर्मनियमा-त्या रावणें पीडिली ॥**
**या वृत्तें मनिं शोक-विव्हल असा श्रीराम देखोनिया ।**
**घे रामप्रिय साधण्यास मग तो सुग्रीव वाहोनिया ॥**
**भूपालें कपिनायकें परिसुनी हें वृत्त आज्ञापिलें ।**
**युद्धा सिद्ध करावया सकल हीं ह्या वानरांचीं दलें ॥ १ ॥**

**बलाध्यक्षः**—असं आहे एकून ? ठीक आहे तर, जशी महाराजांची आज्ञा.

**कांचुकीयः**—तर मग आतां मीहि वानरसेना सज्ज असल्याचं महाराजांना जाऊन कळवतों.

[ दोघेहि जातात. ]

**विष्कंभक झाला.**

---

[ नंतर राम-लक्ष्मण, सुग्रीव, व हनूमान् यांसह प्रवेश करितात. ]

**श्लोक** [ वृत्त-शा. वि. ]

**शृंगें, कंदर, काननें, अमित तीं मोठीं जयांचे वरी ।**
**ऐसे पर्वत मेघतुल्य किति म्यां उल्लंघुनी टाकिले ॥**

सिंह, व्याघ्र, गजेंद्र, सर्व डुलती सेवुनि ज्यांच्या जला ।
ऐशा त्या मधुरांबुला वितरत्या उल्लंघिल्या म्या नद्या ॥
तैसें कानन एक सुंदर महा, संपन्न पुष्पें फलें-।
ऐसें वृक्ष अनेक ज्यांत असती, तेंही असे लंघिलें ॥
उल्लंघूनि असे प्रदेश मग जों मार्गा पुन्हा लागलों ।
तों आतांच कपींद्रसैन्य सह मीं वेलातटा पातलों ! ॥ २ ॥

लक्ष्मणः—हे—हे भगवान् वरुण—

श्लोक [ वृत्त—पुष्पिताग्रा. ]

सजल जलधरा समान सिंधु-वारी ।
दिसत जणुं मणि इंद्रनील—कांतिधारी ॥
जलनिधि—लहरीवरील फेंस—माला ।
लहरि सवें हलतां गमे सुहार त्याला ! ॥
जलधिंत सरिता सहस्र ओघ आले ।
जलधिस ते निगुते सहस्र बाहु झाले ! ॥
जलनिधि सरिता—पतीस देखुनीया ।
गमतचि श्रीहरि कीं निजे जल—स्थलीं या ! ॥ ३ ॥

रामः—पण हें असं कसं ?

[ आर्या—गीति. ]

बाणहि जोडुनि झालों जो मी हा सज्ज रिपु वधायास ।
त्या मज वारुनि सागर काय करी शत्रुच्याच साह्यास ! ॥४॥

सुग्रीवः—अरे ! आकाशांत,—

श्लोक [ वृत्त—पुष्पिताग्रा. ]

सजल जलधरा समान कांती ।
तनु करि मंडित हेम—भूषणें ती ॥
रजनिचर कुठूनि येत ऐसा ।
शलभचि घे उडि अग्निमाजि जैसा ! ॥ ५ ॥

हानूमान्ः—अरे, वानर वीरानों ! तुम्ही अगदीं हुषारनिं असा आतां-

श्लोक [ वृत्त इं. व. ]

मर्दावया राक्षस-राज युद्धीं । रक्षावया रामनरेंद्र योधी ।
व्हा सज्ज आजी कपिपुंगवानो ! । जोडा यशा, जें जग सर्व वानो ॥
घ्या शैल, वृक्षां, करण्यास वृष्टी । व्हां खेंचुनी सज्ज प्रचंड मुष्टी ।
दंता, नखां, जानुंस सिद्ध ठेवा । युद्धीं भुभुःकार अखंड सेवा !॥६॥

रामः—(मारुतीस) काय ? राक्षस आला आहे म्हणतोस ? हनूमान् ! घाबरण्याचं कारण नाहीं.

हानूमानः—जशी महाराजाची आज्ञा.

[ नंतर बिभीषण प्रवेश करितो. ]

बिभीषणः—अरे ! मी तर राघवाच्या शिबिराच्या अगदीं सन्निध येऊन पोंचलों. ( विचार करून ) यांच्याकडे मी पूर्वी दूतहि पाठविला नाहीं, कीं—मी येणार असल्याचं यांना अगोदर कळिवलंहि नाहीं; शिवाय मी यांच्या शत्रूचा संबंधी! तेव्हां ह्या राघवानां मला ओळखावं तरी कसं ? कारण-

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

होतां रावण क्रुद्ध त्याज पुढती प्रत्यक्ष तो इंद्रही ।
ठाकाया न धजे सुरां सहित ही तो चण्ड वज्रग्रही ॥
त्याचा बंधु वृथा कसा शरण ये ? ऐसें मनीं शंकुनी ।
मातें काय वदेल कांहिं न कळे, ही भीति माझ्या मनीं ॥ ७ ॥

अथवा— आर्या ( गीति )

शरणागत वत्सल हा जाणत धर्मार्थ-तत्व, साधु महा ॥
शुद्ध मनें येउनिया, शंकावा राम काय म्यां अजि हा ? ॥ ८ ॥

( खालीं पाहून ) हाच ह्या रघुकुलश्रेष्ठाचा तळ दिसतो. तर आतां इथंच उतरावं. ( उतरून ) इथं उभं राहून मी आल्याचं देवांना कळिवतों.

हनूमानः—( वर पाहून ) अरे. हे तर सन्मान्य बिभीषण दिसतात !

बिभीषणः—अरे हा तर हनूमान् ! हनूमान् ! मी आल्याचं देवांना कळवा.

हनूमानः—ठीक आहे. कळिवतो. ( रामाजवळ जाऊन ) देवांचा विजय असो.

आर्या-( गीति. )

**प्रभुजी ! तुमच्या करितां बंधु-करें मुकत जो स्वदेशाशीं ।**
**तो हा शरण बिभीषण धर्मात्मा ये त्वदीय चरणांशीं ॥९॥**

रामः--काय ? बिभीषण-आणि शरण आला आहे म्हणतोस ? वत्सा, लक्ष्मणा ! जा, आणि बिभीषणाला योग्य सत्कारपूर्वक इथं घेऊन ये.

**लक्ष्मणः**--जशी आर्यांची आज्ञा !

**रामः**--सुग्रीवा ! तुला कांहीं बोलायचं आहे असं दिसतं.

**सुग्रीवः**--देव ! हे राक्षस मोठे मायावी आणि कपटयुद्ध करणारे आहेत. तेव्हां नीट विचार करूनच बिभीषणाला आंत येऊं द्यावं.

हनूमान्ः--महाराज ! छेः छेः असं म्हणूं नका,

आर्या-( गीति.)

**प्रभुचे भक्त अम्हि जसे त्याच परी हा बिभीषणहि भक्त ।**
**लंकेंत वाद करितां बंधुसवें मजशिं होय हें व्यक्त ! ॥ १० ॥**

**रामः**--असं असेल तर जा, जा झटदिशी, आणि नीट सत्कारपूर्वक बिभीषणाला इथं घेऊन ये.

**लक्ष्मणः**--जशी आर्यांची आज्ञा. ( फिरून ) अरे ! हे इथं आहेत बिभीषण ! ( त्यास ) अहो, बिभीषण ! क्षेम आहे आपलं ?

**बिभीषणः**--अरे, हे तर कुमार लक्ष्मण ! (उघड) कुमार ! आज क्षेम झालं आहे माझं !

**लक्ष्मणः**--बिभीषण ! चला या, आपण आर्यांच्याकडे जाऊं या आतां.

**बिभीषणः**--ठीक आहे, चला.

[ रामाचे जवळ जातात. ]

**लक्ष्मणः**--आर्यांचा विजय असो.

**बिभीषणः**:--देवाची कृपा असावी. देवांचा विजय असो.

**रामः**--( आपल्याशीं ) अरे ! हा तर बिभीषण ! ( त्यास ) बिभीषणा ! कुशल आहे ना आपलं ?

**बिभीः**--देव ! आज कुशली झालें आहें मी !

आर्या ( गीति. )

हे प्रभु ! शरण्य तूं, तुज आलों मीं शरण पद्मनयनातें।
त्वद्दर्शनेंचि हरिलें कल्मष मम; तेंचि करित कुशलातें ॥११॥

**रामः**—आजपासून माझ्या आज्ञेनें लंकेश्वर हो.

**बिभीषणः**—हा अनुग्रहच आहे माझ्यावर.

**रामः**—बिभीषणा ! तुझ्या येण्यानंच आमचें कार्य सिद्ध झालें आहे. मात्र हा समुद्र तरून जायला काय उपाय करावा कांहीं समजत नाहीं !

**बिभीषणः**—देव ! यांत समजायचं असं काय आहे ? समुद्रानं आपण होऊन जर मार्ग दिला नाहीं, तर देवांनीं त्याच्यावर एखादं दिव्य अस्त्र टाकलं म्हणजे झालं.

**रामः**—ठीक, बिभीषणा ! असंच, असंच करायचं तर आतां. [एकदम उठून रोषानें ]

श्लोक–[ वृत्त–व.ति. ]

देई समुद्र न जरी मज मार्ग जाया ।
बाणेंचि जाळिन तयांतिल पंकतोया ! ॥
दावीन अब्धितल जेथ विकीर्ण होती–।
ते मत्स्य पावुनि मृती शतकोटि–पंक्ती !॥
लाटा उठून मग त्या फुटती कुठून ।
त्यांचा ध्वनीहि चिर शांतचि होय तूर्ण ! ॥ १२ ॥

[ नंतर वरूण प्रवेश करितो. ]

**वरुणः**—( सभय आपल्याशीं ) हा नारायणच–

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

जो आश्रयूनि नरदेह जगांत येई ।
कार्यार्थ जो धरितसे अवतार पाही ॥
ज्याच्या शरें सुर-रिपू मरतात ठार ।
तद्बाण देति मजला भय दुर्निवार ॥
त्याचा घडे मम करें अपराध थोर ।
जातों तया शरण, तो प्रभु तारणार ॥ १३ ॥

(पाहून) अरे! हे भगवान् इथं आहेत. हे—

(साकी—वृत्त.)

**चक्र, गदा, सारंग धरुनि करिं, घेउनि मानव-काया।**
**कारण असुनी स्वतां जगाचें, येती योजुनि कार्या ॥ १४ ॥**

ह्या त्रैलोक्याचें कारण असणाऱ्या, ह्या भगवान् नारायणांना माझे नमस्कार असोत.

**लक्ष्मणः**—(त्यास पाहून) अरे! हा कोण?

[श्लोक वृत्त—मालिनी]

**मणि—मुकुट धरी जो शीर्षि, तेजें सुढाळ।**
**रुचिर अरुणवर्णी नेत्र ज्याचे विशाल ॥**
**नव कुवलय तुल्या नीलता यत्तनूस।**
**दिसत गमन—शैली मत्तदंतीपरीस ॥**
**उठुनि जलनिधीच्या मध्यभागामधूनी।**
**त्वरितगति वरी ये दिव्य कांती धरूनी ॥**
**नमवित निज तेजें सर्वही जीवलोका।**
**असत कवण कांहीं हें कळेना विलोका! ॥ १५ ॥**

**बिभीषणः**—देव! हे भगवान् वरुण आले आहेत.

**रामः**—काय? भगवान् वरुण हे? (त्यास) भगवन् वरुण! हा मी आपल्याला प्रणाम करितों.

**वरुणः**—देवाधिदेवांनीं मला नमस्कार करणं उचित नव्हे. हो, अथवा—असंच.

छंद—दिंडी.

**राजपुत्रा! हा रोष पुरे आतां।**
**केंवि चढला हा कोप देव—चित्ता?**
**करा पुरुषोत्तम! शीघ्र मजशिं आज्ञा।**
**काय करणें तें मजशीं कथा प्राज्ञा! ॥ १६ ॥**

**रामः**—आपण लंकेला जायला मार्ग द्यावा आम्हांला.

**वरुणः**—हा मार्ग. या मार्गानं जावं आपण. [गुप्त होतो.]

**रामः**—काय ? भगवान् वरुण गुप्त झाले ? बिभीषणा ! पहा, पहा. या महाभागाच्या कृपेनं या महासागरांत लाटा देखील उठेनातशा झाल्या !

**बिभीषणः**—देव ! आतां तर हा समुद्र दुभंगच झाल्याचं दिसतं.

**रामः**—हनूमान् कुठं आहे ?

**हनूमान्ः**—देवांचा विजय असो.

**रामः**—हनूमन्! तूं सर्वांच्या पुढें हो.

**हनूमान्ः**—जशी देवांची आज्ञा.

[ सर्व ईकडे तिकडे फिरतात. ]

**रामः**—(पाहून विस्मयानें) वत्सा, लक्ष्मणा ! मित्रा बिभीषणा ! राजा सुग्रीवा ! सख्या हनूमंता ! अहो, ही पाहिलीत कां या सागराची केवढी विचित्रता आहे ती ? इथं:—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

**कोठें फेंकित फेंस, दावित कुठें हा मत्स्य-संघाप्रती ।**
**कोठें शंख असंख्यची, धरि कुठें हा नीलमेघद्युती ॥**
**कोठें वीचि अनेक, भीषण कुठें नक्रांमुळें होतसे ।**
**कोठें निश्चल वारि, दावित कुठें आवर्त हा चण्डसे ! ॥ १७ ॥**

भगवंतांच्या कृपेनं हा सागर तर तरून आलों.

**हनूमान्ः**—देवा ! ही ही पहा लंका.

**रामः**—(बराच वेळ पाहून) अहो ! ह्या राक्षस-नगरीचं वैभव लौकरच नष्ट होणार! ही–

श्लोक [ वृत्त–मंदाक्रांता. ]

**नोहे लंका नगरि, दिसते नांव ही सागरांत ।**
**मद्बाणांचा पवनचि पहा भग्न हीतें करीत ! ॥**
**नोहे सेना कपिरचित ही, वीचि ह्या ताडितात– ।**
**बाजू हीच्या; गमत मज ही नांवची अंबुधींत ॥**
**ह्या नौकेचा दशमुख महा दुष्ट जो कर्णधार ।**
**त्याच्या दोषें अजि बुडत ही पावुनी नाश घोर ! ॥ १८ ॥**

सुग्रीवा ! ह्या सुवेलाचलावर सैन्याचा तळ द्यावा. (बसतो)

सुग्रीवः—जशी देवांची आज्ञा. नीला ! याप्रमाणें व्यवस्था करा.

नीलः—(येऊन) जशी महाराजांची आज्ञा, ( जाऊन पुन्हां येऊन ) देवांचा विजय असो. सैनिकांना क्रमाक्रमानें त्यांचे त्यांचे ठिकाणीं बसवीत असतां, आणि सैनिकांच्या परिजनांची तपासणी करीत असतां नांवनिशीच्या चोपड्यांत ज्यांचा पत्ता लागत नाहीं असे दोन वानर आढळले; त्यांना धरून आणलं आहे. त्यांचं काय करायचं हें आम्हांला समजत नाहीं. जशी देवांची आज्ञा होईल त्याप्रमाणें करूं.

रामः—जा, त्या दोघांना घेऊन या इथं लौकर.

नीलः—जशी देवांची आज्ञा. [ जातो.

[ तदनंतर नील, व वानरांनीं धरून आणलेले—वानररूप धारण केलेले शुक व सारण हात जोडून प्रवेश करितात. ]

वानर सेवकः—( त्या दोघांस ) अरे ! बोला-बोला. कोण तुम्हीं ?

दोघेः—महाराज ! आम्हीं आर्य कुमुदाचे सेवक आहोंत.

वानर (सेवक):—महाराज ! हे आपण आर्य कुमुदाचे सेवक असल्याचं सांगतात.

बिभीषणः—( शुक सारणास न्याहळून पाहून )

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

**नच सैनिक माझे हे। किंवा हे न वनौकस ।**
**रावणें धाडिलेले हे । शुक, सारण, राक्षस ! ॥ १९ ॥**

दोघेः—( आत्मगत ) अरे, घात झाला ! कुमारांनीं ओळखलं आपल्याला ! ( उघड ) आर्य ! आम्हीं दोघेजण राक्षस-राजाच्या विपरीत बुद्धीमुळं राक्षसकुलाचा नाश होत आहे असं पाहून, कोठेंहि ठाव न मिळाल्यामुळं आर्यांचा आश्रय करावा म्हणून, हीं वानररूपं धारण करून इथं आलों आहोंत.

रामः—मित्रा बिभीषणा ! आपल्याला काय वाटतं या बाबतींत ?

बिभीषणः—देव !

आर्या ( गीति. )

**दोघे लंकेशाच्या विश्वासांतील मंत्रि हे फार ।**
**प्राणांतिक संकटिंही त्यजितिल नच त्यास हाच निर्धार !॥२०॥**

याकारितां ह्यांना योग्य दिसेल तें शासन करण्याची आज्ञा करावी.

**रामः**—बिभीषणा ! छेः छेः असं नको. हें नाहीं बरोबर होणार.

**श्लोक** [ वृत्त–अनुष्टुप. ]

**या दोघां दंडितां मातें । लाभ कांहींच तो नसे ।**
**रावणाचीहि ना हानी । द्या यांतें सोडुनी कसे ॥ २१ ॥**

**लक्ष्मणः**—यांना जर सोडूनच द्यायचं तर छावणींत जाऊन सगळ्या सैन्याची एकवार नीट पहाणी करून, मगच आर्यांनीं यांना सोडून देण्याची आज्ञा करावी.

**रामः**—लक्ष्मणाचं म्हणणं बरोबर आहे. नील! तर या प्रमाणं व्यवस्था करा.

**नीलः**—जशी देवांची आज्ञा !

**रामः**—( त्या दोघां राक्षसांस ) अथवा–इकडं या पाहूं जरा.

**दोघेः**—हे इथं आलों आहों आम्हीं.

**रामः**—त्या राक्षसेंद्राला माझा असा निरोप सांगा; त्याला म्हणावं कीं–

**श्लोक** [ वृत्त–अनुष्टुप. ]

**मम दारापहारानें । मज युद्धा प्रवर्तिलें ।**
**आलों मीं रण–भिक्षेतें । परी तुज न देखिलें ! ॥२२॥**

समजलांत ?

**दोघेः**—जशी देवांची आज्ञा. [ दोघेहि जातात.

**रामः**—बिभीषणा ! आम्हींहि आतां क्रमाक्रमानें इतर सैन्याची तपासणी करितों. !

**बिभीषणः**—जशी देवांची आज्ञा.

**रामः**—( इकडे तिकडे फिरून, पाहून ) अरे ! भगवान् सूर्य नारायण अस्ताला चालले. यासमयीं—

**श्लोक** [ वृत्त–स्रग्धरा. ]

**शीर्षी अस्ताचलाचे चढुनि, अवरुनी घे करां सूर्य सर्व ।**
**संध्या–रागें प्रभा ये सुरुचिर, तशि ही रक्तिमा ये अपूर्व ॥**
**दंती–गंडस्थलीं त्या द्युतिमय अरुणा झालरी घालुनीया ॥**
**तेथें त्या स्वर्ण–गोला बसविति तशि ये कांति ती भास्करा या॥२३॥**

( सर्व जातात. )

**चवथा अंक समाप्त.**

# अंक ५ वा.

[ नंतर राक्षस-कांचुकीय प्रवेश करितो. ]

**कांचुकीयः**—कोण आहे तो ? प्रवाल-तोरण द्वारांत कोण उभा आहे ?

[ दुसरा राक्षस प्रवेश करीतो ]

**राक्षसः**—आर्य मी आहे. काय काम आहे ?

**कांचुकीयः**—जा, आणि महाराजांच्या आज्ञेनुसार विद्युज्जिव्हांना इथं बोलावून घेऊन ये.

**राक्षसः**—ठीक आहे आर्य ! आणतो बोलाऊन. [ जातो.

**कांचुकीयः**—अहो ! राक्षसकुलाच्या उर्जितावस्थेला उतरती कळा लागली असतां, महाराजांचीं सर्व साधनं नाहींशीं होत असतां, त्यांचे वीर-पुरुष ठार होऊन त्यांचें स्वतःचे प्राणहि संशयित झाले असतां,—अजूनहि त्यांची बुद्धि निवळूं नये म्हणजे काय ? कारण—

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

समुद्र-वीची उसळूनि मोठ्या । तटांवरी आदळती धडाडा ।  
पाणी जयाचे बहु नील आहे । प्रचंड नक्रीं परिपूर्ण पाहे ॥  
सिंधूस जो लंघुनि ये अशाही । दारा तयाचीच तयास पाही- ।  
देऊन, शांती जरि प्राप्त होते । संपादिना कोण सुधी तियेतें? ॥१॥

शिवाय—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

प्रहस्त, कुंभकर्णादि । रामें राक्षस मारिले ।  
आज इंद्रजिताचे ही । तयानें प्राण घेतले ! ॥ २ ॥

असं असूनहि,-

श्लोक [ वृत्त—पुष्पिताग्रा ]

निज सचिव-वचें न आदरूनी ।  
मनसिज-हस्ति मदांध सांपडूनी ॥  
रघुकुल-तिलका न देइ सीता ।  
धरुनि मनीं नसतीच ती अहंता ॥

असुनिहि रणवीर मानि योद्धा ।
करित अधर्म महा रिघूनि युद्धा ! ॥ ३ ॥

[ विद्युज्जिव्ह प्रवेश करितो. ]

विद्युज्जिव्हः—आर्यांचं क्षेम आहेना ?

कांचुकीयः—विद्युज्जिव्हा ! जा, आणि महाराजांच्या आज्ञेनुसार राम आणि लक्ष्मण यांच्या शिरांच्या अगदीं हुबेहुब प्रतिमा करून घेऊन ये.

विद्युज्जिव्हः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

कांचुकीयः—तर आपणहि आतां महाराजांच्या जवळपासच असावं. [ जातो.

—विष्कंभक समाप्त.—

[ नंतर राक्षसांनीं परिवेष्टित अशी सीता प्रवेश करिते. ]

सीताः—आर्यपुत्रांच्या येण्यामुळं अत्यंत आनंदित झालेल्या ह्या माझ्या हृदयाला आज असं अस्वस्थ झाल्यासारखं कां बरं वाटत आहे ! चिन्हंहि अनिष्ट अशींच होत आहेत. आणि तसंच माझं हें हृदयहि धडधड उडत आहे ! परमेश्वरच यांतून पार करील तेव्हां खरं.

[ इतक्यांत रावण प्रवेश करितो. ]

रावणः—( भासमान होणाऱ्या लंकानगरीला उद्देशून ) जाऊं नकोस.

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

ही हें नवें धवल पद्म करीं धरूनी ।
हा ! चालली अजि मदीय गृहा त्यजूनी ! ॥
लक्ष्मीस ह्या धरियलें झणिं मत्करानें ।
लंका जई जितलि म्यां निज विक्रमानें ॥
देऊनिया परिभवास धनाधिपातें ॥
ह्या चंचलेस हरिलें धरुनी स्वहस्तें ॥ ४ ॥

भवति ! थांब, थांब, जाऊं नकोस—जाऊं नकोस. काय म्हटलंस ? “ तुला सोडून रामाकडे जाते ”—म्हणून ? आः आः दुष्टे !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

कुबेराचे गृहीं तेव्हां । बळें म्यां धरिलें तुला ।
बळेंची धरितों आतां । युद्धीं रामा वधूनिया ! ॥ ५ ॥

हिची काय कथा ! ही जर रामाकडे चालली तर मीहि ह्या सीतेवर आपलें मोहजाल टाकतो. ( मदनानें पीडित झालासें दाखवून ) अहो, कुसुमचाप धारण करणाऱ्या मदनाचं सामर्थ्य अतुल आहे ! कारण—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

सीतेचें मुख देखुनी विसरती निद्राहि मल्लोचन ।
देखोनी रमणीय वस्तु विविधा संतापतें मन्मन ।
सीतालिंगन वांच्छुनी मम तनू ही होइ ऐशी कृश ।
हा धिक् ! रावण जिंकि जो त्रिभुवना तो मन्मथातें वश ! ॥६॥

( जवळ जाऊन )

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

हे सीते ! अरविंद–पत्र–नयने, मच्चित्त–आनंदिनी ।
काढी मानस मानवीं दृढचि जें गेलें असें गुंतुनी ॥
पाही तूं अजि चित्त–कान्त अपुला त्या लक्ष्मणाच्या सवें ।
शस्त्रानें पडतां रणीं मम करें,–मी मर्दितां लाघवें ॥ ७ ॥

सीताः—अरे ! रावणका ! खराच, तूं अगदींच मूढ आहेस ! कारण तूं प्रत्यक्ष मंदर पर्वताला हातानं उचलून पाडण्याची इच्छा करीत आहेस !

[ एक राक्षस प्रवेश करितो ]

राक्षसः—महाराजांचा विजय असो.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

मानवी राजपुत्रांची । शीर्षें हीं छेदुनी रणीं ।
कुमारें आणिलीं येथें । आपुलें प्रिय वांच्छुनी ! ॥ ८ ॥

रावणः—सीते ! बघ, बघ, हीं त्या दोघां मानवांची डोकीं !

सीताः—हाय ! हाय ! आर्यपुत्र ! ( मूर्च्छित होते. )

[ श्लोक–वृत्त अनुष्टुप. ]

सीते ! सोडूनि तो प्रेमा । होता जो या मृतावर ।
जोडी विशालनयने ! महत् वैभव सुंदर ॥ ९ ॥

सीताः—( शुद्धीवर येऊन ) हाय, हाय ! आर्यपुत्र ! स्वच्छ ताज्या कमळासारखीं हीं मुखकमळं,—यांच्या वरील डोळे आणि बुबुळं हीं फिरून

गेलीं आहेत—हीं पाहण्याइतका धीर आला कुठून मला अभागिनीला ? हें चमत्कारिकच नव्हे का ? हाय, हाय ! आर्यपुत्र ! मला या दुःखसागरांत लोटून देऊन कुठं गेलात तुम्हीं ? हें सगळं पाहून देखील मला अजून मरण कसं येत नाहीं ? अथवा हें सारं खोटं तर नसेल ? (रावणास) अरे, बाबा ! ज्या खड्गानं तूं आर्यपुत्रांचा बध केलास त्याच खड्गानं मलाहि एकदाची ठार मारून टाक.

**रावणः**— श्लोक [ वृत्त–अनु० ]

**रणामध्यें इंद्रजितें । वधिलें रामलक्ष्मण ।**
**कोणा कडून गे आतां । घडेल तव मोचन ? ॥ १० ॥**

( पडद्यांत )

" रामाकडून ! रामाकडून ! "

**सीताः**—उदंड औक्ष असो आर्य-पुत्रांना.

( राक्षस प्रवेश करितो )

**राक्षसः**—( घाबरून ) रामा कडून ! रामा कडून !

**रावणः**—काय–काय ? रामा कडून काय झालें म्हणतोस ?

**राक्षसः**—शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. ( रामलक्ष्मणांचीं शिरकमलें पाहून ) तडका फडकी घडून येणाऱ्या गोष्टी महाराजांना कळविण्याचें घाईत ही इथली निराळ्याच प्रकारची परिस्थिति माझ्या लक्षांतच कशी ती आली नाहीं.

**रावणः**—बोल, बोल, त्या दुबळ्या मनुष्यानं काय केलं ?

**राक्षसः**—ऐकावं महाराजांनीं. आजः–

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

**त्या राघवानें बलवीर्यसारें ।**
**घेऊनिया तें चतुरंग सारें ॥**
**त्या लक्ष्मणाचे सह येउनीया ।**
**लंकेश्वरातें अवमानुनीया ॥**
**युद्धीं सुता इंद्रजिता धरूनी ।**
**संमर्दिले हाल पुरे करूनी ! ॥ ११ ॥**

**रावणः**—आ: दुष्टा ! रणभीरो !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

**जिंकी इंद्रासवें देवां । तैसे दैत्या पराभवी ।**
**कुमारा मेघनादा त्या । वधावें काय मानवीं ? ॥ १२ ॥**

खोटी गोष्ट आहे ही.

**राक्षसः**—महाराज ! शांत व्हा, शांत व्हा ! महाराजांच्या चरणापाशीं कुमारांच्या संबंधानं मी कांहीं खोटं सांगितलं नाहीं.

**रावणः**—हा वत्सा ! मेघनादा ! ( मुर्च्छा येऊन पडतो. )

**राक्षसः**—महाराज ! सावध व्हा, सावध व्हा.

**रावणः**—( शुद्धीवर येऊन )

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

**हे वत्सा ! जगतापना ! रिपुगणा तूं वांकवीता महा ! ।**
**हे वत्सा ! सकलास्त्रविद् ! रणपटो ! तूं इंद्रजेता अहा ! ॥**
**हें ताता ! गुरु—वत्सला ! गुणनिधे ! हे युद्ध-शौंडा, अरे ! ।**
**हे वत्सा ! मज येथ टाकुनि कुठें गेलास तूं सांग रे ! ॥ १३ ॥**

( पुन्हा मूर्च्छा येते. )

**राक्षसः**—अरेरे ! धि:कार असो ! त्रैलोक्यालाहि जिंकून टाकणारा हा लंकेश्वर, पण, ह्याचीहि या दुष्ट दैवानं अशी दीन अवस्था करून टाकली ! महाराज, सावध व्हा, सावध व्हा.

**रावणः**—( सावध होऊन ) अशा अनर्थाला कारण झालेल्या ह्या सीतेला घेऊन मला आतां काय करायचं ? त्याचप्रमाणं साऱ्या त्रैलोक्याच्या विजयाला देखील विफल करून टाकणारी ही चंचल लक्ष्मी घेऊन तरी मला आतां काय करायचं आहे ? अरे ! दुष्टा, कृतांता यमा ! अजून देखील तूं भीतीनें गांगरूनच गेला आहेस काय ?

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

**स्नेहशून्याचि ज्या झालें । सारें इंद्रजिताविण ! ।**
**अद्यापि तो प्राण धरी । हा कठोर दशानन ! ॥ १४ ॥**

( असें म्हणून दुःखविव्हल होऊन पडतो. )

राक्षसः—अरे ए रात्रिंचर वीरांनो ! आंतील तटांवर असणाऱ्या रक्षकांनो ! महाराजांची ही अशी अवस्था झाली आहे तेव्हां तुम्हीं आतां नीट दक्षपणानं वागा.

[ पडद्यांत. ]

" हे राक्षस–वीरांनो ! युद्धाच्या आरंभींच प्रहस्त, निकुंभ, कुंभकर्ण आणि इंद्रजित् हे नाश पावल्यामुळें निस्तेज झालेला सेनासागर पाहून, भयचकित होऊन, रणांतून पराङ्मुख झालेल्या राक्षस–वीरांनो, देवांच्या बरोबर झालेल्या रणसंग्रामांत एकसारखे जयावर जय मिळविणाऱ्या तुम्हांला हें असं घाईघाईनं रणांतून पळून जाणं अत्यंत अयोग्य आहे ! त्यांतून देखील त्रैलोक्याचा विजय संपादन करून ख्याती पावलेले, वीस बाहूंनीं युक्त असे, हे लंकेश्वर महाराज या ठिकाणीं असतांना, असं पलायन करणं तर अगदींच अश्लाघ्य !

रावणः—( ऐकून क्रोधानें ) तूं जा, आणि पुन्हां सगळी हकीगत समजून घेऊन ये.

राक्षसः—जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन पुन्हां येतो ) महाराजांचा विजय असो.

हा रामः—

श्लोक [ वृत्त–मालिनी. ]

धनुवरि चढवूनी बाण गर्वोचि येई ।
अवगणित तुम्हांतें राम हा येथ पाही ! ॥
प्रकट करिति याचीं फुल्ल नेत्रें प्रहास ।
कपिगण–परिवारें वेष्टिलेंसे तयास ॥
रणमुखिं वधुनीया त्वत्सुता, येत आहे ।
जणुं दहन कराया काय लंकापुरी हे ! ॥ १५ ॥

रावणः—( एकदम उठून क्रोधानें ) कुठं आहे–कुठं आहे तो ? ( खड्ग उचलून )

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

क्षुद्रा ! घुंगुरड्या ! कुठें पळुनिया जाशी अतां थांब रे ! ।
या खड्गें अजि अर्पितों तव बळी क्रोधाप्रती पाहि रे ! ॥

याची धार कठोर फारचि असे, हा खड्ग माझा पहा ।
तो ऐरावत-गण्ड--भागहि महा फोडील घातेंचि हा ! ॥
रक्षाया तुज येति देव तरि ते येवोत सारे इथें ।
प्रेतातें तुझिया ससंभ्रमपणें होतील ते पाहते ! ॥ १६ ॥

**राक्षसः**—महाराज ! भलतंच साहस करूं नये.

**सीताः**—( एकीकडे ) हें ह्याला कसं रुचेल ? कारण अयोग्य आणि अनिष्ट अशीं कृत्यं अकारण करणाऱ्या ह्या रावणाचं आतां मरणच ओढवून आलं आहे !

**रावणः**--हिच्याच पायांत माझे पुष्कळ भाऊ, मुलगे आणि मित्र ठार झाले आहेत म्हणून माझ्या शत्रूवर जडलेलं हिचं हें हृदय विदारण करून, हिचीं आंतडीं ओढून काढून, त्यांच्या माळा गळ्यांत घालून, माझ्या खड्गाच्या विद्युत्पातानं ह्या दोन्ही मानवांसह सगळ्या वानरकुळाचा विध्वंस करून टाकतों !

**राक्षसः**--शांत व्हावं, शांत व्हावं महाराजांनीं. शत्रुसैन्यानं केलेल्या ह्या हल्ल्यासंबंधानं आतां उगीचच्या उगीच असा एकसारखा त्रास करून घेणं पुरे, पुरे हें. आणि स्त्रीवध तर आपल्याला करितांच येत नाहीं. ( तसं करण्यास शास्त्राचाच निषेध आहे. )

**रावणः**—तर मग माझा रथ घेऊन ये.

**राक्षसः**—जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन फिरून येतो ) महाराजांचा विजय असो. हा तयार आहे रथ.

**रावणः**—( रथावर चढून सीतेस उद्देशून ) आज ह्या धनुष्याच्या प्रभावानं,—

श्लोक— [ वृत्त—अनुष्टुप. ]

*सीते ! वेष्टित देवांनीं । पाहशी राम आपुला ।*
*माझ्या सुतीक्ष्ण बाणांनीं । जो हृदीं विद्ध जाहला ! ॥ १७॥*

[ रावण परिवारासह निघून जातो. ]

**सीताः**—देवांनो ! माझ्या कुलाला शोभेल अशा पतिव्रता धर्मानं आर्यपुत्रांशीं जर मी वागलें असेन तर आर्यपुत्रांचा विजय होवो. ( जाते. )

पांचवा अंक समाप्त.

---

# अंक सहावा.

[ नंतर तीन विद्याधर प्रवेश करितात. ]

**सर्वजणः**—अरे ! हे आलों आम्हीं ! हे आलों आम्हीं !

आर्या ( गीति. )

**पहिलाः**— इक्ष्वाकु अन्वयाचा अति उज्वल, दीप्त, केतु जो शुद्ध ।
**दुसराः**— त्या श्री-रघुरायानें रावण-हननार्थ मांडिलें युद्ध ।
**तिसराः**— तें युद्ध पाहण्याचें कौतुक हृदयांत फार दाटून ॥
**सर्वजणः**—आलों शीघ्राचि आम्हीं हिमवत् शिखरांप्रती विलंघून ।

**पहिलाः**—चित्ररथा ! हे देव, देवर्षि, सिद्ध, विद्याधर आदीकरून आकाशांत कसे एकमेकांना अगदीं खेंचून उभे आहेत. तर आपणहि यांच्या ह्या समूहांना टाकून देऊन, आपल्या इच्छेस येईल तिथं एकीकडं उभं राहूं आणि हें रामरावणाचं विलक्षण युद्ध पाहूं.

**दोघेः**—ठीक, तसंच. [ तसे उभे राहतात. ]

**पाहिलाः**—अहो ! ही युद्धभूमि किती भयंकर दिसत आहे ! कारण इथं—

श्लोक [ वृत्त—लघुमदिरा. ]

राक्षस-देह सुनील जयांतिल नीरचि कीं गमती ।
वानर-वीर जयांतिल वीचिच; नक्र-असी असती ॥
ही रणभूमि विशाल समुद्रसमान विराजतसे ।
राघव-चंद्र शरांशु जया भरतीप्रति देत असे ! ॥ २ ॥

**दुसराः**— श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

युद्धीं होउनि क्रुद्ध जे उभविती स्वश्रोत्रपुच्छांप्रती ।
ऐसे ते बलवान् कपींद्र करितीं मुष्टि-प्रहारां अती ।
तेवीं फेकुनि वृक्ष, शैल, करितां घायाळ रात्रिंचरा ।
डोकीं फोडुनि त्यांस पाडिति रणीं, वज्रें जसें भूधरा ॥
जेव्हां मानगुट्या धरूनि अरिच्या, नेत्रांस ते फाडती— ।
ओंठां चावुनिया, भयानक मुखें होतात तेव्हां किती ! ॥ ३ ॥

**तिसराः**—( दोघांस ) आणण दोघांनीं हे राक्षसहि पहावेः—

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

ज्यांचे हातांत खड्ग असति परजलीं, उग्र दैदीप्यमान ।
क्रोधें फाडूनि डोळे, वदनिं धरिति जे शुभ्र दंष्ट्रा भयाण ॥
वर्णे मेघां परी जे, त्वरित गतिमुळें वांसती आननांतें ।
मर्दाया इच्छिती जे कपिवरचमुतें त्या पहा राक्षसांतें ॥
चोहों बाजूं कडूनी जमुनि सकल हे येति धांवूनि पाही ।
खड्गां हातीं धरूनी अरिवरि पडती त्यां न भीती शिवेही ॥४॥

पहिलाः—अहोः—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

बाणांस राक्षस कपीवरि वर्षिताती ।
दुसराः— शैलांस वानर निशाचरिं फेंकिताती !
तिसराः— मुष्टि-प्रहार, गुडघे खुपसूनिया, हें—।
सर्वजणः— माजे भयंकर अहो, रण ! चित्र पाहे ॥ ५ ॥

पहिलाः—तुम्हीं ह्या रावणाकडे तर पहाः—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

हा शक्ती फिरवीत दंड विलसे जीचा सुवर्णांकित ।
दाढा शुभ्र परी भयाण दिसती; हा स्यंदनीं राजत ॥
उत्कर्षाप्रति ये शशांक क्षितिजीं—हा पूर्णबिंबें अहो ! ।
ये ग्रासूं ग्रहसाच राम—रवि हा, हें देखुनी क्रुद्ध हो ! ॥ ६ ॥

दुसराः—तुम्हीं ह्या रामाकडे पहा—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

डाव्या हस्तिं धनुष्य हें धरुनिया, त्याचे वरी श्रेष्ठसे ।
एका मागुन एक बाण उजव्या हस्तेंचि योजीतसे ॥
पाहे शत्रुकडे—रथस्थ असल्या—भूमीवरी राहुन; ।
स्कंद क्रौंचगिरिप्रती बघतसे जैसा रणीं ठाकुन ! ॥ ७ ॥

तिसराः—हः हः हः हे पहाः—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

कालांतक अशी शक्ती । फेंकी रावण ही पहा ! ।
धनुर्धर परी राम । ती तोडी हांसुनीच हां ! ॥ ८ ॥

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

पहिलाः— छेदिली पाहुनी शक्ती । क्रोधें फाडून लोचनें ।
रामा आच्छादिलें आतां । बाणा वर्षूनि रावणें ॥ ९ ॥

दुसराः—अहो! हा राम कसा शोभत आहे पहाः—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

सोडी रावण हा मेघ । बाण—धारा सवेग ज्यां ।
वृषीं जशा नीर—धारा । रामीं शोभति तेंवि ह्या ! ॥ १० ॥

तिसराः—हा—हा—रामः—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

क्रोधें सज्ज करूनि हेम—धनुतें, सोडी भरारा पहा— ।
बाणा तीव्र, भयंकरा, रिपुवरी; युद्धीं अघाडींच हा ॥
येतां रावण तो रथस्थ समरीं पार्थीच त्याच्यावरी— ।
जाई धांवुनि राम, हस्तिवरती क्रोधें जसा तो हरी ! ॥ ११ ॥

सर्वजणः—अहो ! हा प्रदेश प्रभेनं प्रकाशित झाल्यासारखा दिसतो तेव्हां हें काय असावं बरं ?

प्रथमः—अरेच्या! ह्या युद्धांत एक रथस्थ आणि दुसरा पादचारी अस विषम प्रकार पाहून इंद्रानं आपल्या मातली नामक सूताला आपला र देऊन पाठिवल्याचं दिसंत.

दुसराः—हो, आणि जवळ आलेल्या मातलीला पाहून, त्यानं विनं केल्यावरून, राम रथावर चढले.

तिसराः—हा पहा रामः—

श्लोक [ वृत्त—पुष्पिताग्रा. ]

सुरपति जयदर्प दृश्य ज्यांत ।
दितिसुत नाशक जो अशा रथांत ॥
रजनिचरविनाशहेतु राम ।
बसुनि विराजत नाथ पुण्यधाम ॥
विलसत रणिं राम दिव्य तेजें ।
त्रिपुरवधीं शिव ज्या परी विराजे ॥ १२ ॥

पहिला:—अहो, हें तर मोठंच युद्ध माजलं आहे:—

आर्या [ गीति. ]

ह्या युद्धीं, शत्रूंच्या तीव्र शरां ग्रासिती उलट शर ते ।
हें राम-रावणाचें पाहुनिया युद्ध वीर विस्मित ते ॥
शस्त्र-प्रहार नाना थांबवुनी सकलही उभे असती ।
राक्षस-सैनिक, तैसे कपिगण ही थोर थोर ते सुमती ॥ १३ ॥

दुसरा:—अहो हे खरोखर:—

श्लोक [ वृत्त-इं. व. ]

दोघेहि युद्धीं फिरती गरारा । बाणांप्रती वर्षति हे भरारा ।
बैसूनिया आपुलिया रथांत । हे दोन सूर्यांपरि शोभतात ॥
व्योमीं भ्रमोनी धरणीतलातें । पुंजें करांच्या जणुं दाहती ते! ॥१४॥

तिसरा:—ह्या रावणाकडे तर पहा:—

श्लोक [ वृत्त-भु. प्र. ]

महा वेग ज्यांचा अशा तीव्र बाणीं । हया टाकि हा राघवाच्या वधूनी।
बळें पाडितो शीघ्र रामध्वजास । शरां घोर वर्षूनि देई भयास ॥
करी गर्जना मोडितां तो शरांस । तसा हांसतो देखुनी राघवास॥१५॥

पहिला:—हा पहा राम, रणांगणांत—

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

स्थानें सेवित भिन्नभिन्न असतां तेणें दिसे वामन ।
शत्रूचे शर तीव्र देखुनि, तथें आरक्त तल्लोचन ॥
हा श्रीराघव दीप्तिमंत दिसतो मध्यान्ह-सूर्यापरी ।
त्यातें मातलि हा रथस्थित पहा उत्तेजितो सत्वरी ॥
तेणें राम-नरेंद्र वीर्य-विजयी क्रोधा चढूनि महा ।
रक्षोमर्दनदक्ष थोर, अमित, ब्रह्मास्त्र योजी पहा ॥ १६ ॥

दुसरा:— छंद-दिंडी.

उग्रभुजबल योजुनी फेंकिलेलें ।
दीप्त सूर्यापरि तीक्ष्ण जाहलेलें ॥

अस्त्र मर्दुनियां श्रेष्ठ राक्षसातें ।
रामसन्निध हें पुन्हा शीघ्र येतें ॥ १७ ॥

सर्वजण:—ओ हो! हो, हो! रावण पडला !

प्रथम: —आणखी हें पहा—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

देखुनी रावणा ठार । पुष्प—वर्षाव होतसे ।
देवांच्या दुदुंभींचा हा । नाद गंभीर येतसे ! ॥ १८ ॥

दुसरा:—ठीक, एकून देवकार्य सिद्ध झालं तर.

पहिला: —तर मग आता चला, आपणहि सर्व लोकहितकर्त्या रामाचा सन्मान करूं या.

दोघे:—ठीक, ठीक. हेंच आतां पाहिलं काम तर मग.

[ सर्व जातात ]

[ विष्कंभक समाप्त. ]

---

[ नंतर राम प्रवेश करितात. ]

राम:— श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

युद्धीं रावण मर्दिला शरबळें जें दानवां दुर्धर ।
केलें तेविं बिभीषणा सुमतिला मी आजि लंकेश्वर ।
झालों पार अनल्पसत्वचरिता ऐशा प्रतिज्ञार्णवा ।
सीता—शांतवनास जात अजि मी घेऊनिया बांधवा ॥ १९ ॥

लक्ष्मण:—( येऊन ) आर्यांचा विजय असो. आर्य! ही आर्या आर्यांचेकडेच येत आहे.

राम:—वत्सा, लक्ष्मणा !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

शत्रुधाम—निवासाच्या । दोषें वैदेहि—दर्शन ।
घ्याया न हो धैर्य मला । वारितें दुःख दारुण ! ॥ २० ॥

लक्ष्मण:—जशी आर्यांची आज्ञा. [ जातो.

[ बिभीषण प्रवेश करितो. ]

बिभीषण:—देवांचा विजय असो.

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

ही धर्म–पत्नी तव, रामराय ! ।
त्वद्बाहुवीर्यें गत–शोक होय ॥
पूर्वी जशी दैत्यकुला त्यजूनी ।
लक्ष्मी तशी ये भवदीय पत्नी ॥
युष्मत् प्रतापें समवाप्त झाली ।
त्वां पाहिजे आज सनाथ केली ॥ २१ ॥

**रामः**—बिभीषणा ! तिला तिकडेच राहूं दे सध्यां. राक्षसांच्या स्पर्शानं ती दूषित झाली असून, इक्ष्वाकु कुलाला लांछनास्पद झाली आहे. माझे वडील-राजे दशरथ-यांच्याकडे पाहतां, हे लंकाधिपते ! तिचं मुखावलोकन करणं इष्ट नव्हे. शिवाय दुसरं असं कीं:—

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

अकार्यी अथवा विषयीं । जो बुडे, त्यास वारिती ।
मित्र तेची जाण, राजा ! । अन्य शत्रूचि त्याप्रती ॥ २२ ॥

**बिभीषणः**—देवांनीं प्रसन्न व्हावं.

**रामः**—यापुढं या बाबतींत मला आग्रह करणं आपणांस उचित नाहीं.

[ लक्ष्मण प्रवेश करितो. ]

**लक्ष्मणः**—आर्यांचा विजय असो. आर्यांचा अभिप्राय ऐकतांच देवी अग्निप्रवेश करण्यासाठीं आपल्या अनुज्ञेची वाट पहात आहेत.

**रामः**—लक्ष्मणा ! या पतिव्रतेच्या इच्छेप्रमाणेंच कर.

**लक्ष्मणः**—जशी आर्यांची आज्ञा. ( फिरून ) अरे ! हाय ! हाय !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

ही सीता शुद्ध आहे हें । मी पूर्णत्वेंचि जाणतों ।
राम–शासनही आतां । कानांनीं आज ऐकतों ! ॥
धर्म आणि स्नेहभाव । यां मध्यें मम बुद्धि ही ।
दोलारूढा जणूं झाली । होई न स्थिर लेश ही ! ॥ २३ ॥

कोण आहे इथं ?

[ हनूमान् प्रवेश करितो ]

**हनूमान्ः**—कुमारांचा विजय असो.

लक्ष्मणः—हनूमंता ! तुझ्यांत ऐकण्याचं जर सामर्थ्य असेल तर ऐकं. ( हळू सांगून ) आर्यांची अशी आज्ञा आहे.

हनूमान्ः—पण ह्या बाबतींत कुमारांना काय वाटतं ?

लक्ष्मणः—माझा तर्क निष्फल आहे. अथवा आम्हीं काय ? आर्यांच्या मताला अनुसरूनच वागणार ! चला, जाऊंच तर.

हनूमान्ः—जशी कुमारांची आज्ञा.

[ दोघेहि जातात. ]

( लक्ष्मण प्रवेश करून )

लक्ष्मणः—आर्यांनीं प्रसन्न व्हावं. आर्य ! आश्चर्य ! आश्चर्य ! ही आर्या—

श्लोक [ वृत्त—पृथ्वी. ]

सुकोमल तनू जिची विकच पद्ममालेसम ।
शिरे हुतवहांत ती, करुनि निष्फल त्वत्श्रम ।
त्यजूनिहि तशीच ती विफलजीविताशा महा ॥
जणूं कमल—काननीं शिरत राजहंसी पहा ! ॥ २४ ॥

रामः—आश्चर्य, आश्चर्य ! लक्ष्मणा ! जा, जा. तिचं निवारण कर जा लौकर.

लक्ष्मणः—जशी आर्यांची आज्ञा. [ जातो.

[ हनूमान् प्रवेश करितो. ]

हनूमान्ः—देवांचा विजय असो.

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

स्वर्णमाले परी हीची । दहनें कांति वाढली ।
ही शुद्धा पावकीं गेली । अनपायचि राहिली ! ॥ २५ ॥

रामः—( आश्चर्यानें ) काय—काय म्हटलंत ?

लक्ष्मणः—अहो ! आश्चर्यच !

[ सुग्रीव प्रवेश करितो. ]

सुग्रीवः—देवांचा विजय असो.

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

पेटल्या पावकांतूनी । कोण ह्या जन्म पावुनी ॥
वंद्यरूपें,—जानकीस । ये जीवंतचि घेउनी ? ॥ २६ ॥



**रामः**—भगवन् ! आपल्याला मी प्रणाम करितों.

**अग्निः**—देवेशांनीं मला नमस्कार करणं उचित नव्हे. [अभि० पृ. ५३

लक्ष्मणः—अरे ! हे तर प्रत्यक्ष अग्निनारायण ! आर्येला पुढें घालून हे इकडेच येत आहेत!

रामः—अरे ! हे भगवान् अग्निनारायणच ! चला तर, आपणच त्यांचे कडे जाऊं या.

[ सर्व तिकडे जाऊं लागतात. ]

[ तदनंतर अग्निदेव सीतेसह प्रवेश करितात. ]

अग्निः—( स्वगत ) हे तर भगवान् नारायण ! (उघड) देवांचा विजय असो.

रामः—भगवन् ! आपल्याला मी प्रणाम करितों.

अग्निः—देवेशांनीं मला नमस्कार करणें उचित नव्हे.

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

अपापा, अक्षता, शुद्धा । ही सीता, पुरुषोत्तमा ! ।
स्वीकारी हीस, राजेंद्रा ! । ही त्रैलोक्य—नमस्कृता ॥ २७ ॥

शिवाय— श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

प्रत्यक्ष लक्ष्मी देवी ही । सीता मानवरूपिणी ।
आली तुजकडे देवा ! विश्वासी आपुलें मनीं ॥ २८ ॥

रामः—हा अनुग्रहच आहे माझ्यावर. मी—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

वैदेही शुद्ध आहे हें । जाणतों मन्मनीं परी ।
लोकांच्या प्रत्यया साठीं । उग्र हा मार्ग मी धरी ॥ २९ ॥

[ पडद्यांत दिव्यगंधर्व गातात. ]

“ त्रैलोक्याचें आदिकारण अशा भगवान् नारायणांना नमस्कार असो ! ”

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

हे त्रैलोक्यपते ! तुझें हृदय गा, ब्रह्माचि प्रत्यक्ष हा ।
तूझा क्रोधचि धूर्जटी; रवि, शशी, हे नेत्र तूझे महा ॥
त्वाजिव्हाच सरस्वती, त्रिभुवना ह्या सर्व त्वां निर्मिले ।
ब्रह्मा, इंद्र, अनंत देव दुसरे हे सर्व तूं स्थापिले ॥
तूं विष्णू जगदेककारण विभू, तूं सर्व भूतांतरीं ।
ही पद्मालय-वासिनी, जनकजा-लक्ष्मी-, हिला स्वीकरी ॥ ३० ॥

[पुन्हा पडद्यांत इतरांचें गायन होतें. ]

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

ही पृथ्वी बुडतां जलीं धरुनिया ख्या वराहाचिया ।
हीतें कर्षियलें वरी, सुरपते ! तैसेचि लोकत्रया–॥
टाकूनी स्वपदत्रयाप्रति पहा त्वां आक्रमीलें असें, ।
आजीं रावण मर्दुनी सुरगणा आनंदवीलें असे ॥
होई रावण–मर्दनें न परि तो आनंद देवांप्रती ।
जो होई प्रभुच्या सवें बघुनिया देवीप्रती संप्रती ! ॥ ३१ ॥

अग्निः—हे भद्रमुखा! हे देव, देवर्षि, सिद्ध, विद्याधर, आणि ह्या अप्सरा, यांचे गण आपल्या वैभवानं तुमचंहि वैभव वाढवीत आहेत.

रामः—हा माझ्यावर–त्यांचा–अनुग्रहच आहे.

अग्निः—भद्रमुखा, रामा! अभिषेकासाठीं असे इकडे–इकडे या.

रामः—जशी भगवानांची आज्ञा.

( दोघेही जातात. )

[ पडद्यांत. ]

" देवांचा विजय असो ! स्वामींचा विजय असो ! भद्रमुखांचा विजय असो ! महाराजांचा विजय असो ! रावणांतकाचा विजय असो ! आयुष्मानांचा विजय असो.

बिभीषणः—हे-हे महाराज––

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

युद्धीं प्रतिज्ञार्णव पार झाला ।
स्वीकारि तेंवी अजि जानकीला ॥
यातें सुरांनीं मिळुनी समस्त ।
केला असे हा अभिषेक येथ ॥
तेणें कसा शोभत रामचंद्र,–।
व्योमीं जसा निर्मल पूर्णचंद्र ! ॥ ३२ ॥

लक्ष्मणः—अहाहा ! काय हें आर्यांचं परमेश्वरी तेज !

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

ज्यातें कुबेरवरुणान्तकइंद्रदेव ।
हे वेष्टिती गणुनि त्याप्रति देवदेव

रामास त्या दशरथें अमरां कढून ॥
केला स्वराज्यि अभिषेक मुदें करून ।
वृत्रा वधून मग इंद्रपदीं विराजे ॥
तो इंद्र, तेंवि अजि शोभति रामराजे ! ॥ ३३ ॥

[ नंतर राज्याभिषेक झाला आहे असे राम सीतेसह प्रवेश करितात. ]

रामः—वत्सा, लक्ष्मणा !

श्लोक [ शा. वि. ]

जेणें मंगल-हार घालुनि मला भद्रासनीं स्थापिलें
कैकेयी-प्रिय साधण्या परि पुरा जेणें वना धाडिलें ॥
त्या तातें मुदितांतरें करविलें राज्याभिषेका पुन्हा—॥
मातें आज, जरी दिवीं वसाति ते हें ज्ञात सर्वा पहा ॥ ३४ ॥

अग्निः—हे भद्रमुखा ! इंद्राचे आज्ञेवरून हे तुझे प्रजाजन भरतशत्रुघ्नांना पुढें करून तुझ्या सन्निध आले आहेत.

रामः—भगवन् ! या योगें माझ्या मनाला अत्यंत आनंद होत आहे.

अग्निः—हे महेंद्रादि देव तुला वैभव-वृद्धिपर आशीर्वाद देत आहेत.

रामः—हा अनुग्रह आहे माझ्यावर.

अग्निः —भद्रमुखा, रामा ! सांग, आणखी मी तुझं काय प्रिय करूं ?

रामः—भगवान् जर माझ्यावर प्रसन्न झाले आहेत तर या पलीकडे मी आणखी कसली इच्छा करणार ?

[ भरतवाक्य ]

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप० ]

ससत्वा धेनु होवोत । निरसो परचक्रही ।
आमुचा हा राजसिंह । शासो अखिल ही मही ॥ ३५ ॥

( सर्व जातात. )

'अभिषेक नाटक' समाप्त.

—:०:—

# " पंचरात्र " नाटकाचें कथासूत्र.

महाभारतांतील प्रसंग घेऊन त्यावर भास कवीनें लिहिलेलीं जीं सहा नाटकें आज उपलब्ध आहेत त्यांपैकीं भारतांतील कथाप्रसंगांचा कालानुक्रम लक्षांत घेऊन विचार करितां "मध्यमव्यायोग" हें पहिलें व "पंचरात्र" हें दुसरें नाटक आहे. पांडवांच्या वनवासाचीं बारा वर्षें संपून ते विराटराजाच्या मत्स्यपुरींत अज्ञातवासाचें एक वर्ष कंठीत होते. हें वर्ष संपण्यास ५।६ दिवस राहिले होते. त्या वेळचा एक प्रसंग घेऊन त्यावर कवीनें ह्या नाटकाची रचना केली आहे. हें नाटक वाचीत असतां, भास कवीला हें नाटक लिहितांना महाभारतांतील मूळ कथानकांत किती फेरफार करावे लागले आहेत तें चटकन लक्षांत येतें आणि त्याबरोबरच भासकवीच्या कल्पनाशक्तीची उड्डानशीलता आणि त्याच्या प्रतिभेची दिव्य तेजस्विता हीं आपोआपच प्रत्ययास येतात. नाटककाराला आवश्यक असणारे बहुतेक सारे गुण भासाच्या ठिकाणीं कसे एकवटले होते हें या एकाच नाटकाचा चिकित्सापूर्वक अभ्यास केला असतां सहज कळून येईल. आणि कालिदासासारख्या आदर्शभूत महाकवीनेंहि भासकवीचा आपल्या नाटकांत इतक्या आदरानें कां उल्लेख केला असावा याचेंहि पण मर्म -अन्य कोणीहि न सांगतां- आपलें आपल्यालाच कळून चुकेल! आपल्या नाटकाला आधारादाखल एखादा यत्कश्चित् प्रसंग घेऊन त्यावर चांगले नाटककार आपल्या नाटकाचा रमणीय प्रासाद कसा उठवितात हें ज्यास पहावयाचें असल त्यानें महाभारतांतर्गत विराटपर्वांतील गोग्रहणाचा प्रसंग वाचून पहावा आणि नंतर हें नाटक वाचावें म्हणजे त्याला आमच्या म्हणण्याची बरोबर कल्पना येईल. महाभारताचा गद्यात्मक अवतार मराठी भाषेंत झाला असल्यानें संस्कृत न जाणणाऱ्या केवळ महाराष्ट्रिय वाचकांसहि हें करणें आतां फार सुलभ झालें आहे. एवढें सांगून आतां आम्ही या नाटकाचें कथासूत्र देतों.

दुर्योधनानें पांडवांना वनांत पाठवून त्यांच्या राज्याचा अपहार केल्यानंतर पुण्यसंग्रहाकरितां म्हणा,—अथवा केलेल्या पापावर पांघरूण घालण्याकरितां म्हणा,–अनेकविध यज्ञ केले, आणि गेलेला लौकिक पुन्हां संपादण्याचा प्रयत्न

केला. ह्या प्रसंगीं त्यानें नुकताच एक यज्ञ संपवून तो अवभृथ स्नान उरकून यज्ञार्थ आलेल्या ऋत्विजांना आणि ब्राह्मणांना दक्षिणा देऊन यज्ञाची सांगता करणार होता. पण त्यापूर्वी त्यानें आपल्या सर्वहि गुरुजनांना वंदन केलें आणि यज्ञार्थ आलेल्या अनेक राजांचें अभिवंदन केलें. दुर्योधनानें मानानें आपल्याहून वडील होते त्यांना प्रणाम केले, तर त्याच्याहून लहान होते त्यांनीं त्याला प्रणाम केले. प्रणाम करणाऱ्या अशा सर्वांना त्यानें आशीर्वाद दिले. या प्रसंगीं द्रोणाचार्यांनीं त्याला अभिमन्यू नमस्कार करीत असतां सांगितलें कीं:—"श्रीकृष्णांनीं पाठविल्यावरून हा अभिमन्यू तुझें अभिनंदन करण्याकरितां आला आहे." पण अभिमन्यूनें नमस्कार केल्यावर दुर्योधनाकडून त्याला औपचारिकहि आशीर्वाद मिळाला नाहीं! याचें कारण शकुनि होता. त्यानें याचवेळीं जरासंध-पुत्र सहदेवाला एकाएकीं लगबगीनें पुढें करून त्याजकडून दुर्योधनाला नमस्कार करविला. आणि दुर्योधनानींहि त्याला "आपल्या पित्याप्रमाणेंच पराक्रमी हो," असा आशीर्वाद दिला! अभिमन्यूला आशीर्वाद देण्याचें या गडबडींत अजीबात राहून गेलें. हें इतक्या साहजिकपणें घडून आलें कीं, हें कोणाच्या लक्षांतहि आलें नाहीं. असो. या प्रसंगीं सर्व राजमंडळ दुर्योधनाचें अभिनंदन करीत असतां मत्स्याधिप राजे विराट हे आपल्या यज्ञास आले नसल्याचें दुर्योधनास आढळून आलें. ते कां आले नाहींत—म्हणून दुर्योधनानें विचारितां शकुनिमामानीं सांगितलें.—"त्यांचेकडे दूत गेला आहे, ते वाट चालत असतील." आलेल्या राजांचा परामर्ष घेणें अशा प्रकारें आटपल्यावर दुर्योधन द्रोणाचार्यांस म्हणाला:—"आचार्य! धर्म आणि धनुर्विद्या या दोहोंचे आचार्य आपण; तेव्हां आपण कांहीं तरी दक्षिणा स्वीकारली पाहिजे." दक्षिणा मागण्याविषयीं दुर्योधन द्रोणाचार्यांना जेव्हां फार आग्रह करूं लागला तेव्हां तेथें पितामह भीष्म जवळ होतेच. ते म्हणालेः—"तुझ्या सारख्या राजाच्या गुरूंनीं दैन्यांत असावें ही दुर्दैवाची गोष्ट!" हे शब्द दुर्योधनाच्या जिव्हारीं लागले आणि तो द्रोणाचार्यांस म्हणाला:—"मी आपल्या पायामुळें आज ह्या पदाला चढलों आहें. तर आपली हृदयवांछा असेल ती पुरविण्यास मी तयार आहें. माझी स्वतःची अशी फक्त माझ्या हातांत ही गदा आहे, बाकी सर्व गुरूंचें आहे!" असें म्हणून त्यानें गुरुदक्षिणा मागण्याविषयीं द्रोणाचार्यांस फार आग्रहाची विनंति केली. द्रोणाचार्यांचे

डोळे या प्रसंगीं अश्रूंनीं भरून आले ! त्यांच्या डोळ्यांत कां अश्रू आले हें त्यांचे त्यांनांच ठाऊक ! ते धुवून टाकण्याकरितां म्हणून दुर्योधनानें उदक आणण्यास सांगितलें. ह्या उदकानें त्यानें द्रोणाचार्यांस मुखप्रक्षालन करण्याची विनंती केली. ती ऐकून आचार्य म्हणालेः—"तूं माझें ईप्सित कार्य केलेंस म्हणजे तेंच माझें मुखोदक होईल !" हे उद्गार ऐकून दुर्योधनास कसेंसेंच झालें. त्यानें तेंच उदक दान देण्याकरितां आपल्या हातीं घेतलें आणि दक्षिणा मागण्याविषयीं त्यांस अत्यंत आग्रह केला. तेव्हां द्रोणाचार्यांनाहि त्याचा विश्वास पटला. आणि त्यांनीं म्हटलें:—" पांडवांना राज्यार्ध दे, हीच माझी याचना आणि हीच माझी गुरुदक्षिणा !" द्रोणाचार्यांची ही विचित्र मागणी ऐकतांच शकुनि एकदम म्हणाला:—" गुरुवर विश्वास टाकून राहणाऱ्या शिष्याची—अप्रस्तुत विषय काढून—अशी धर्मवंचना करणें आपल्या सारख्या गुरूनांच शोभतें !" हे शब्द ऐकून द्रोणाचार्य साहजिकपणेंच क्रोधास पेटले, आणि त्यांनीं त्याला विचारलें:—" मी पांडवांकरितां राज्यार्धाची याचना करीत असतां तें मुकाट्यानें देणें बरें कीं पांडवांनीं आपल्या पराक्रमानें तें हिराऊन घेणें बरें,—याचा विचार करून काय करावयाचें तें ठरवा !,, पितामह भीष्म तेथें होतेच. ते म्हणालेः—"तुझ्यांत आणि पांडवांत वैर माजायला हा शकुनीच कारण झाला आहे!" दुर्योधन म्हणाला:—" पांडव जर असे पराक्रमी आहेत, तर द्यूतांत जेव्हां आम्हीं त्यांचें राज्य आणि मान हे हरण केले तेव्हां ते गप्प कां बसले ?" त्यावर द्रोण उद्गारलेः—" त्यावेळीं भीमानें उचललेला सभास्तंभ जर एका व्यक्तीवर फेंकला गेला असता तर ती व्यक्ति—अर्थात् शकुनिमामा—आज असा उपमर्द करायला जिवंतच राहिली नसती !" अशा प्रकारें हें प्रकरण विकोपास जात आहे असें पाहून भीष्मांनीं दुर्योधनाची समजूत घातली, आणि आचार्यांनाहि शांत होण्यास सांगितलें. क्षुब्ध झालेलें वातावरण थोडें शांत झाल्यावर द्रोणाचार्य दुर्योधनास म्हणालेः—"समज, मी जरी तुझी वंचना केली असली तरी त्याचा दोष सर्वस्वी माझ्याकडे; तुझें हित व्हावें याचकरितां तुझ्याजवळ मी ही दक्षिणा मागितली. कुरुकुलांतले भेद आणि कलह नाहींसे करावेत, अशा उच्च हेतूनेंच मी ही दक्षिणा मागितली आहे. तेव्हा याचा तूं नीट विचार कर." तेव्हां त्यानें शकुनिमामांचा विचार घेण्याचें ठरविलें. दुर्योधन—कशामुळेंहि असो—द्रोणाचार्यांस दिलेलें आपलें वचन परत घेण्यास तयार नव्हता. तेव्हां

शकुनिमामांनीं त्याला एक तोड सुचविली ती अशी कीं:—पांच रात्रींच्या आंत पांडवांचा जर शोध लागला तर आपण त्यांना अर्धराज्य देण्यास तयार आहों ! यावर द्रोण म्हणाले:-"जी गोष्ट तुम्हांला इतक्या दीर्घ कालांत शक्य झाली नाहीं ती गोष्ट एवढ्या पंचरात्रीचे अवधांत साधणें केवळ अशक्य ! तेव्हां वचन देऊन चुकलों असलों तरी अर्धराज्य देणार नाहीं, असं स्पष्ट सांग." भीष्म लागलीच उद्गारले "कुरुकुलांतील राजे सत्यप्रतिज्ञ अशी आजवर ख्याती आहे, तेव्हां तूंहि आपला वचनभंग न करावास हेंच युक्त." यावर आपला निश्चय कायम असल्याचें दुर्योधनानें सांगितलें. मात्र आपली अट आचार्यांनीं पुरविली पाहिजे हा त्याचा आग्रह होता. द्रोणाचार्य मोठ्या विचारांत पडले. इतक्यांत विराटेश्वराकडून एक दूत आला व त्यानें असा निरोप आणला कीं: —"कीचक शतबंधूसह रात्रीं कोणा निःशस्त्र पुरुषाकडून मारला गेल्यामुळें आपल्यास यज्ञाला येतां आलें नाहीं." हें वृत्त ऐकतांच पितामह भीष्मानीं ताडिलें कीं, पांडव विराटनगरींतच असले पाहिजेत आणि हें कृत्य भीमाशिवाय दुसऱ्याचें असणें शक्य नाहीं. द्रोणाचार्यांना त्यांनीं ही गोष्ट सुचविली, आणि त्यांना ती पटलीहि पण. तेव्हां भीष्मांच्या सांगीवरून आचार्यांनीं दुर्योधनाची पांच रात्रींची अट कबूल केली. विराटेश्वर यज्ञास न आल्यामुळें त्यानें कौरवेश्वराचा अपमान केला आहे, तेव्हां त्याचेवर स्वारी करून त्याचें गोधन हरण करावें असें भीष्मांनीं दुर्योधनास सांगितलें. ही गोष्ट दुर्योधनाला पटली आणि सर्व कौरव ह्या मोहिमेवर निघाले.

दुर्योधनाच्या यज्ञाकरितां आलेले कांहीं राजेहि दुर्योधनाचे बरोबर त्याच्या सहाय्यार्थ निघाले. कुमार अभिमन्यूहि यांत होताच. अशाप्रकारें कौरवांचें सैन्य विराटाचें नगरीला जाऊन पोंचले आणि त्यांनी गोधन लुटण्यास आरंभ केला. हें सारें विराटेश्वराचे कानावर जातांच त्यानें आपला रथ सज्ज करून घेऊन येण्यास आपल्या सूताला सांगितलें. पण तो रथ घेऊन कुमार उत्तर शत्रूला तोंड देण्याकारितां पूर्वींच गेला असल्याचें सूतानें राजास सांगितलें, तेव्हां राजानें सूताला विचारलें कीं,:-"कुमार गेला, तर तूं कसा इथं? राजांचा सारथी होण्याला तूं पात्र नाहींस !" राजाचे जवळ वेषांतरांत धर्मराज रहात होते. त्यांस विराटेश्वर 'भगवान्' या नांवानें संबोधीत असे.

उत्तर एकटाच गेल्याचें ऐकून भगवान् म्हणाले:—" महाराजानीं कुमारास परत बोलवावें. कारण आलेल्या कौरववीरांपुढें त्याच्यानें टिकाव धरवणार नाहीं." पण इतक्यांत सूतानें राजास उत्तरा दाखल सांगितलें कीं, " मी कुमाराच्या बरोबर जावयाला सिद्ध झालों असतां कुमारांनीं मला न नेतां बृहन्नलेची सारथ्यकर्मावर योजना करून तिला नेलें आहे !" हें ऐकून विराट गडबडला. पण जवळ असणाऱ्या भगवानांनीं बृहन्नला सारथ्यकर्मांत अत्यंत निपुण असल्याचें सुचवून ती सारथ्यकर्माच्या कौशल्यानेंच शत्रूस जिंकून टाकील, असें राजास सांगितलें. हें ऐकून विराटालाहि धीर आला. तरी पण त्यानें आपल्याकरितां दुसरा एक रथ सिद्ध करण्यास सांगितलें. इतक्यांत रणांगणांतून एक भट येऊन त्यानें अभिमन्यू शत्रूचें बाजूनें युद्धास आला असून तो अचाट पराक्रम करीत असल्याचें राजास सांगितलें. तें ऐकून भगवानांनीं कुमार उत्तराचें सारथ्य करण्यास दुसरा दूत पाठविण्याविषयीं आपला सल्ला दिला. इतक्यांत कुमारानें कौरवांना उधळून लावून गाईंची मुक्तता केल्याची आनंदकारक बातमी आली. ती ऐकून राजानें कुमारास बोलावून आणण्याची आज्ञा केली. पण तो रणांतील वीरांच्या पराक्रमांची नोंद पुस्तकांत करून ठेवण्यांत गुंतला असल्याचें कळल्यामुळें राजानें बृहन्नलेसच घेऊन येण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें बृहन्नला पुढें येतांच राजानें रणांगणांतील सर्व वृत्तांत विस्तारानें सांगण्याविषयीं तिला आज्ञा केली. राजाला आपल्या पुत्राचे वीरकर्म सर्वांचे देखत ऐकावयाचें होतें ! इतक्यांत रणांतून दुसरा एक भट आला व त्यानें अभिमन्यूला धरून आणल्याचें वृत्त राजाला कळविलें. अभिमन्यूला कोणी धरून आणिलें म्हणून राजानें विचारितां त्याला त्यांच्या पाकशाळेतील बल्लवानें तें साहसाचें कृत्य केलें असें समजलें. तें ऐकून राजा आश्चर्यचकित झाला ! आणि तो श्रीकृष्णाचा भाचा, पांडवांचा पुत्र, आणि आपला आप्त जो द्रुपद त्याचा नातू आहे असें पाहून विराटेश्वरानें त्याला सत्कारपूर्वक तेथें घेऊन येण्यास सांगितलें. त्याला घेऊन येण्यास कोणाला पाठवावें म्हणून राजानें भगवानांना विचारिलें. भगवानांनीं बृहन्नलेस पाठवावें म्हणून सांगितलें. अशाप्रकारें भगवानांनीं बृहन्नलेच्या वेषांत असणाऱ्या अर्जुनाला सर्वांचे अगोदर अभिमन्यूला एकांतांत भेटण्याची संधी दिली ! बृहन्नला त्याला घेऊन येण्यास निघाली. तों वाटेंतच तिची व अभिमन्यूस घेऊन येत असणाऱ्या भीमसेनाची गांठ पडली. हा पुत्राच्या

भेटीचा प्रसंग फारच रमणीय आहे. फार वर्षांनीं पुत्राची गांठ पडलेली. त्यांत त्याला भीमसेनानें धरून आणलेला, अर्जुन पुत्राचें भाषण ऐकण्यास अत्यंत उत्सुक झालेला. त्यानें भीमसेनालाच " आभिमन्यूला बोलायला लाव " म्हणून सांगितलें. भीमसेनानें त्याला "अरे, अभिमन्यू!" म्हणून संबोधिलें; पण कुमार अभिमन्यूला हें सहन झालें नाहीं. अर्थात् त्याला राग आला. तें पाहून भीमानें त्याला बोलायला लावण्याचा नाद सोडला, व तें काम बृहन्नलेवरच सोंपविलें. बृहन्नलेनें त्याला त्याच्या आईचें आणि श्रीकृष्णाचें कुशल विचारिलें. पण बृहन्नलेचा हा उद्धटपणा पाहून अभिमन्यूला त्याचाहि रागच आला. तें पाहून भीमार्जुन त्याच्या त्या रागामुळेंच आपापसांत नेत्रसंकेत करून गालांतल्यागालांत हंसूं लागले. हें पाहून अभिमन्यूला ते दोघे आपला उपमर्द करीत आहेत असें वाटलें. भीमार्जुनांनीं त्याला जास्तच चिडविलें. ते त्याला म्हणाले:—"अर्जुनाच्या पुत्रानें आणि श्रीकृष्णाच्या भाच्यानें रणांगणांत असं अपयश मिळवावं हें मोठेंच प्रसंश-नीय !" यावर आभिमन्यू उत्तरादाखल त्यांस म्हणाला:—"आज युद्धामध्यें विराटेश्वराच्या बाजूचे जे वीर रणांत पडले आहेत त्यांच्या शरीरांत घुस-लेल्या बाणांवर कोणाचें नांव आहे तें पहा म्हणजे माझ्या पराक्रमाची तुम्हांला कल्पना येईल ! " " तूं एका पदाति कडून धरला गेलास, यांत तुझा पराक्रम दिसतोच आहे !" असा बृहन्नलेनें त्याला ठोला दिला. त्यावर अभिमन्यू उद्गारला:—"अर्जुनपुत्र निःशस्त्र्यांवर हत्यार धरीत नसतो. मला धरण्यास आलेला पदाति निःशस्त्र होता,..." इतके आभिमन्यू म्हणत आहे तोंच त्याला आंत लौकर घेऊन येण्याविषयीं विराटेश्वराचा निरोप आला. बृहन्नला त्याला घेऊन विराटेश्वर व भगवान् बसले होते तेथें गेली. बृहन्नलेनें त्याला महाराजांचे जवळ जाण्यास सांगितलें. अभिमन्यूनें ताबडतोब विचा-रिलें:—"कुणाचे महाराज?" विराटेश्वराला मानी अभिमन्यूनें प्रणाम केला नाहीं. फक्त भगवान् ब्राह्मण आहेत असें पाहून त्यांना मात्र केला व भगवानांनीं त्याला आशीर्वादहि दिला ! विराटेश्वरानें विचारिलें:—" याला कोणी धरून आणला?" त्यावर भीम म्हणाला:—"मीं महाराज." तेव्हा आभिमन्यू त्याला म्हणाला:—" नुसतं मीं पकडलं असं म्हणू नकोस; अशस्त्र असलेल्या मी पकडलं असं म्हण." यावर भीम म्हणाला:— माझे भुजच ईश्वरदत्त आयुध आहेत. दुर्बल असतील त्यांनी धनुष्याचा आश्रय करावा !" तेव्हा आभिमन्यू

उद्गारला; " माझ्या मध्यम ताता शिवाय ही घमेंड दुसऱ्या कोणी करूं नये." हे त्याचे शब्द ऐकून भगवान् विनोदानें त्यास म्हणाले-"तुझा मध्यमतात कोण?" यावर अभिमन्यू म्हणाला:-"ब्राह्मणापुढें आम्हीं प्रत्युत्तर करीत नसतो;हाच प्रश्न दुसऱ्या कोणी केला असता तर त्याला मी उत्तर दिलें असतें !" तेव्हां विराटेश्वर म्हणाला," तर मग हा प्रश्न मीच विचारतो-कोण तुझा मध्यम तात?" अभिमन्यू रोषास चढला आणि म्हणाला:—"ज्यानें जरासंधाला अंतराळीं धरून त्याच्या चिरफळ्या केल्या तोच माझा मध्यम तात! समजला?" अभिमन्यूचे हे रोषाचे आणि आधिक्षेपाचे शब्द ऐकून विराटेश्वर म्हणाला:—"तूं जरी माझा असा अधिक्षेप केलास तरी त्यामुळें मला मुळींच क्रोध येत नाहीं, उलट मनाला कौतुकच वाटतें!" हे राजाचे शब्द ऐकून अभिमन्यूला वाटलें कीं हा राजा आपल्यावर दया करून आपली मुक्तता करणार ! पण ही गोष्ट त्याला रुचली नाहीं, तो म्हणाला, "माझा तुह्मांला गौरवच करायचा असेल तर तो बंदिजनाला उचित असा पायांत शृंखला अडकवूनच करा, मला जसें भुजांत धरून आणिलें तसें माझे तात आपल्या भुजांच्या पराक्रमानेंच माझी मुक्तता करितील !" अभिमन्यू हे शब्द उच्चारीत आहे तोंच कुमार उत्तर तेथें आला आणि त्यानें "वीराचा योग्य गौरव करावा." म्हणून महाराजास विनति केली. राजानें कोणाचा गौरव करायचा म्हणून विचारितां उत्तरानें बृहन्नलेकडे बोट दाखवून म्हटलें,:— "ह्या धनंजयाचा"! उत्तराचे हे शब्द ऐकून सर्वजण आश्चर्यचकित झाले! मग अर्थातच विराटेश्वरास भगवान् हे अन्य कोणी नसून धर्मराज असल्याचे कळलें, व इतर पांडवहि तेथेंच असल्याचे कळून त्यांच्या पराक्रमानें आज आपल्यास विजय प्राप्त झाला हेंहि त्याला कळून चुकलें. इकडे अभिमन्यूलाहि कळून आलें कीं, ज्यांना आपण एक स्त्री आणि पदाति असें समजत होतों ते प्रत्यक्ष आपले तात आहेत. तेव्हां भीमार्जुनादि पांडवांनीं त्याला हृदयांशीं धरिलें. नंतर अभिमन्यूनें विराटेश्वरालाहि प्रणाम केला.व त्यांनींहि त्याला योग्य असाच आशीर्वाद दिला. पण यावेळीं विराटेश्वर मोठ्या विचारांत निमग्न आहेसें दिसलें. त्यानें पाणी घेऊन येण्याची आज्ञा केली.तें घेऊन येताच तो अर्जुनाला म्हणाला:-"ह्या विजयाबद्दलचें पारितोषिक म्हणून तूं उत्तरेचा स्वीकार कर." अर्जुनानें विराटेश्वराची मनःस्थिती ओळखली,

आणि तो लगेच म्हणाला:—" हें सर्व अंत:पुर मी आजवर मातृवत् मानीत आलों आहे. तेव्हां उत्तरेचा स्वीकार मी अभिमन्यूकरितां करितों." अर्जुनाचे हे शब्द ऐकतांच विराटाचा उतरलेला चेहरा पूर्ववत् प्रफुल्लित झाला. विराट म्हणाला:—"तर मग मी आतां कुमार उत्तराला पितामह भीष्मांच्याकडे पाठवितों." असें म्हणून सर्व पांडवांना घेऊन तो गृहांत गेला.

इकडे कौरव-सैन्यांत अभिमन्यूला शत्रूंनीं धरून नेल्याचें वृत्त हां हां म्हणतां पसरलें. त्याला सोडवून आणण्यास सर्व उत्सुक झाले. दुर्योधनाचे या वेळचे उद्गार तर अत्यंत हृदयस्पर्शी होते. तो म्हणाला:—"याच्या पित्यांशीं माझें वैर असल्यानें लोक माझाच संशय घेतील. तेव्हां मी स्वत: जाऊन त्याची मुक्तता करणार. ह्या प्रसंगीं हा अगोदर माझा पुत्र, आणि मग पांडवांचा!" हे दुर्योधनाचे उद्गार ऐकून कर्णानेंहि त्याच्या प्रेमळपणाची प्रशंसाच केली. आणि शकुनीकडे वळून तो म्हणाला. "आपल्या हातून जर अभिमन्यूची मुक्तता झाली नाहीं तर आपल्यास धनुष्यें खालीं ठेऊन वल्कलेंच धारण केलीं पाहिजेत!" पण कुत्सित शकुनीच्या तोंडून मात्र निराळ्याच प्रकारचे उद्गार आले. तो म्हणाला—"सौभद्राचे वाली पुष्कळ आहेत. हा वेळपर्यंत त्याची मुक्तता झालीहि असेल. खुद्द विराटच त्याला सोडून देईल!" इकडे हें असें चाललें असतां द्रोणाचार्यांनीं अभिमन्यूला कसा पकडून नेला म्हणून त्याच्या सारथ्याला विचारिलें. त्यानें सांगितलेल्या हकीगतीवरून भीष्मद्रोणांची खात्री झाली कीं, ज्यानें केवळ आपल्या बाहूनेंच अभिमन्यूला धरून नेलें तो भीमसेनच असला पाहिजे. हें त्यांनीं बोलून दाखवितांच शकुनी त्यांचा उपहास करण्याच्या हेतूनें म्हणाला—"असं असेल तर मग तो उत्तर देखील उत्तर नसून अर्जुनच असेल!" त्यावर भीष्म म्हणाले—"होय, तो अर्जुनच असला पाहिजे. ही गोष्ट त्याच्या नुसत्या धनुष्याच्या टणत्कारावरूनच आम्हीं ताडिली आहे." इतकें ते म्हणतात तोंच भीष्माचा सारथि एक बाण घेऊन आला आणि म्हणाला—"ह्या बाणानें तुमच्या रथाचा ध्वज विद्ध झाला आहे, तेव्हां आतां शांति करणें भाग आहे! हा कोणाचा बाण आहे तें मला ठाऊक नाहीं, पण ह्याच्या पुंखावर कांहीं नामाक्षरें दिसत आहेत!" असें म्हणतांच भीष्मांनीं तो बाण घेऊन, तो शकुनीच्या

हातीं दिला आणि त्यालाच त्याच्या पुंखावर असणारीं अक्षरें वाचावयास सांगितलें. त्यावर अर्जुनाचें नांव होतें.तें पाहून शकुनीनें तो बाण खालीं टाकला. तो द्रोणाचार्यांचे पायावर पडला. त्यांना वाटलें कीं पितामहांना वंदन करून आतां तो आपल्यास वंदन करण्यास आला आहे ! तेव्हां शकुनी म्हणाला. " ह्या नांवाचाच एखादा योद्धा विराटाचे पदरीं असेल, त्याचा बाण असेल हा ! " इतक्यांत विराटनगराकडून एक दूत तेथें आला. त्याला पाहून द्रोण म्हणाले—" काय आहे विराटेश्वराचें म्हणणें !" दूत म्हणाला, " मी त्यांचेकडून आलों नाहीं. मला युधिष्ठिरांनीं पाठविला आहे. " तेव्हां द्रोणाचार्यांनीं त्यास विचारिलें:-"काय आहे. युधिष्ठिराचें म्हणणें ?" तेव्हां दूत म्हणाला, धर्मराजाची अशी विज्ञापना आहे कीं,-"मला उत्तरा स्नुषा प्राप्त झाली आहे. सर्व नृपांची मी प्रतीक्षा करीत आहे. तर लग्न येथें व्हावें कीं तेथें, याबद्दल अनुज्ञा होण्याची मी वाट पहात आहे ! " तेव्हां द्रोण दुर्योधनाकडे वळून म्हणाले:-"तुझ्या अटीप्रमाणें पांडव पांच रात्रींच्या आंत प्रगट झाले आहेत, तेव्हां त्यांना तूं आतां अर्धराज्य देणार कीं नाहीं ?" तेव्हां दुर्योधन म्हणाला:—"मी वचन दिल्याप्रमाणें पांडवांना अर्ध राज्य दिलें आहे आणि आपली प्रतिज्ञाहि आज पुरी केली आहे." हे शब्द ऐकून द्रोणाचार्यांना तर आनंद झालाच पण इतरहि सर्वजण प्रसन्न झाले. असें या नाटकाचें कथासूत्र आहे.

ह्या नाटकाला **पंचरात्र हें नांव कां** दिलें, त्याचाहि खुलासा या कथासूत्रावरून आपोआपच होत आहे. तेव्हां यासंबंधानें वेगळें लिहिण्याचें प्रयोजन उरलें नाहीं.

# " पंचरात्र " नाटकांतील पात्रें.

**पुरुष पात्रें:--**

**दुर्योधन**.....धृतराष्ट्र-पुत्र, हास्तिनापूरचा राजा.

**भीष्म**......कौरव पांडवांचे पितामह.

**द्रोण**....... ,, ,, धनुर्वेद देणारे गुरु.

**शकुनि**......मद्रदेशाचा राजा; दुर्योधनाचे मातुल.

**भगवान्**....वेषांतरांत असलेला धर्मराज.

**भीमसेन**....धर्मराजाचा बंधु, बल्लवाचे वेषांत असलेला.

**बृहन्नला**.....वेषांतरांत असलेला अर्जुन.

**राजा**......विराट देशाचा राजा.

**कांचुकीय**...विराटेश्वराचा कंचुकी.

**कर्ण**.......अंगदेशाचा राजा, दुर्योधनाचा मित्र.

**उत्तर**.......विराटेश्वराचा पुत्र.

**अभिमन्यु**...अर्जुनाचा पुत्र.

**वृद्ध गोपाल**...एक वृद्ध गवळी.

**गोमित्रक**...एक तरुण गवळी.

**सूत**.......विराट, भीष्म व अभिमन्यू या तिघांचे तीन सारथि.

**भट**.......दुर्योधन व विराट यांचेकडील दोघे सेवक.

**दूत**........विराटाकडून संदेश घेऊन येणारा.

**प्रथम, द्वितीय, व तृतीय**,...यज्ञार्थ आलेले ब्राह्मण; अनेक गोपकुमार आणि गोपकन्यका; आणि सूत्रधार.

# समवकार.

रूपकाचे—अर्थात् नाटकांचे—जे दहा प्रकार आहेत, त्यांपैकींच समवकार हा एक प्रकार आहे. समवकारालाच ' अमृत-मंथन ' ' समुद्र-मंथन ' अथवा 'अंब्रोधिमंथन' अशींहि नांवें दिलेलीं आहेत. याचें लक्षण पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

१. यांत तीन अंक असावे लागतात.

हया अंकांचा विस्तार खालीं दिल्याप्रमाणें असावा व प्रत्येक अंक क्रियापूर्ण असावा.

१ ला अंक १२ घटिकांत संपणारा असावा.

२ रा अंक ४ घटिकांत संपणारा असावा.

३ रा अंक २ घटिकांत संपणारा असावा.

[ एक घटिका अथवा नाडिका म्हणजे २४ मिनिटें. ]

२. यांत जवळजवळ बारा नायक असावेत, व ते प्रख्यात असावेत.

३. यांत वीररस प्रधान असावा, व दुसरे अनेक रस गौणत्वानें असावेत.

४. यांत कलह व कपट हीं असावींत.

५. यांत वीथि म्हणजे शृंगार-कथाहि असावी.

६. यांत तीन प्रकारचे विद्राव ( नाश ) दिसून यावेत:—

(१) नैसर्गिक कारणानें उत्पन्न होणारा, अग्निप्रलय अथवा जलप्रलय यां सारखा.

(२) युद्ध अथवा आकस्मिक हल्ला.

(३) हत्ती अथवा अन्य हिंस्र पशू यांचेकडून होणारा उपद्रव.

७. यांत उष्णिह, अनुष्टुप आणि कुटिल या वृत्तांचा उपयोग करितात.

प्रस्तुत नाटकास हीं सर्वच लक्षणें अगदीं तंतोतंत लागू पडतील असें, जरी नसलें तरी त्यांतील बरींचशीं लक्षणें त्याला लागू पडत असल्याचें वाचकांस दिसून येईल. व समवकाराचा एक नमुना म्हणून ह्या नाटकाकडे त्यांचें लक्ष जाईल अशी आशा आहे.

॥ श्रीरामचंद्र प्रसन्न. ॥

**महाकवि श्रीभास--प्रणीत.**

# पंचरात्र

[ नांदी झाल्यानंतर सूत्रधार प्रवेश करितो. ]

**सूत्रधारः—** श्लोक [ वृत्त—व. ति. ]

*जो द्रोण[1]-वर्ण, भुविं अर्जुन भीम-दूतें[2] ।
जो कर्णधार[3] शकुनी[4]-पति, जो जगांत- ॥
दुर्योधनें[5], प्रथित[6]-वीर रणांत भीष्म[7] ।
तैसा युधिष्ठिर[8], करीं धरि चक्र[9] भीम ॥
ऐसा विराट[10]-तनु, उत्तरगा[11]भिमन्यु[12] ।
रक्षो तुम्हां सतत कृष्ण हरूनि मन्यु[13] ॥ १ ॥

( इकडे तिकडे फिरून ) आर्यमिश्रांना माझी अशी विनंती आहे की— ( कांहीं ऐकलेसें करून ) अरे ! मी विनंति करण्यांत गर्क असतां हें कोणी बोलल्या सारखं काय बरं ऐकूं येत आहे ? पाहूंयाच तर हें काय आहे तें.

---

*नाटकांत येणाऱ्या प्रधान पात्रांच्या नांवांचा यांत उल्लेख केला असून, हा सर्व श्लोक कृष्णस्तुतिपर आहे. ह्यांत शब्दश्लेष आणि तसाच मुद्रालंकार साधला आहे.

१ द्रोण=मेघ. द्रोणवर्ण=मेघश्याम असा कृष्ण. २ भीमार्जुनांचा दूत होऊन आलेला. ३ व ४ शकुनि=पक्षी, त्याचा पति=गरूड; या गरूडाला त्याचेवर बसून वाटेल तिकडे नेणारा तो कर्णधार. ५ दुर्योधन=जिंकण्यास कठिण, ६ प्रख्यात. ७ भीष्म=भयंकर ( रागावला म्हणजे. ) ८ युधिष्ठिर= रणांत गाढून उभा राहणारा. ९ चक्र=सुदर्शन चक्र १० विराटदेह. ११ उत्तर-गः=उत्तम मार्गानें जाणारा. १२ अभिमन्यू=यज्ञाकडे जाणारा. १३ क्रोध.

[ पडद्यांत ]

" अहो ! कुरुराजाच्या यज्ञाचें केवढें हें वैभव ! "

सुत्रधार—( ऐकून ) हं. आलं लक्षांत !

आर्या ( गीति. )

दुर्योधन कुरुपतिचा यज्ञ असे चालला, तदर्थचि हे ।
अखिलहि निजयुवतींसह प्रेमें भूपाल पातले पाहे ॥ २ ॥

( जातो. )

ही स्थापना झाली.

---

[ नंतर तीन ब्राह्मण प्रवेश करितात. ]

सर्वजणः— अहो ! कुरुराजाच्या यज्ञाचें केवढें हें वैभव !

पहिलाः— श्लोक [ वृत्त—शिखरिणी. ]

द्विजोच्छिष्टान्नाचे बघुनि उरले शेषचि गमे ।
जणूं काशांची तीं विलसलि दिशीं, पूर्ण कुसुमें ॥
अशेषा वृक्षांच्या सुम–परिमला सर्व हरिलें ।
हवींच्या धूम्रांनीं, कुटिल गतिनें जे पसरले ॥
मृगां व्याघ्रांमध्यें नुरत मुळिं तो भेदहि कसा ।
गिरिस्थां सिंहांनीं त्यजिलि वध–बुद्धीहि सहसा ॥
जशीं यज्ञाची घे कुरुनृपति दीक्षा निजकरें ।
तसें त्याच्या नेमा सकल जग हेंही अनुसरें ॥ ३ ॥

दुसराः—आपण बरोबर बोललात.

श्लोक [ वृत्त—शिख० ]

हवींनीं–देवांचें परमसुख तो तृप्त अनल ।
धनांच्या दानांनीं द्विजवरहि ते तुष्ट सकल ॥
द्विजांचीं उच्छिष्टें मिळुनि खगही तृप्त दिसती ।
तसे गो–दानांनीं सकल नर संपन्न असती ॥
' नृपांच्या अंगीं ते वसति सगळे सद्गुण अहो ! '
असें गर्जे, आतां सकल जग हें हर्षितचि हो ॥ ४ ॥

तिसराः— हे सन्मान्य ब्राह्मण पहा, यांच्या–.

श्लोक [ वृत्त--शा. वि. ]

पार्गी, वेष्टन-पट्ट भूपशिरिंचे ज्यां वंदितां घर्षतीं ।
कीर्ती थोर सदुत्तमा पसरली ज्या ब्राह्मणांची क्षितीं ॥
ऐसें ब्राह्मण वेदघोषिं रत हे वाणी सुनृत्या करी ।
यांचे नेमहि वाढती अधिकची वार्धक्यही ये जरी ॥
होती वृद्ध तशी तनु शिथिल हो, घेतात यष्टी करीं ।
त्याहीं वाटत चालती अजि जणूं कीं हे त्रिपादावरी ! ॥
हस्तां ठेउनि वक्र, विप्रवर हे सच्छिष्य अंसांवरी ।
जाती टाकत पाउलें हळुहळू जीर्णा गजेंद्रा परी ! ॥ ५ ॥

सर्वजणः– ( ऋषिकुमारांस ) अरे ! अरे ! खुळसट ऋषिकुमारानों ! इतक्यांतच त्या अग्नीचें विसर्जन काय करितां ? अवभृथ स्नान अजून व्हाव-वयाचें आहे.

पहिलाः– तु तुः ! एकून या मूर्खांनीं शेवटीं आपली अक्कल पाजळलीच म्हणायची तर !

श्लोक [ वृत्त–सुवदना ]

यूपस्तंभाप्रती ह्या दहन करितसे अग्नी पसरुनी ।
वाटे हस्तास पृथ्वी कनकमय अशा टाकी उभवुनी ! ॥
जैशी विप्रा न साहे वृषल-निकटता चैत्याग्निस तसा— ।
निर्मंत्राग्नी करी जें वरचढपण तें साहे न सहसा ॥
वेदीच्या भोंवतालीं असति पसरले जे दर्भ हरित ।
त्या योगें आंतुनी ती करपलि, न बहू हो ज्वाल-विघृत ॥
प्राग्वंशीं–दीक्षितांच्या कुटिर–सदनिं त्या–तो धूम्र घुसत–
उत्फुल्ला पंकजांनीं युत सरसिं, जसा हस्तीच शिरत ! ॥ ६ ॥

दुसराः– हो, असंच आहे.

आर्या–( गीति. )

ह्या निर्मंत्राग्नीतें टाकिति विझवून सभय विप्रकुल ।
कीं स्वैर भडकुनी तो जावा नच फार दूरवर अनल ॥
शीलभ्रष्टचि होतां टाकिति वाळींत, त्या कुला जैसें ।
ज्ञातीतें रक्षाया;–ह्या अग्नीतेंहि वारिलें तैसें ॥ ७ ॥

तिसराः–

आर्या–( गीति.)

शकटी यज्ञाची ही नेतां घृत तींत लव उरें स्नेह् ।
त्यानेंचि पेटुनीया, अग्नी हीचा करीतसे स्वाह् ! ॥
व्यर्थचि हो जलसिंचन, ही जळते जेविं जननि ती जळते ।
होतां मृत तत्बालक,–बाल स्नेहेंचे; तेविं हें दिसतें ! ॥ ८ ॥

पहिलाः–आपण योग्य बोललांत. हा अग्नी–

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

दर्भातें सुकवून, त्या हिरवळी योगें हळू मंद हो ।
तो ही पाहत जाळुं धर्म–शकटी दुर्योधनाचीं अहो !॥
वाऱ्याचे मिळतां सहाय्य अनल ज्वालामयी होउनी ।
टाकी येउनिया क्रमें शकटिच्या चक्रास तो वेष्टुनी ॥
ज्वाला फांकुनि वन्हिच्या सकलही त्या चक्रधावेवरी ।
तो वन्ही मग मंडलाकृति दिसे त्या सूर्य–बिंबापरी ! ॥९॥

दुसराः—हें दुसरं पहा—

( आर्या–गीति )

वारूळतला पासुनि निघती बाहेर पंच छिद्रांनीं ।
पांच भुजंगम एकेकाळिंच ते दहन–भीतिला धरुनी ॥
ज्ञानेंद्रिय–पंचक तें एके वेळींच ज्या परी जातें ।
सोडूनि मृत तनूतें पंचत्वाप्रति तसेंच हें दिसतें ! ॥ १० ॥

तिसराः—हें आणखी एक दृश्य आपण उभयतांनीं पहावं—

आर्या [ गीति. ]

सानिलयज्ञाग्नीनें जळतां तरु, कोटरा मधुनि त्याच्या ।
पक्षी गेले उडुनी; प्राण जसे त्यजिति कोटरा तनुच्या ! ॥११॥

प्रथमः–असंच आहे–

( साकी–वृत्त. )

शुष्क एक तरु, करित दहन हा पुष्पित वृक्षवनातें ! ॥
शीलच्युत नर एकचि जैसा करितो भ्रष्ट कुलातें ॥ १२ ॥

दुसराः—

आर्या ( गीति. )

जळतां यज्ञाग्नीनें वेळू हे हालतात पवनवशें ।
होती खाली वरती मनुजाचें भाग्य जेविं होत असे ! ॥ १३ ॥

तिसराः—बरोबर बोललात आपण—

आर्या [ गीति ]

सुकली लता जयाला वेष्टित तो हा तरू असे जळत ॥
दुष्कुल—संसर्गे तो,—स्त्री दोषें—साधु जेविं हो पतित ! ॥ १४ ॥

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

पहिलाः—वृक्षादि झाड झुडपांसह ह्या वनाला ।
खाऊनि पोटभर जो बहु तृप्त झाला ॥
तो वन्हि पोंचत नदीस कुशानुसारें ।
हस्ता मुखास करूं शुद्ध, अशा विचारें ! ॥ १५ ॥

दुसराः— हा पहा, हा पहा—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

होतें जें कुशवस्त्र वाळत तयें हा अग्नि फैलावला ।
एका मागुनि एक वृक्ष अवघे जाळीतची चालला ॥
आंचेनें हिरवींहि केळि गळतीं पक्वांपरी भूवर ।
हा जो ताल दिसे पुढें, जळतसे मूळांतची हा चिर ॥
पोळीं ज्या वरती महा लटकलीं तो ही पडे कीं पहा ।
वाटे धूर्जटिच्याच त्या परशुच्या पाता परी पात हा ! ॥१६॥

तिसराः— ओहो ! हे पहा. साधुपुरुषांचा कोप जसा शांत होतो, त्याप्रमाणें हे भगवान् हुताशन अगदीं शांत झाले !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

संपतां इंधने सर्व । हा अग्नी नष्ट—सार हो ।
संपत्ती संपता जैशी । आर्याची दान—शक्ति हो ॥ १७ ॥

पहिलाः— सर्व नाहींसं झालं म्हणजे—

आर्या ( गीति. )

व्यसनी मनुष्य जैसा खाई घरदार मोडुनी सकल ।
तेवीं अरणी, दर्भहि, यज्ञपळी हींहि खातसे अनल ! ॥ १८ ॥

दुसराः—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

हा जाहला पळस नग्न नदीतटाकीं ।
यत्पर्ण एक करसा पवनें हले कीं ॥
हस्तेंच ह्या,—जणुं तिलांजलि दे जलाहीं ।
वृक्षांस—ज्यां करित वन्हि विनष्ट पाही ! ॥ १९ ॥

तिसराः— तर मग आपणहि इकडेच या. आपणहि जरा चूळवीळ भरून टाकूं.

दोघेः— फार उत्तम.

[ सर्वजण चूळ वगैरे भरून टाकतात. ]

पहिलाः— अरे ! हे तर कुरुपति दुर्योधन महाराज इकडेच येत आहेत कीं. यांच्या अग्रभागीं हे भीष्मद्रोण आहेत, आणि इतर सर्व राजमण्डळ यांच्या मागोमाग येत आहे. तसेच हे पौरजनः—

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

" यज्ञा सारुनि, अन्न देइ सकलां, ही विक्रमें जिंक भू ॥
कोपा सोडुनि दे, स्वबंधुवरती हो तूं दयावान् प्रभू ! ॥
ऐशीं बोलुनि गोड गोड वचनें पूर्व—स्मृती सूचक ।
वाटे पांडव—पक्ष पौर—जन ते संपादिती सात्विक ! ॥ २० ॥

चला, या तर. आपणहि आतां कुरुराजांचें स्वागत करूं या.

दोघेः— ठीक आहे, चला.

सर्वजणः— ( जाऊन ) महाराजांचा जयजयकार असो.

[ सर्वजण जातात. ]

**विष्कंभक संपला.**

---

[ तदनंतर भीष्म व द्रोण प्रवेश करितात. ]

**द्रोणः**—खरं बोलायचं तर, दुर्योधनानं धर्माचा अवलंब करून माझ्यावरच उपकार केले आहेत म्हणायचे. कारण—

( आर्या—गीति )

लंघुनिया मित्रांतें, सारुनिया दूर सर्व बंधूंतें, ।
शिष्यापराध पोचे येउनिया सरळ त्याचिया गुरुतें ॥
स्वीयापत्या देतां गुरुहस्तीं शैशवांत तें असतां ।
बालापराध येई मातापितरीं न, येत गुरुवरता ॥ २१ ॥

**भीष्मः**— श्लोक [ वृत्त—विभुषप्रिया ]

घेउनी करभार जो अति उच्च हें पद पावला ।
जो रणप्रियतेमुळें अयशा अशेषचि प्यायला ॥
पुण्यसंग्रह पात्र एकचि धर्म त्या अवलंबुनी ।
हा सुयोधन शेवटीं अजि जात यापरि शोभुनी ! ॥२२॥

[ नंतर कर्ण व शकुनी यांसह दुर्योधन प्रवेश करितो. ]

**दुर्योधनः**— श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

हो श्रद्धावान्मदात्मा, मम गुरुजनही तोषले पूर्ण चित्तीं ।
विश्वा विश्वास माझा, मज गणिति गुणी, लोपली ते अकीर्ती ॥
'स्वर्गप्राप्ती मृतां हो,'—म्हणति परि गिरा ना दिसे ही यथार्थ ।
तो नेत्रा आड नाहीं, फलित बहुगुणें स्वर्ग हो व्यक्त येथ! ॥२३॥

**कर्णः**—हे गांधारीनंदना ! न्यायानं प्राप्त झालेलं द्रव्य अगदीं सढळ हातानं दान करून न्यायाला उचित असंच तूं केलंस. कारण—

छंद—दिंडी.

क्षत्रियांचे वंशांत जनन ज्याचें ।
धनुर्बाणीं ऐश्वर्य सकल त्याचें ॥
धनाच्या जे करिति संचयास ।
पुत्रमोहें ते फसाति जगीं खास ॥
विप्रचरणीं अर्पुनी सकल वित्त ।
नृपें द्यावें धनु मात्र सुत—करांत ! ॥ २४ ॥

शकुनिः—गंगेत अवभृथ स्नान केल्यामुळं ज्याचं सर्व पाप धुऊन गेलं आहे असे आमचे हे अंगराज अगदीं बरोबर बोलले.

श्लोक [ वृत्त—इ. व. ]

इक्ष्वाकु, शर्याति, ययाति, राम ।
मांधातृ, नाभाग नृगांबरीष ॥
हे जाहले नष्ट जरी शरीरें ।
यज्ञेंचि आहेत जिवंत सारे ॥
तत्कोश, राष्ट्रेंहि तया सर्वेंचि— ।
गेलीं, परी ते जगती यशेंची ॥ २५ ॥

सर्वजणः—गांधारीनंदना ! तुझ्या ह्या यज्ञसमाप्तिबद्दल आम्हीं तुझं अभिनंदन करितों.

दुर्योधनः—हा माझ्यावर आपला अनुग्रहच्च आहे. (द्रोणास) आचार्य ! मी आपल्यास अभिवादन करितों.

द्रोणः—ये, पुत्रा ये. पण हें क्रमाला सोडून झालं.

दुर्योधनः-तर मग क्रम तो कसा ?

द्रोणः— काय ? तुझ्या नाहीं तो लक्षांत येत ? अरे, ( पितामहाकडे बोट करून ) यानांच पहिल्यानें वंदन केलें पाहिजे, कारण -

( साकी )

मानुषरूपी दैवतची हें धरि तरि पदयुग यांचे ।
भीष्मां सोडुनि इतरां वंदन गमतें अन्यायाचें ! ॥ २६ ॥

भीष्मः- ( द्रोणास ) छेः छेः असं नका म्हणूं आपण. पुष्कळशा कारणांमुळें आपल्यापेक्षां माझी योग्यता कमी आहे. कारण—

आर्या ( गीति. )

जननी-संभव मी हा, आपण परि निश्चयें स्वयंभवचि ।
आयुधवृत्ती माझी परि अपुली प्रेम गुप्त करण्याची ॥
ब्राह्मण आपण, आम्हीं क्षत्रिय वंशांत जन्म झालेले ।
आपण गुरु, शिष्य अम्हीं, वंद्य न आधीं, गुरुत्व जरि आलें ॥२७॥

द्रोणः— मोठ्या लोकांनी स्वतःला अशा प्रकारें कमी लेखणं योग्य नव्हे. ( दुर्योधनास ) बरं तर, ये, पुत्रा ये, मलाच कर ये प्रणाम.

**दुर्योधनः**– आचार्य ! मी आपल्याला प्रणाम करितो.

**द्रोणः**– ये ये, पुत्रा. अशाच प्रकारचीं अनेक अवभृथस्नानें तुला घडून त्यांत तुला असेच परिश्रम पडोत !

**दुर्योधनः**– हा अनुग्रहच आहे माझ्यावर. ( भीष्मास ) पितामह ! मी आतां आपल्याला प्रणाम करितों.

**भीष्मः**–ये, ये वत्सा ! तुझी बुद्धी अशीच निवळो आणि शांत होवो.

**दुर्योधनः**–अनुग्रहच आहे हा माझ्यावर. ( शकुनीस ) मामा ! तुम्हांला मी नमस्कार करितों.

**शकुनिः**–वत्सा ! –

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

या परी सर्व ही यज्ञ । संपादी साङ्ग या पुढें ।
विपुला दक्षिणा देई । सत्पात्र ब्राह्मणांप्रती ॥
राजसूयार्थ एकत्र । जरासंधाचिया परी ।
सर्व भूपांस जिंकूनी । आण तूं आपुल्या बळें ॥ २८ ॥

**द्रोणः**—वाः आशीर्वाद देत असतां सुद्धां हे पुढच्या कार्याची आतां पासूनच दिशा सुचवितात ! एकंदरींत ह्या क्षत्रियकुमाराला तंटे भांडणं आणि युद्ध याचीच आवड दिसते.

**दुर्योधनः**–मित्रा, कर्णा ! गुरुजनांना प्रणाम करून झाल्यावर आतां क्रमप्राप्त म्हटलं म्हणजे प्रिय मित्राचीच विचारपूस केली पाहिजे. (आलिंगन देण्यास सरसावतो. )

**कर्णः**–हं ह ! हे गांधारीनंदना !

श्लोक–[ वृत्त–व.ति. ]

यज्ञव्रतें तव तनू कृश फार होई, ।
आलिंगन–क्षम असे अथवा नसे ही– ॥
याचा न होत मम निश्चय चित्तिं कांहीं ।
तेणें धृती–अनुमती विण–होत नाहीं ॥
राजर्षिला उचितशा तव भाषणांनीं ।
साशंक होत मन, दे धृति त्वद्वचांनीं ॥ २९ ॥

**दुर्योधनः**–माझ्या विषयीं तुझी ही अशीच प्रेमबुद्धि सदैव राहो.

**द्रोणः**–पुत्रा ! दुर्योधना ! हे महेंद्राचे परम स्नेही–राजे भीष्मक–तुझे अभिनंदन करीत आहेत.

**दुर्योधनः**–आर्यांचें स्वागत असो. मीहि यांना प्रणाम करितों.

**भीष्मः**–हे पौत्रा, दुर्योधना ! साऱ्या दक्षिणापथाला रोखून धरणारे हे राजे भूरिश्रव तुझें अभिनंदन करीत आहेत.

**दुर्योधनः**–आर्यांचें स्वागत असो.

**द्रोणः**–पुत्रा ! दुर्योधना ! तुझ्या यज्ञाचें अभिनंदन करणाऱ्या वासुदेवानें पाठविलेला अभिमन्यू तुला नमस्कार करीत आहे.

**शकुनिः**–वत्सा ! दुर्योधना ! हा जरासंधपुत्र सहदेव तुला प्रणाम करीत आहे.

**दुर्योधनः**–ये, ये वत्सा ! तूं आपल्या पित्या सारखाच पराक्रमी हो.

**सर्वजणः**–हें सर्व राजमंडल आपलें अभिनंदन करीत आहे.

**दुर्योधनः**–सर्वांची माझ्यावर ही कृपाच आहे. अहो, इथं झाडून सारं राजमंडळ आलं असतां राजे विराटच कां बरं आले नाहींत ?

**शकुनिः**–त्यांच्याकडे मी दूत पाठविला आहे. ते बहुतकरून वाट चालत असावेत.

**दुर्योधनः**–( द्रोणास ) आचार्य ! धर्म आणि धनुर्विद्या ह्या दोहोंचेहि आचार्य आपणच. आपण कांहीं तरी दक्षिणा म्हणून स्वीकारली पाहिजे.

**द्रोणः**–काय दक्षिणा म्हणतोस ? ठीक, ठीक; तर मग मला जें मागावयाचें आहे तें मी आतांच तुझ्यापाशीं मागतों.

**दुर्योधनः**–छेः छेः आपण माझे आचार्य असून, आपण माझ्या पाशीं मागावयाचें ही भाषा कशाला पाहिजे! आपल्याला जें पाहिजे असेल त्याची आपण मला आज्ञाच करावी.

**भीष्मः**–( दुर्योधनास ) अरे ! हें असं कां बरं म्हणतात ? ज्या अर्थी–

**श्लोक** [ वृत्त–मंदारमाला. ]

**यज्ञास सारून प्यालासि तूं सोम, तूझ्यावरी छत्रछाया असे ।**
**तूंतें दिलें सद्गुरूच्या करीं शैशवा पासुनी, कीर्ति तूझी वसे ॥**

ऐसें असूनी जरी क्षत्रियाचा गुरू भोगितो दैन्य दुर्दैव तें ।
तें द्रव्य, तो सोम, ती कीर्ति, हीं सर्वही भासती कीं वृथा मन्मतें ॥३०॥

दुर्योधनः–( द्रोणास ) आपली काय इच्छा आहे ? आज्ञा करावी मला. काय करावं मी ?

द्रोणः--पुत्रा, दुर्योधना ! सांगतो.

दुर्योधनः--पण या संबंधानं इतका विचार तो कसला चालला आहे ?

श्लोक [ वृत्त–अमृतध्वनी. ]

विद्यार्जना करवुनीया मला, अधिक प्राणाहुनी गणितसा ।
मी साहसें करुनिया लाभलों पदवि शूरांमधें अजि तसा ॥
सांगा सुखें हृदय–वांछा, गुरो ! गुरुसि अर्पावया अचल धी ।
माझी अशी-करगता ही गदा ! सकल मीं वाहिलें गुरु-पदीं ! ॥३१॥

द्रोणः–पुत्रा ! सांगतोच तर आतां. पण डोळ्यांत येणारे हे अश्रू आड येताहेत. हा कंठ–

सर्वः–एकून आचार्यहि अश्रू गाळतात ! हें असं कसं ?

भीष्मः–पौत्रा, दुर्योधना ! एकून तुझे सारे परिश्रम फुकटच गेले म्हणावयाचे ?

दुर्योधनः--कोण आहे तिथं ?

( एक भट प्रवेश करितो. )

भटः–महाराजांचा विजय असो.

दुर्योधनः–पाणी आणा पाहूं थोडं.

भटः–जशी महाराजांची आज्ञा. ( बाहेर जाऊन परत येऊन ) महाराजांचा विजय असो. हें पाणी.

दुर्योधनः–आण, इकडं आण. ( कलश घेऊन ) आचार्य ! माझी विनंति आहे कीं, अश्रुपातामुळं मलिन झालेलं मुख आचार्यांनीं ह्या उदकानं स्वच्छ धुवून टाकावं.

द्रोणः– ठीक, ठीक; तें असूं दे. तूं माझं इप्सित कार्य केलंस म्हणजे तेंच माझं मुखोदक होईल !

दुर्योधनः–धिक्कार असो मला !

श्लोक [ वृत्त–हरिणी ]

स्मरुनि जरि या पूर्वीच्या त्या कृती कुटिला मम ।
मनिं गणितसां दातृत्वीं मी ठरेनचि अक्षम ॥
तरि,–कठिण जो बाणांनीं तो स्वहस्त पुढें करा ।
मम करिं असे पाणी दाना; न संशय तो धरा ॥ ३२ ॥

द्रोणः–अहाहा! आतां मात्र माझ्या अंतःकरणाला तुझा पूर्ण विश्वास पटला. पुत्रा! ऐक तर–

श्लोक [ वृत्त–विबुधप्रिया. ]

पांडवां गति काय ती, जगिं आश्रयाविण पातली ।
द्वादशाब्दहि लोटले! नच ऐकिली, नच पाहिली! ॥
पांडवां कुरुराज्य दे समभाग तें करुनी मुदें!
दक्षिणा, मम याचना, जरि देशि तूं तरि हेंचि दे! ॥ ३३ ॥

शकुनिः–(खळबळून जाऊन) हं थांबा जरा! ( द्रोणास )—

आर्या ( गीति. )

विश्वसुनी गुरुवरती सरसावे शिष्य गौरवाकरितां ।
तों गुरु उकरुनि काढिति अप्रस्तुत विषय केंवि हा भलता! ॥
योग्य न हें मुळिं–, कैशी शोभे ही धर्मवंचना गुरुतें? ॥३४॥

द्रोणः–काय धर्मवंचना म्हणतोस! छेः छेः; असं बोलूं नकोस. तूं गांधार देशाचा अधिपती आहेस याचाच तुला गर्व चढला आहे! अरे शकुने! तूं स्वतः अनार्य आणि अधम असल्यामुळं दुसरे सारे लोक अनार्य आणि अधम आहेत असं तुला वाटतं! मोठी खेदाची गोष्ट! अरे,—

आर्या [ गीति ]

" द्यावें पैतृक–राज्या बंधूसी,–" वचन हें तुम्हां गमतें
कीं वंचना असे ही! युक्त अनार्यास मात्र हें दिसतें!
याचित असतां देणें बरवें, कीं तें हिराउनी घेणें– ।
योजूनिया बलातें त्यांनीं, याच्याच निर्णया करणें! ॥ ३५ ॥

सर्वजणः–काय! बलात्कारानं हिराऊन घ्यायचं म्हणता?

भीष्मः–वत्सा दुर्योधना! सध्यां अवभृथ स्नान हेंच प्रस्तुत आहे तेव्हां या अशा प्रसंगीं ह्या मित्ररूपी हितशत्रूंच्या–ह्या शकुनीच्या-बोलण्याकडे



द्रोण:—अहाहा ! आतां मात्र माझ्या अंत:करणाला तुझा पूर्ण विश्वास पटला. त्रा ! ऐक तर–

[ पंच० पृ. १२

लक्ष्यच देतां कामा नये. हा कांहीं द्यूताचा प्रसंग नाहीं! कारण असं पहा, वत्सा!

श्लोक [ शा. वि. ]

सध्यां पांडव जे वनीं भटकती त्या द्रौपदीच्यासह ।
जे झाले वनधूलिनें मलिन,—तें कोणासही दुःसह! ॥
त्यांच्या पासुनि तोंड तूं फिरविलें, ते वागती वांकडे ।
हें सारें शकुनीचियाच परुषें वाक्यें क्रमेंची घडे! ॥ ३६ ॥

हें सगळं याच्याच मानभंगाच्या बोलण्याचं फळ आहे!

**दुर्योधनः**—पितामह! तें काय असेल तें असो. (द्रोणास) पण आचार्यांना मला पहिल्यानं असं विचारायचं आहे कीं—

द्रोणः—पुत्रा! विचार, विचार काय विचारायचं आहे तें.

**दुर्योधनः**— श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

पूर्वी राजसभे मध्यें । हरितां राज्य, मान ही ।
रोष कां दाबला त्यांनीं ? । होते जरि समर्थ ते! ॥ ३७ ॥

**द्रोणः**—हा प्रश्न द्यूताचे नियम पाळण्यास प्रवृत्त झालेल्या आणि धर्माच्या नांवाखालीं फसवला गेलेल्या त्या धर्मराजालाच विचारला पाहिजे. तोच याचं उत्तर देईल!

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

सभास्तंभा उचलुनी । पेलतां वारिलें जयें ।
भीमातें धर्मराजानें । योग्य तोचि पुसावया! ॥
कोणा एका वरी भीम । फेंकिता स्तंभ तो जरी ।
अधिक्षेप कराया हा । नुरता शकुनी तरी! ॥ ३८ ॥

**भीष्मः**—आरंभलं काय आणि झालं काय? प्रस्तुत बाजूलाच राहलं. आणि ओढवलं भलतंच. अहो, आचार्य! सध्याच्या प्रसंगीं—पांडवांना अर्धराज्य देण्यासंबंधाचं कार्य—हेंच अधिक महत्त्वाचं आहे; कलहाला उद्युक्त होणें कांहीं महत्त्वाचं नाहीं.

द्रोणः—त्या कार्यासंबंधानं नको आतां शीण करून घ्यायला; तें तर होणंच नाहीं. चालूं दे—कलहच चालूं दे!

**भीष्मः**—आचार्यांनीं शांत व्हावं. हें पहा, वत्सा दुर्योधना! अरे,—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

जे हीनशक्ति, अजि-आश्रय—हीन, दीन, ।
जे इच्छितात सुखलाभ तुझ्या कडून ॥
ज्यांना शिवे वितथ गर्व न तो कदाही ।
जे प्रीतितें तुजवरी करितात पाही ॥
देणार त्यांस निज सन्निध आश्रयास ।
किंवा तयां घडविणार वनांत वास ! ॥ ३९ ॥

शकुनीः—तेंच युक्त ! तेंच युक्त !

कर्णः—अहो, आचार्य ! असे रागाऊं नका. कारण दुर्योधन म्हटला म्हणजे—

[ आर्या—गीति. ]

हितकर वचनहि यातें ऐकवितां तें कठोर शब्दांनीं
कोपा चढतो, अन्या श्रेष्ठजनस्तुति रुचे न या कानीं ॥
रक्षा स्वशिष्य-कार्या—विसरुनि दोषास—पार जें पडलें ।
बहुदोषयुक्त गजसम चुचकारुनि यास पाहिजे धरिलें ॥४०॥

द्रोणः—वत्सा, कर्णा ! ब्राह्मण स्वभावतःच तेजस्वी—तापट असतात. बरं झाल, तूं मला वेळींच जागं केलंस. मी आतां तुझ्याच इच्छेनुरूप वागतों. (दुर्योधनास) वत्सा, दुर्योधना! माझं तुला ऐकायचं आहेना ? अरे, मी तुझा प्रभू आहे ना ?

भीष्मः—(स्वगत) हं. आतां मात्र यांनीं योग्य मार्गाचा अवलंब केला ! अनावर आणि उद्धत अशांवर मात्रा म्हटली म्हणजे त्यांना चुचकारून त्यांचं सांत्वन करणं हीच !

दुर्योधनः—(द्रोणास) माझेच्र्गसे काय ? प., आपण माझ्या सर्व कुलाचेहि प्रभू आहांत.

द्रोणः—ही—ही नम्रवृत्ति—केवळ तुलाच शोभण्यासारखी आहे. आणि म्हणूनच हे पुत्रा—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

ज्यां वंचिलें तरि तयांत न दोष तूझा ।
ज्यां पीडितांहि तुज, त्यांतचि लाभ तूझा ! ॥

मोठ्या कुलांतिल परस्पर भेद सारे ।
होवोत शांत वचनें अजि धर्म–सारें ॥ ४१ ॥

दुर्योधनः–तर मग ह्या संबंधांत मला आतां विचारच घेतला पाहिजे.

द्रोणः–पुत्रा ! कोणाचा विचार घेऊं इच्छितोस तूं ! कोणाला विचारणार तूं ?

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

भीष्मांस, कर्णास, तया कृपास, ।
कीं सिंधुराजास जयद्रथास, ॥
द्रौणीस, कीं त्या विदुरास, पुत्रा ! ।
कीं तातमातां प्रति, सांग आतां ॥ ४२ ॥

दुर्योधनः–छेः छेः –या पैकीं कोणाचाच नव्हे.–मी मामांचा विचार घेणार आहे.

द्रोण.–काय, शकुनीचा ? हाय ! तर मग कार्यनाश ठरलेलाच !

दुर्योधनः–मामा ! असे इकडे या पाहूं जरा. कर्णा ! तूंहि पण ये.

द्रोणः–( स्वगत ) कांहीं हरकत नाहीं. आपणहि आतां असेंच वागावें ! ( उघड ) ये, ये. वत्सा गांधारराजा ! असा इकडे ये.

शकुनिः–हा आलों मी.

द्रोणः–वत्सा !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

वार्द्धक्यीं क्रोध ये मोठा । होत दुर्भाग्य हें मम ! ।
अजाण बटु–धार्ष्ट्यातें । घाल पोटीं करी शम ॥
कठोर वचनें केल्या । अकार्या निरसावया ।
आलिंगनचि हें एक । दिसतें युक्त; दे तया ! ॥ ४३ ॥

भीष्मः–( आत्मगत )

( साकी–वृत्त )

याचितसे हा गुरु शकुनीतें वात्सल्यें शिष्याच्या ।
सांत्वयिता या परि हा त्यजिल न वृत्ती वक्र मनाच्या ! ॥ ४४ ॥

**शकुनी**:—( आत्मगत ) अरे वा: ! हे आचार्य एकून मोठेच छट आणि बिलंदर आहेत म्हणायचे! आपलं कार्य साधण्याकरितां माझं हें असं सांत्वन करूं पहाताहेत!

[ सर्वजण इकडे तिकडे फिरून मग बसतात. ]

**दुर्योधन**:—मामा ! पांडवांना अर्धराज्य देण्याच्या बाबतींत आपण काय ठरविलं आहेत ?

**शकुनि**:—त्यांना कांहीं एक देऊं नये, असं मी ठाम ठरवून टाकलं आहे.

**दुर्योधन**:—त्यांना तें देऊन टाकावं,–असंच मामांनीं म्हणायला पाहिजे होतं.

**शकुनि**:—अर्धराज्य देऊन टाकायचं असंच जर तुझं ठरलं असेल तर आमचा सल्ला घेण्यांत काय अर्थ ? सर्वच कां नाहीं देऊन टाकीत त्यांना ?

**दुर्योधन**:—मित्रा, कर्णा ! तूं कसं कांहींच बोलत नाहींस या बाबतींत ?

**कर्ण**: —या बाबतींत मी तें काय सांगायचं आतां ? अरे,:—

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

**श्रीरामानें स्वतः जें अनुभवुनि असे पाळिलें प्रेमभावें ।**
**सद्बंधुत्वा अशा त्या अवगणिन कसा, मी जया आदरावें ।।**
**युक्तायुक्ता पहाया, तुजविण न असे कोणिही तो समर्थ ।**
**येऊ साह्यार्थ सारे समर खवळतां जाण आम्हीं त्वदर्थ! ।।४५।।**

**दुर्योधन**:—मामा ! पुंड अडदांड अशा प्रबल . शत्रूनीं व्याप्त, आणि जिथं उपजीविकाहि होणार नाहीं असा नापीक कुदेश–हुडकून काढा. तिथं राहूं द्यां पांडवांना !

**शकुनि**:—मोठी खेदाची गोष्ट ! मी तर असं म्हणेन कीं त्यांच्या-करितां–कुदेशाऐवजीं–एखादा शून्य देशच हुडकून काढावा ! अरे—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

**देश जो पुंड शत्रूंचा । जेथें कांहिंहि ना पिके ।**
**शोधावा म्हणतां ऐसा । अर्थ–शून्यचि बोल हे ! ।।**




**शकुनिः**—पांच रात्रींच्या आंत पांडवांचा जर शोध लागला तर हा कुरुराजा त्यांना अर्धराज्य निःसंशय देऊन टाकील! आतां या मुदतींत त्यांना आणवायचं काम आपलं. [ पंच० पृ. १७

कारण—

कोण पार्थाहुनी आहे । या लोकीं बलवत्तर ? ।

आणखी—

क्षार-भूही धान्य देई । जेथें राजा युधिष्ठिर ! ॥ ४६ ॥

दुर्योधनः— श्लोक [ वृत्त–हरिणी. ]

गुरु–करतलीं मी दानाच्या जलाप्रति सोडिलें ।
कुल-गुरु जनांनींही साऱ्या असे अवलोकिलें ॥
जगाहि सगळें मानी यातें प्रमाणचि सर्वथा ।
करिन तरि मी–होवो कांहीं !–पुरी जलसत्यता ॥
फसगत असो, कीं कांहीं ही, असो गुरु–वंचना ।
दृढतर असे वाक्पूर्तीची मनीं मम कामना ! ॥ ४७ ॥

शकुनिः—( एकीकडे दुर्योधनास ) एकून असत्य भाषणाच्या दोषापासून तुला मुक्त केलं पाहिजे, एवढंच ; कां नाहीं,–एवढं झालं म्हणजे झालं ना ?

दुर्योधनः—मग याहून दुसरं काय ?

शकुनिः—तर मग चल, असा माझ्या बरोबर ये. ( त्याचेसह द्रोणाजवळ जाऊन ) अहो आचार्य ! ह्या कुरुराजाची आपल्याला अशी विनंति आहे कीं—

द्रोणः—वत्स, गांधारराज ! बोला काय आहे ती.

शकुनिः—पांच रात्रींच्या आंत पांडवांचा जर शोध लागला तर हा कुरुराजा त्यांना अर्धराज्य निःसंशय देऊन टाकील ! आतां या मुदतींत त्यांना आणवायचं काम आपलं.

द्रोणः—हं. अशी भाषा नका बोलूं आतां. कारण—

आर्या [ गीति ]

छलनोत्सुका तुम्हां जे द्वादश वर्षांत दृष्टिस न पडले ।
त्यां मी पांचचि रात्रित आणावें हें कसें सरळ दिसलें ? ॥
या पेक्षां सांगावें स्पष्टचि शब्दांत तेंच इष्टतर ।
दिधलें वचन जरी, कीं:–"मी गुरुतें दक्षिणा न देणार!"॥४८॥

भीष्मः—वत्सा, दुर्योधना! न्यायधर्माच्या बाबतींत कपट नसावं. हें असं घडून आल्यानं आम्हांलाहि आनंदच होणार आहे. तेव्हां वत्सा! तूंच पहा—

श्लोक [ वृत्त–उपजाति ]

वर्षांत एका अथवा शतांत ।
दे पांडवा राज्यविभाग, तात! ॥
सत्य प्रतिज्ञा करि, हे सुवीरा ।
कुरु–प्रतिज्ञा चिर सत्य–सारा! ॥ ४९ ॥

दुर्योधनः—माझाहि हा असाच निश्चय आहे.

द्रोणः—( आत्मगत )

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

पांडव–प्राप्तिच्या साठीं । हनूमंताचिये परी ।
समुद्रोल्लंघनालाही । झालों सोत्कंठ अंतरीं ॥
उल्लंघुनी समुद्रा तो । सीता–शुद्धि करीतसे ।
तसें मी पांडवांसाठीं । करावे यत्न वाटतें ॥ ५० ॥

तर आतां पांडवांचा शोध कुठून बरं काढावा?

[ इतक्यांत एक भट प्रवेश करितो. ]

भटः—महाराजांचा विजय असो. विराटनगरा कडून–एक दूत आला आहे.

सर्वजणः—घेऊन ये त्याला इथं लौकर.

भटः—जशी आज्ञा. [ जातो.

( दूत प्रवेश करितो. )

दूतः—महाराजांचा विजय असो.

सर्वजणः—काय—विराटेश्वर आले!

दूतः—ते अत्यंत शोकाकुल असल्यामुळें आले नाहींत; कारण त्यांच्या अगदीं जवळच्या नात्यांतल्या अशा—

[ आर्या–गीति ]

कीचक–बंधु–शतांना बाहुबलें रात्रिं मारिलें कोणी ।
शस्त्राविणेंच तद् वध केल्याचें स्पष्ट येतसे दिसुनी! ॥५१॥

**भीष्मः**—( स्वगत ) काय ! शस्त्राशिवाय वध ! ( द्रोणाचार्यास एकीकडे ) अहो, आचार्य ! तर मग पांच रात्रींची अट कबूल करा तुम्हीं आतां.

**द्रोणः**—कां—कां बरं ?

**भीष्मः**—अहो !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

बाहुशाली भीमसेन । लीला त्याचीच होय ही ! ।
निश्चयें वाटतें मातें । नसे कांहींहि संशय ! ॥

कारण कीं:—

कुरुबंधुशतीं त्याचा । पेटे क्रोधाग्नि नित्य जो ।
कीचकाचें बंधुशत । त्यानेंची जाळिलें असे ॥५२॥

**द्रोणः**—पण आपल्याला कसं कळलं हें ?

**भीष्मः**— आर्या ( गीति. )

निज वत्सांचा विक्रम, शृंगाघातस्थलें तशी त्यांचीं ।
गोवृषभां ओळखिती नच कां,—तटिनी—तटीं चुकारांची ! ॥५३॥

**द्रोणः**—काय म्हणतां ? गोवृषभ ! ठीक आहे, तर मग माझी कार्यसिद्धीच झाली म्हणायची ! ( दुर्योधनास ) वत्सा, दुर्योधना ! तुझी पांच रात्रींची अट कबूल आहे मला.

**दुर्योधनः**— ठीक आहे. मग आतां काय उरलं ?

**द्रोणः**— अहो ! यज्ञसमारंभ साजरा करण्याकरितां आलेल्या हे भूपालानो ! ऐका, ऐका. इथं असलेल्या ह्या कुरुराज दुर्योधनानीं—छेः छेः नुसत्या दुर्योधनानीच नव्हे तर त्यांना आपली संमति देणाऱ्या शकुनि मामानींहि—पांच रात्रींत पांडवांच्या संबंधाचा शोध लागल्यास त्यांना अर्धराज्य देण्याचं कबूल केलं आहे. (दुर्योधनाकडे पाहून) होय ना वत्सा ! असंच ना !

**दुर्योधनः**-हो असंच, अगदीं असंच.

**द्रोणः**—: (शकुनि आदिकरून मंडळीकडे पाहून) याचा पूर्वीच द्विवार त्रिवार विचार केलेला बरा.

**शकुनीः**— वेळ आली म्हणजे त्याचा विचार !

द्रोणः– आपला काय आहे अभिप्राय, गांगेय ?

भीष्मः– ( आत्मगत )

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

आचार्यांचा हर्ष जेव्हां । गांभीर्याप्रति सोडुनी–।
प्रकटे, वाटतें तेणें । कीं जाई कार्य नासुनी ॥
फसवूं पाहती ज्यातें । त्याच दुर्योधनाचिये–।
हस्तीं फसविले जाती । स्वतः हेची सुनिश्चयें ! ॥ ५४ ॥

( उघड ) वत्सा, दुर्योधना! माझं आणि विराटाचं अप्रकट असं वैर आहे; आणि शिवाय तो तुझा यज्ञसमारंभ साजरा करायलाहि आला नाहीं; तर या दोन कारणांकरितां त्याच्या गोधनांचं हरण करावं.

द्रोणः–( एकीकडे ) विराटेश्वराच्या गोधनाचं हरण ?

भीष्मः–( द्रोणास ) अहो! ब्राह्मणाची बुद्धि म्हणजे नीट सरळ-ऋजु मार्गानंच जावयाची !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

रथशब्दें घर्षिलेले । क्रुद्ध होतील पांडव ।
येतील धेनु हरितां । ते कृतज्ञ रणास्तव ! ॥ ५५ ॥

[ एक भट प्रवेश करितो. ]

भटः––महाराजांचा विजय असो. आपल्या इच्छेनुसार नगरप्रवेशा-करितां रथ आणि घोडे तयार आहेत, महाराज !

दुर्योधनः– ( आर्या–गीति )

याच रथीं बैसुनिया गोधन–हरणार्थ जाउं शीघ्रगती ।
घेतो फिरुनि गदा जी मखसमयीं खालिं ठेविली होती ! ॥५६॥

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

द्रोणः— येऊं दे रथ तो मदीय तरि ही,
शकुनिः—मत्कुंजरा मागवा ॥
कर्णः— माझा स्यंदन, जोडुनी हय तया, येथेंचि तो आणवा ॥
भीष्मः—धांवें मन्मन त्या विराट–नगरा, आणा धनू सत्वरी ।
सर्वजणः–छेः छेः आपण येथ राहुनि, अम्हां आज्ञापिणें संगरीं ॥५७॥

**द्रोण:**—वत्सा ! दुर्योधना ! रणांत तुझा पराक्रम पहावा अशी आम्हां दोघांची इच्छा आहे.

**दुर्योधन:**—आपल्या इच्छेप्रमाणंच होईल.

**द्रोण:**—वत्स, गांधारराज ! ह्या गोग्रहणाच्या प्रसंगीं तुमचा रथ सर्वांच्या आघाडीस–अगदीं पहिला–असला पाहिजे !

**शकुनि:**—ठीक आहे, पसंत आहे आपल्याला ही कल्पना.

[ सर्व जातात. ]

प्रथम अंक समाप्त.

# अंक २ रा.

[ नंतर वृद्ध गोपालक प्रवेश करितो ]

**वृद्धगोपालकः**—माझ्या गाई बहुवत्सा होवोत. गोपस्त्रियांना सदा सौभाग्य लाभो. आमचा राजा विराट या पृथ्वीवर एकछत्री राज्य करो. विराट महाराजांच्या वाढदिवसानिमित्य होणाऱ्या गोप्रदानसमारंभाकरितां नगराला लागून असणाऱ्या ह्या बागेच्या राईत सर्व गाई येऊं देत; त्याचप्रमाणं सारे गोपकुमार आणि गोपकन्या मंगलकारक आणि आनंददायक अशा प्रकारें सजून येऊं देत. मी वडिलधारा असल्यामुळं वडिलपणाच्या नात्यानं सारी गंमत पाहीन! अरे, पण हा कावळा-ह्या वठलेल्या शुष्क झाडावर बसून, एका शुष्क फांदीवर आपली चोंच घांशीत,-सूर्याकडे तोंड करून अशा कर्कश स्वरानं का बरं ओरडतो आहे? इडा पीडा टळो आणि अमंगळ पळो! आम्हांला आणि आमच्या गोधनाला यापासून कांहीं अपाय न होवो! आतां मी आपल्या वडिलपणाच्या नात्यानं या गोपकुमारांना आणि गोपकन्यांना मोठ्यानं हाका मारतो. अरे ए गोमित्रका! एऽऽऽगोमित्रका!

[ गोमित्रक प्रवेश करितो. ]

**गोमित्रक**—मामा! मी आपल्याला नमस्कार करितों.

**वृद्धगोपालक**—इडा पीडा टळो आणि अमंगळ पळो! आम्हांला आणि आमच्या गोधनाला कांहीं अपाय न होवो! अरे, गोमित्रका! विराट महाराजांच्या वाढदिवसानिमित्य होणाऱ्या ह्या गोप्रदानसमारंभाकरितां नगराला लागून असणाऱ्या ह्या बागेच्या राईत सर्व गाई येऊं देत; आणि त्याचप्रमाणं, सारे गोपकुमार आणि गोपकन्या मंगलकारक आणि आनंददायक अशा प्रकारांनी सजून येऊं देत. अरे, गोमित्रका! गोपकुमरांना आणि गोपकन्यांना मोठ्यानं ओरडून हाक मार पाहूं इकडं.

**गोमित्रकः**—जशी मामांची आज्ञा. (मोठ्यानं) ए गोरक्षिणिके! स्वामिनी! अरे घृतपिंडा! कुंभदत्ता! महिषदत्ता! या, या. सगळेजण या लौकर.

[ नंतर सर्व जण प्रवेश करितात. ]

**सर्वजणः**—मामा! नमस्कार करितो.

**वृद्धगोपालकः**—आमच्या गोपकुमारांची आणि गोपकन्यांची सारी इडा-पिडा टळो आणि अमंगळ पळो ! कल्याण असो. विराट महाराजांच्या वाढ-दिवसानिमित्य होणाऱ्या समारंभाकीरतां नगराला लागून असणाऱ्या या बागेच्या राईत सर्व गाई येऊं देत. तांपर्यंत आपण इथं गात नाचत राहूं या

**सर्वजणः**—जशी मामांची आज्ञा.

[ सर्व नाचूं लागतात. ]

**वृद्धगोपालकः**—वा: वा: छान चाललं आहे नाचगाणं ! तर मी सुद्धां नाचतों आतां !

**सर्वजणः**—अहो-अहो मामा ! केवढा मोठा उठला आहे हा धुळीचा लोळ !

**वृद्धगोपालकः**—नुसता धुळीचा लोळच उठला नाहीं, तर शंख दुंदुभींचा नादहि झडूं लागला आहे !

**सर्वजणः**—हे पहा, हा सूर्य-याच्या बिंबाआड ही धूळ आल्यामुळं, दिवसाच्या चंद्राप्रमाणं फिकट दिसत असून-एकदां दिसतो आणि एकदां दिसत नाहींसा होतो !

**गोमित्रकः**—हाय हाय ! मामा हे कुणीतरी लोक-मारे घोड्याच्या गाड्यांतून बसून येऊन, अन् ज्यांच्या डोक्यावर दह्याच्या गोळ्याप्रमाणं पांढरीं शुभ्र छत्रं आहेत असे हे चोर-आमच्या साऱ्या गौळवाड्याला उध-ळून लावीत आहेत !

**वृद्धगोपालकः**—अरे, अरे ! बाणांचा वर्षाव सुद्धां सुरू झाला कीं ! मुलानों ! मुलीनों ! घुसा-घुसा, या चांडाळांच्या झोंपड्यांतून घुसा झटपट !

**सर्वजणः**—जशी मामांची आज्ञा. [ सर्व जातात.

**वृद्धगोपालकः**—हां हां थांबा, थांबा !

[ पडद्यांत. ]

" हाणा ! हाणा ! पकडा ! पकडा ! "

( एकीकडे सर्वांस ) चला, चला. ही सर्व हकीगत विराट महाराजांना कळवूं या आपण आतां. [ जातात.

[ नंतर भट प्रवेश करितो. ]

**भटः**—अहो-अहो ! कळवा-कळवा-महाराज विराटेश्वरांना कळवा

कीं, धृतराष्ट्राचे पुत्र आपल्या ह्या गाई हरण करून नेत आहेत; म्हणावं ते आतां आपला पराक्रम चोऱ्या करण्यांत खर्च करूं लागले आहेत! गौळवाड्यांत तर—

श्लोक [ वृत्त–मंदाक्रांता. ]

गोवत्सें तीं पळत सुटतां, धेनुही त्रस्त होती ।
हें देखोनी वृषभ–वदना खिन्नता व्यापिते ती ॥
चारी बाजू दुमदुमति ह्या आर्तनादें तयांच्या ।
गौळीवाडा विषम दिसतो, तात्स्थिती होत शोच्या ! ॥ १ ॥

हेंहि कळवा महाराजांना.

[ पडद्यांत ]

" काय ? धृतराष्ट्राचे पुत्र गाई हरण करून नेत आहेत, म्हणून म्हटलंत ? "

**भटः**—होय, आर्य ! तेच नेत आहेत !

**कांचुकीयः**—( प्रवेश करून ) प्रत्यक्ष आपल्या बंधूंचा द्वेष करणाऱ्यांना हें साजेसंच आहे !

श्लोक [ वृत्त–हरिणी ]

चापां सज्जुनि, अंगुलीं मनगटीं त्राणाप्रती बांधुनी ।
घालूनि कवचांस, हस्तिवरती वा स्यंदनीं बैसुनी ॥
वीर्यें गर्वित, युद्ध–सज्ज, वरुनी असोंहि, ते कौरव ।
धेनूंच्या वरि सूड हा उगवती, वैराट–वैरास्तव ! ॥ २ ॥

जयसेना ! महाराजांचा आज वाढदिवस असल्यामुळं ते सध्यां जन्मनक्षत्रांच्या पूजनविधींत गुंतले आहेत. तेव्हां अशा भलत्याच वेळीं जर त्यांना ही वार्ता सांगितली तर हें त्यांच्या कोपाला मात्र कारण व्हायचं म्हणून आजच्या ह्या मंगल दिवसाचा हा पुण्यविधि संपला म्हणजे हें सारं त्यांच्या कानावर घालीन.

**भटः**—आर्य ! हें कार्य अत्यंत महत्वाचं आहे. हें त्यांना तावडतोबच कळविलं पाहिजे.

**कांचुकीयः**—तर मग हें आतांच त्यांना कळवितों.

आम्हीं तर शोकनिमग्न होतों. अथवा पांडवांशीं—अप्रत्यक्षपणेंच का होईना—मी स्नेहानं वागतों हें तर कारण नसेल ? कांहीं असो. सध्यां आपल्याला त्याच्याशीं लढलं हें पाहिजेच. हस्तिनापुरांत राहत असल्यामुळं भगवानांना दुर्योधनाचा स्वभाव ठाऊक असेल! अथवा असं जरी असलं कीं—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

दोषा दुर्योधनाच्या ते । नच उच्चारिती जरी ।
साधाया कार्य तो कर्ता । पुसाया न शिणे तरी ! ॥ ६ ॥

कोण आहे इथं ?

[ भट प्रवेश करितो. ]

भटः —महाराजांचा विजय असो.

राजाः—भगवानांना आत्ताच्या आतां बोलाऊन आण पाहूं इथं.

भटः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

[ नंतर भगवान्—अर्थात् धर्मराज—प्रवेश करितात. ]

भगवान्ः —(सर्वांकडे पाहून) ओहो ! हें काय वरं हें ! हा काय प्रकार?—

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

दंतींद्रां सज्ज केले, चढविलि कवचें, वीर अश्वस्थ सारे ! ।
स्थायी केले कण्यांच्या वरति रथ, कटी खेंचिल्या कीं सुवीरें ॥
ह्या साऱ्या सिद्धतेतें बघुनि शिवतसे भीति मातें अपूर्व ! ।
माझ्या साठीं न भी, मी स्थिर—मति, परि हे साहसी बंधु सर्व।।७।।

राजाः—विजय असो, भगवानांचा विजय असो. भगवान् हा मी विराट आपल्याला प्रणाम करीत आहे.

भगवान्ः—कल्याण असो.

राजाः—भगवन् ! हें आसन आहे, याच्यावर बसावं.

भगवान्ः—( बसून ) हे राजा !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

सिद्धता ही कशा साठीं ? । संतुष्टा श्री कधींहि न ! ॥
गर्विष्ठांप्रति दंडूनी । पीडितां मुक्ति देत ही ॥ ८ ॥

राजाः--भगवन् ! धेनुहरण करून माझा उपमर्द केला आहे.

भगवान्‌ः--कोणी ?

राजाः--धृतराष्ट्र-पुत्रांनीं.

भगवान्‌ः--( आत्मगत )मोठी खेदाची गोष्ट !

साकी—वृत्त.

लोकीं असणें एकच कुल ही गोष्ट मनास सुधींच्या ।
कांपवीतसे कारण नसतां वृत्ति उदार जयांच्या ॥
वैर-प्रिय ते कौरव त्यांनी जरि अपराधा केले ।
वाटे मज परि खरोखरचि हे आम्हां कडुनी घडले ! ॥ ९ ॥

राजाः— भगवन्! आपला विचार कमला चाललाय आतां ?

भगवान्‌ः— छेः छेः विचार नाहीं कसला. त्याच्यामुळं किंचित् काळजी वाटली झालं.

राजाः— आजपासूनच त्यांना कायमची शांति देतों. युधिष्ठिर समर्थ असूनहि हें सारं सहन करितो. पण मी कांहीं हें सहन करणार नाहीं!

भगवान्‌ः— ( आत्मगत )

श्लोक [ वृत्त-मंदाक्रांता. ]

दैवीं आली शयन करण्या भूतलीं पर्णराशी ! ।
गेलें राष्ट्र, द्रुपदतनया मानभंगास सोशी ! ॥
आलें वेषांतर, निवसतो आश्रयानें परांच्या ! ।
आजीं साऱ्या गमति मजला गोष्टि ह्या श्लाघ्यतेच्या ।
कां कीं आतां उघड दिसतो मत्क्षमाशीलतेचा-
लोकां साऱ्या उमज पडला ! लोप हो दूषणांचा ! ॥ १० ॥

[ भट प्रवेश करितो. ]

भटः— महाराजांचा विजय असो.

राजाः— हं, आतां काय चालिवलं आहे दुर्योधनानीं ?

भटः— एकटे दुर्योधनच नाहीं आलें कांहीं; पृथ्वीवरील सर्व राजे आले आहेत.

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

ते द्रोण, भीष्म, शकुनी, कृप, सिंधुराज ।
ते शल्य मद्रनृप, कर्णहि अंगराज ॥
त्यांच्या रथांसह जधीं हलतीं पताका ।
तेणें–शरें नच–सुटे अमुचा अवांका ! ॥ ११ ॥

राजाः— (उभा राहून हात जोडून) काय ? सन्मान्य गांगेय भीष्महि आले आहेत ?

भगवान्ः— वाहवा ! वाहवा ! त्यांनी अशाप्रकारें उपमर्द केला असतांहि यानीं आपल्या शिष्टाचाराचें देखील उल्लंघन केलें नाहीं ! केवढी ही नम्रता ? ( आत्मगत )

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

कुरुश्रेष्ठ गुरू भीष्म । कां आले न कळे मला ! ।
कीं स्मृती द्यावया आलेः–'प्रतिज्ञा–काल संपला !' ॥ १२ ॥

राजाः—कोण आहे तिथं ?

[ भट प्रवेश करितो. ]

भटः—महाराजांचा विजय असो.

राजाः—सूताला बोलाव पाहूं.

भटः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

[ सूत प्रवेश करितो. ]

सूतः—आयुष्मंतांचा विजय असो.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

राजाः—

शीघ्र आणा रथा माझ्या । अतिथी थोर ये रणा ! ॥
भीष्मा बाणें तोषवावें । जिंकावे ही न कामना ॥ १३ ॥

सूतः—जशी आयुष्मंतांची आज्ञा. पण हे आयुष्मन् !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

भेदाया–शत्रु सैन्यातें । ज्या रथीं बसतां सदा ।
रथचर्येस दावाया । गेले उत्तर त्यांतुनी ॥ १४ ॥

राजाः—काय ? तर मग कुमार आमच्या अगोदरच युद्धार्थ बाहेर पडले ?
भगवान्ः—हे राजा ! कुमारांचं निवारण करा, कारण-

[ आर्या-गीति. ]

बाल्यामुळें कुमारा युद्धाची हाव दांडगी आहे
युद्धांतिल गुणदोषां नच गणितां जात ते रणीं पाहे ॥
सन्निध रणाग्नि येता तो नच दाही कुणा कधूं नच थे ।
धृतराष्ट्र-तनय तैसे कचरतिल न वागण्या रणीं अनर्थे ! ।
स्वाभाविक दोषांते युद्धांतिल म्यां निवेदिले राया ! ।
उपमर्दावें कोणा म्हणुनी मी बोललों न बोला या ॥ १५ ॥

राजाः—तर मग दुसरा रथ अगदीं त्वरित सज्ज करा.
सूतः—जशी आयुष्मंतांची आज्ञा.
राजाः—पण-इकडं ये पाहूं जरा अगोदर,-
सूतः—आयुष्मन् ! हा आलों मीं.
राजाः—हें सांग अगोदर कीं या वेळीं—

आर्या [ गीति. ]

कां नच गेलासी तूं करण्या सारथ्य त्या कुमाराचें ? ।
कीं तुज आज्ञापी तो-म्हणुनी त्वां टाकिलेंस जाण्याचें ? ॥
नृप-सारथ्य कराया पात्र न तूं तिळहि मन्मतें गमतें ।-......

सूतः—आयुष्मंतांनी शांत व्हावं. मी रथ सज्ज करून सूताला योग्य अशा पेशानं कुमारांच्या जवळ सुद्धां जाऊन उभा राहिलों. पण कुमारांनी-

श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

परिहास कराया, कीं । पाहण्यास्तव कौशला ।
मला वर्जूनिया, नेली-। सारथ्यार्थ बृहन्नला ॥ १७ ॥

भगवान्ः—( विराट कावराबावरा झाला आहे असें पाहून त्यास ) छे, छे, राजांनी भिण्याचं बिलकुल कारण नाहीं.

श्लोक [ वृत्त-पृथ्वी. ]

जरी चढुनिया रथीं, रणिं बृहन्नला जाय ती, ।
तरी भ्रमणशील तो रथचि धूलि-मेघाप्रती- ॥

विनिर्मुनि, शरांविणें रिपुसि निस्वनें नेमिच्या ।
निवारुनि, पळामध्यें समरिं खास जिंकील त्यां ॥१८॥

राजाः—तर मग तावडतोब दुसरा एक रथ सज्ज करा.

सूतः—जशी अयुष्मंतांची आज्ञा. [ जातो.

( भट प्रवेश करितो. )

भटः—कुमाराच्या रथानं कच्च खाल्ली !

राजाः—कच्च खाल्ली ? कशी कच्च खाल्ली ?

भटः—कशी तें ऐकावं महाराजांनीः—

[ साकी ]

रणक्ष्मेशा बहु शत्रूनीं हयपथ रोधुनि धरितां ।
स्मशानाभिमुख राई देखुनि झाला रथ तो वळता ॥
विश्रम सेवाया । सुंदर छाया देखुनिया ॥ १९ ॥

भगवान्:—( आत्मगत ) ओः हो ! इथं तर गांडीव धनुष्य ठेवलं होतं ! ( उघड ) हे राजाः—

[ साकी ]

श्मशानाभिमुख रथ होण्याला कारण कांहिं घडो तें ।
" धार्तराष्ट्र ते जेथें स्थित तें श्मशान होईल गमतें ! ॥ "
मंगलसूचक हें ॥ राया ! स्पष्टचि दिसताहे ॥ २० ॥

राजाः— भगवन् ! अकालीं केलेलं स्वस्तिवाचक भाषण क्रोधच उत्पन्न करितें !

भगवान्:— क्रोधाचं कारण नाहीं. यापूर्वी केव्हांहि मी बोललों आणि तें अनृत ठरलं असं झालंच नाहीं.

राजाः— होय, आपण म्हणतां तें खरं आहे. ( भटास ) तूं जा आणि पुढील बातमी घेऊन ये.

भटः—जशी महराजांची आज्ञा. [जातो.

राजाः— आर्या ( गीति. )

पृथ्वी सकंप करि जणुं ऐसा सहसा ध्वनी कुठुनि आला ? ।
सरिता-स्रोत अडवितां तत्क्षणिं यावा ध्वनी जसा तसला ॥२१॥

पहा वर कसला शब्द आहे हा तें.

( भट प्रवेश करितो. )

**भटः**— महाराजांचा विजय असो. घोड्यानां कांहीं वेळ विश्रांती दिल्या वर मग कुमार श्मशानांतून बाहेर पडले आणि—

**भगवान्ः**— ( आपल्याशीं ) हा माझं भाषण खोटं न ठरवो म्हण झालं !

**भटः**— श्लोक [ वृत्त—स्रग्धरा ]

**वर्षूनी शेंकडोशें शर, असित गजां रक्त केले क्षणांत ।**
**योद्धा, वा अश्व नाहीं—अमित न घुसले बाण ज्याच्या तनूंत**
**बाणांच्या वृष्टिनें त्या अभिमत रथही थांभले ठाइंठाइं ॥**
**बाणांनीं लुप्त झाले पथ, शरसरिता तें स्रवे चाप पाही ! ॥२**

**भगवान्ः**—( आत्मगत )

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

**खांडवीं जितुक्या सोडी—। जलधारांस इंद्र तो ।**
**प्रभावी अक्षयी भाता । बाणा तत्संख्य वर्षितो ! ॥ २३ ॥**

**राजाः**—बरं पण शत्रूकडील हकीगत काय आहे मध्यां ?

**भटः**—तिकडचं—प्रत्यक्ष असं मी कांहीं पाहिलेलं नाहीं, पण चारांच सांगण्यांत असे आहे कीं:—

आर्या [ गीति ]

**'तोच धनुर्घोष असे ! ' वदुनि असे द्रोण मागुती फिरले !**
**रक्तांत बाण घुसतां भीष्मानींही प्रहार ते त्यजिले ॥**
**'आतां पुरे' ! म्हणूनी; कर्ण तसा भग्न पावला वाणीं ।**
**' हा, हा ! काय असे हें ' ? वदताती इतर नृपति वदनांनी ।**
**या परि ओढवलें भय, परि अभिमन्यू असूनही बाळ ।**
**गडबडला मुळिं न मनीं त्यातें भय नच करी लव विटाळ ॥२**

**भगवान्ः**—काय ? एकून तिथं अभिमन्यू प्राप्त झाला आहे ? तर हे राजा—

आर्या ( गीति. )

युद्धा ये अभियन्यू, उभय कुलांचाहि तेज-वन्हि जरी ।
न ठरे बृहन्नला क्षण, द्यावा धाडून सूत अन्य तरी ॥ २५ ॥

राजाः—छे. छेः असं नका म्हणूं, कारण रणामध्यें—

आर्या [ गीति ]

जो पळवी भीष्मातें यत्कवचीं शिरति राम-शर नच ते ।
मंत्रास्त्र द्रोणातें, कर्ण जयद्रथ नृपांस अन्यातें ॥
तो नच सौभद्रावरि टाकिल शर काय तत्पितृ-स्मृतिनें ।
भिउनि मनीं विजयाच्या विक्रम-वृत्तेंचि परिशिल्या श्रुतिनें ?॥
किंवा घडेल हें ही,-सौभद्रा देखतांचि अल्पवयी ।
निपजून मित्रभावचि तो त्या रक्षील कठिण रण-समयीं ॥२६॥

भटः—हा कुमारांचा रथः—

[ आर्या-गीति ]

आवरितां भ्रमण करी, धांवे त्या रश्मि सोडितां रथ तो ।
नेच्छी अपकारातें, सन्निध जातां न धर्षणा करितो ॥
त्वरित गतीनें जाउनि अभिमन्यूच्या समीप परते तो ।
वाटे रथचर्येच्या शिक्षण-पाठास काय हा देतो ! ॥ २७ ॥

राजाः—जा. आणखी ह्या पुढची बातमी घेऊन ये पुन्हा.

भटः—जशी महाराजांची आज्ञा. ( बाहेर जाऊन पुन्हां परत येऊन ) महाराजांचा जयजयकार असो ! विराटेश्वरांचा विजय असो ! महाराजांच्या करितां एक आनंदाची बातमी आणली आहे; गाईनां सोडवून आणलं आहे आणि कौरवांना उधळून दिलं आहे !

भगवान्ः—ही परमेश्वरी कृपाच म्हणायची. याबद्दल राजाचं अभिनंदनच केलं पाहिजे.

राजाः—( अडखळून, चाचरत ) छेः छेः माझं नव्हे माझं नव्हे; आपलंच अभिनंदन केलं पाहिजे. पण कुमार कुठं आहे सध्यां ?

भटः—ज्या ज्या वीर पुरुषांचे पराक्रम कुमारांनी प्रत्यक्ष पाहिले त्या त्या वीराच्या पराक्रमाच्या गोष्टी ते आपल्या पुस्तकांत लिहून ठेवीत आहेत.

राजाः—ओहो! खरोखर कुमाराचा हा उद्योग प्रशंसनीय आहे. कारण—

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

श्लाघनीय अशा कार्यी। वीरां होऊनि वार ते।
तत्काल गौरवीता त्यां। वेदना नाश पावते ॥ २८ ॥

बरं ती बृहन्नला कुठं आहे सध्यां?

भटः—ही आनंदाची बातमी सांगायला ती राणीवशांत गेली आहे.

राजाः—तर तिलाच बोलवा इथं पहिल्यांदा.

भटः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

[ नंतर बृहन्नला प्रवेश करिते. ]

बृहन्नलाः—( पाहून विचारांत निमग्न होऊन )

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

गाण्डीवा धनुच्या गुणा चढवितां, त्या कर्षुनी ताणतां।
कांहीं काल मला प्रयास पडले, साधे न तें साधतां ॥
बाणां काढुनि वर्षण्या वरिवरी मुष्टी न माझी बळे।
ती येई न मिटावया मुळिं मला सौकर्य गेल्यामुळें।
गोधास्थानिं नुरें पटुत्व, न ठरें चापल्य अन्य स्थलीं।
स्त्रीभावें मज येत जी शिथिलता, यत्नेंचि ती लोपली ॥ २९ ॥

आणखी—

श्लोक (वृत्त–शिखरिणी.)

अशा वेषामध्यें नृपतिसमुदायीं मजप्रती।
कसाया कोदंडा बहु निपजली लाज मनिं ती!
परी गेलों युद्धीं रिपुवरति मी चाल करून।
शरांच्या वर्षावें करुनि अवघें दुर्दिन–रण ॥
तदा युद्धामध्यें अवघि रणधूली उसळली।
रिपूंच्या रक्तें ती परि सकल तत्काळ नमली! ॥ ३० ॥

अहो! या विराटेश्वराकरितां—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

धेनू सोडविल्या, तसा विजयही संपादिला सर्वथा ।
नाहीं होत परी प्रहर्ष हृदया तो लेशही तत्त्वता ॥
याचें कारण आज मी पकडुनी, बांधूनि दुःशासना ।
युद्धाग्रीं,--नगरा न त्या परतलों, देऊनि त्या शासना ! ॥ ३१ ॥

उत्तरेनं प्रेमपूर्वक दिलेल्या अलंकारांनी मंडित होऊन धर्मराजांच्या पुढें जायला लज्जेमुळं मला चोरट्या सारखं होत आहे ! तर आपण विराटेश्वरांचेच दर्शन घ्यावं. अरे ! हे इथं तर आर्य युधिष्ठिर आहेत !

श्लोक [ वृत्त–पृथ्वी. ]

असे तरुण हा, तपोवनिं परी रमे श्रेष्ठशा ! ।
नरेश्वर असूनिही, वरित ब्रह्मवृत्ती तशा ।
स्व–राज्य जरि टाकिलें, तरि सुवैभवें वाढतीं ॥
त्रिदण्ड धरि हा करीं, धरि न राजदण्डाप्रती ! ॥ ३२ ॥

( जवळ जाऊन भगवानास ) भगवन् ! आपल्यास प्रणाम करितों.

भगवान्:—कल्याण असो.

बृहन्नला:—( विराटेश्वरास ) महाराजांचा विजय असो.

राजा:— श्लोक [ वृत्त–चामर. ]

व्यर्थ वंश, व्यर्थ रूप, कांति ही मनोहरा ।
कर्म हेंच शोभवी ल्हान थोर त्या नरा ॥
हेंच रूप एक कालिं हास्यपात्र जाहलें ।
तेंच आज मान्यतेप्रती पुनश्च पावलें ॥ ३३ ॥

बृहन्नले ! तूं जरी अत्यंत थकून गेली आहेस तरी तुला पुन्हा मी तसदी देतों. रणांतील वृत्तांत विस्तारानं सांग पाहूं.

बृहन्नला:—ऐकावं महाराजांनी.*

भट:—( प्रवेश करून ) महाराजांचा विजय असो.

---

* टीप:—मूळ संस्कृत नाटकामध्यें या ठिकाणीं पुढील प्रमाणें भाषणें आहेत. परंतु मराठी भाषांतरांत तीं अनवश्यक असल्यामुळे गाळलीं आहेत.

राजा:—तें कर्म रणोत्साहाचें आहे, तेव्हां संस्कृतांतच सांग.

बृहन्नला:—ऐकावं तर तें महाराजांनी.

राजाः—( त्यास पाहून )

श्लोक [ वृत्त—उपजाति ]

तूंतें दिसे हर्ष अपूर्व झाला ।
सांगे तयाच्या तरि कारणाला ।

भटः— अशक्य ऐसें प्रिय ये घडून ।
सौभद्र युद्धीं अणिला धरून ! ॥ ३४ ॥

बृहन्नलाः—काय धरून ! ( आत्मगत. )

श्लोक [ वृत्त—इं. व. ]

म्यां जोखिलें सैन्यबलास आजी ।
म्यां शोधिल्या लक्षुनि वीर-राजी ॥
म्यां पाहिलें, त्या अभिमन्युलाही ।
आम्हांकडे त्यासम वीर नाहीं ॥
गेला असे कीचक तो मरोनी ।
तत्तुल्य येईल दुजा कुठोनी ? ॥३५ ॥

भगवान्‌ः—बृहन्नले ! हें कसं काय झालं असेल ?

बृहन्नलाः—भगवन्—

बृहन्नलाः— आर्या ( गीति. )

सौभद्रा जिंकिलसा नच दिसतो कोणि ही मला वीर ॥
असुनी शिक्षित, बलवान्, आहे तो अतुल धीर गंभीर ।
आलें असेल त्याच्या किंवा हें दैविं संगरीं ग्रहण ॥
दुर्भाग्यानें केवळ तत्पितरांच्याच हें अधःपतन ! ॥ ३६ ॥

राजाः— बरं, पण आतां मला हें सांग कीं, तो कसा धरला गेला ?

भटः—

आर्या ( गीति. )

निःशंक रथीं चढुनी, उतरविलें बाहुनींच त्या क्षितितें ।

राजाः— कोणी ?

भटः—नेमिति नरेंद्र ज्यातें पाकारिंयं तोच या करी कृतितें ! ॥ ३७ ॥

बृहन्नलाः— ( एकीकडे ) अस्सं! तर भीमदादांनीं त्याला धरलं नाहीं, तर आलिंगन दिलं!

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

आस्वादिलें सुतस्नेहा । भीमें प्रेमा प्रकाशुनी ॥
मी मात्र दूर राहूनी । दर्शनें तोष मानिला! ॥ ३८ ॥

राजाः— तर मग योग्य अशा सत्कारपूर्वक त्याला आंत घेऊन या.

भगवान्ः— हे राजा! यादव आणि पांडव हे दोघेहि अभिमन्यूचे समर्थ रक्षक असल्यामुळेंच त्यांना भिऊन जाऊन अभिमन्यूचा असा गौरव झाला असं लोक समजतील. एवढ्याकरितां त्याला तिरस्कार दाखविणं हेंच न्याय्य होईल!

राजाः— यादवकुलांतील मुलीच्या पोटीं जन्मास आलेल्या मुलाचा तिरस्कार करणं योग्य नव्हे. कारण—

श्लोक [ वृत्त–स्रग्धरा ]

धर्माचा होय हा कीं तनय, दिसतसे उत्तरा एवढाच ।
होतो नातू अह्मांते–द्रुपद–कुलगत–ग्रंथिसंबंध हाच ॥
आहे कन्या मलाही, द्रुत विधि–घटितें जांवई ह्या करीन!
होतो पूजार्ह लोकीं अतिथि निजगुणेंः यास मी तोषवीन॥३९॥

शिवाय पांडव तर आम्हांला प्रियच आहेत.

भगवान्ः—हें असंच व्हायला पाहिजे होतं. मी असं बोलायला पाहिजे होतं आणि त्याचा परिहारहि हा असाच व्हायला पाहिजे होता.

राजाः—तर त्याला इथं घेऊन यायला कोणाला पाठवावं?

भगवान्ः—बृहन्नलेला पाठवावं.

राजाः—बृहन्नले! जा, आणि अभिमन्यूला घेऊन ये इथं.

बृहन्नलाः—जशी महाराजांची आज्ञा. (आत्मगत) याच कामगिरीची मी केवढा वेळ तरी वाट पहात होतो! तीच कामगिरी मिळाली.

भगवान्ः—(आत्मगत) श्लोक [ वृत्त–हरिणी. ]

नयन भरुनी पाहो आतां सुता प्रति अर्जुन ।
हृदयिं धरुनी आलिंगो वा जिथें न कुणी जन ॥

मम निकट हा प्रेमाश्रूतें न गाळिल लाजुनी ।
म्हणुनि बरवा हा एकांत प्रसंग गमे मनीं ॥ ४० ॥

राजाः—भगवान् ! कसा आहे कुमाराचा पराक्रम ?

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

भीष्मादि जिंकिले राजे । सौभद्रा धरिलें रणीं ।
किंबहुना ? सर्व पृथ्वी । टाकी उत्तर जिंकुनी ! ॥४१॥

[ नंतर भीमसेन प्रवेश करितो. ]

भीमसेनः—( आपल्याशीं )

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

त्या पेटल्या जतुगृहांतुनि आणतांना ।
बाहूवरून जननीसह बांधवांना ॥
जे वाटले श्रम मला तितुकेच आतां ।
झाले रथावरुनि ह्या उचलून घेतां ॥
हा एकलाचि अभिमन्यु असून बाळ ।
हे जाहले श्रम कसे, न कुणा कळेल ! ॥ ४२ ॥

कुमारा ! इकडून—इकडून ये.

[ नंतर अभिमन्यू प्रवेश करितो. ]

अभिमन्युः—अरे ! हा कोण बरं असावा ?

श्लोक [ शा. वि. ]

याचा वक्ष विशाल, पातळ दिसे हें पोट, तैशी कटी—
आहे ही कृश; स्कंध उंच, निधडे; ह्या ऊरु मोठ्या अती ॥
हा मातें उचलूनि येथ सहजीं आणी भुजें एकल्या ।
याचें फार असूनिही बल, कुशी माझ्या न कीं पीडिल्या !॥४३॥

बृहन्नलाः—इकडून-इकडून ये कुमारा !

अभिमन्युः—अरे, हा दुसरा कोण बरं ?

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

यातें न शोभति अशा वधु—भूषणांनीं ।
हा दीसतो जणुं करेणु—विभूषणांनीं—

शृंगारिला बहु मदोत्कट मत्त दंती।
यातें बघून सहजीं रमतात वृत्ती ॥
मूर्ती दिसे लघु, परी बहु ओज याचें।
भासे जणूं शिवचि; रूप परी उमेचें! ॥ ४४ ॥

बृहन्नला:—( एकीकडे भीमास, पण अभिमन्यूला ऐकूं न जाईसें ) तूं याला इथं धरून आणलंस,-हें काय केलंस ?

[ साकी. ]

अपजय येउनि माथीं आलें प्रथमाचि दूषण युद्धीं।
प्रिय तनयाच्या विरहें विव्हल होय सुभद्रा गत-धी ॥
' जित' झाला हें परिसुनि कृष्णाहि होइल त्यावरि रुष्ट।
किंबहुना! या निज हस्तांतें व्यर्थ दिले त्वां कष्ट! ॥ ४५ ॥

भीमसेनः—अर्जुना—

बृहन्नला:—होय, होय. अर्जुनाचाच पुत्र हा !

भीमसेनः—( एकीकडे अर्जुनास )

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

जे याच्या ग्रहणें समुद्भवति त्या दोषांस मी जाणतों।
साहे कोण पिता स्वपुत्र रिपुच्या हातीं जरी जाय तो? ॥
जें अन्यांस अनिष्ट इष्टचि परी तें वाटतें मन्मनीं।
कीं ती दुःखित द्रौपदी द्रुत हरो दुःखास या देखुनी! ॥ ४६ ॥

बृहन्नला:—( एकीकडे भीमास ) दादा! याचं भाषण ऐकण्याचं मला कौतूहल उत्पन्न झालं आहे. तरी दादांनी याला बोलायला लावावं.

भीमसेनः—ठीक आहे. ( अभिमन्यूस ) अभिमन्यु!

अभिमन्युः—( साश्चर्य व रोषानें ) काय ? नुसतं अभिमन्यू ?

भीमसेन —( अर्जुनास एकीकडे ) अरे, हा माझ्यावर रागावला! तूंच लाव याला बोलायला.

बृहन्नला—( अभिमन्यूस ) अभिमन्यू !

अभिमन्यु—कसं—कसं ? मला नुसतंच अभिमन्यू म्हणतोस ! अरे,—

[ साकी. ]

क्षत्रियकुलजां नुसत्या नांवें प्राकृत जन ते कधिंही।

संबोधिति नच, परि येथ दिसे शिष्टाचारचि हाही!॥
कीं मत् ग्रहण रणीं। झालें कारण अवगणनीं! ॥ ४७ ॥

बृहन्नला—अभिमन्यू! तुझी आई कुशल आहे ना?

अभिमन्यु—कसं–कसं? आईचीहि विचारपूस करितोस?

( आर्या–गीति. )

तूं आहेस युधिष्ठिर, किंवा ते भीमसेन, कीं विजय!।
तो तूं पितृसमचि मला पुसशी स्त्रीवृत्त त्यजुनिया विनय!॥४८॥

बृहन्नला...अभिमन्यु! देवकीनंदन केशव कुशल आहेना?

अभिमन्यु—(स्वगत) तर काय त्यांना सुद्धां असं एकेरी नांवानंच! (उघड) हो, हो. कुशल आहेत बरं! आपले ते अत्यंत ऋणानुबंधाचे आणि आप्त-कुशल आहेत,-बरं!

( भीमसेन व अर्जून सहेतुक एकमेकाकडे पाहतात. )

अभिमन्यु—हें कसं काय–माझ्याकडे पाहून, माझा उपमर्द करण्या-करतांच जसें कांहीं हसतां, हें कसं काय? हंसण्याचं कारण?—

बृहन्नला—कारण कांहीं महत्त्वाचं नाहीं फारसं म्हणा,–पण,—

आर्या–( गीति.)

अर्जुन पिता जयाचा, मातुल ही कृष्ण तो असे ज्यास।
त्या तरुण कृतास्त्राला अपयश रणिं बहुत योग्य वीरास! ॥४९॥

अभिमन्यु—बस्स! पुरे करा, तोंडास येईल तें बरळूं नका!

श्लोक [वृत्त–उपजाति.]

आत्मस्तुती ती आमुच्या कुलाला।
वाटे अयुक्ताचि करावयाला ॥

पण—

जे आज युद्धीं पडले सुवीर।
त्यांच्या शरीरीं दिसतील तीर ॥
ज्यांच्यावरी एकचि एक नांव–।
दिसेल माझेंच; न अन्य नांव! ॥ ५० ॥

बृहन्नला—(आत्मगत) कुमाराचं बोलणं वस्तुस्थितलिा धरून आहे.

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

होते वीर रथाश्वमत्तकरिनीं जे युक्त त्यांच्यातला।
केला विद्ध न कोणि बाणनिपुणें ऐसा न तो देखिला॥
मीही स्पंदन आपुला फिरवुनी घेतों न युद्धीं जरी।
होतो विद्ध रणांत निश्चित तरी माझ्या सुताच्या शरीं॥ ५१॥

( उघड ) ठीक आहे. हें तुझं वाक्पाटव झालं ! पण हें सांग,–तूं ह्या पदातीकडून कसा रे धरला गेलास ?

अभिमन्यु—तो माझ्या—

आर्या–( गीति. )

आला अशस्त्र सन्निध, धरला गेलों म्हणून मी समरीं।
निः शस्त्रा कोण वधी ? अर्जुन–सुत हा कदापि हें न करी !॥५२॥

त्यांत माझे तात अर्जुन यांची स्मृति—

भीमसेन— आर्या–( गीति. )

धन्य खरोखर अर्जुन परिसे जो श्लाघ्य विक्रमा रणिंच्या–!
प्रत्यक्षाचि सुत–वदनें, अपुल्या तैशाच आत्म–तनयाच्या !॥५३॥

राजा—लौकर–लौकर घेऊन या अभिमन्यूला.

बृहन्नला—इकडून—इकडून; हे महाराज इथं आहेत. जवळ जावं कुमारांनीं.–

अभिमन्यु—आः महाराज! कुणाचे महाराज ?

बृहन्नला—तसं नव्हे–तसं नव्हे–मी म्हणत होतों–ते ब्राह्मणासह बसले आहेत ते !

अभिमन्यु—काय ब्राह्मणासह म्हणतोस ? ( भगवानास ) भगवन् ! मी तुम्हांला प्रणाम करितो.

भगवान्:—ये, ये वत्सा !—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

औदार्य, धैर्य, विनयादि, दया स्वपक्षीं।
माधुर्यपूर्ण रसना, धनु वीर्य–साक्षी– ॥

ज्याच्यामुळें विजय, विक्रम-लाभ होई- ।
एकथा पित्यांत तव हे गुण सर्व पाही ॥
होवोत प्राप्त तुजला गुण सर्वही ते ।
अन्या पित्यांमधिलही रुचतील जे ते ॥ ५४ ॥

राजाः—ये, ये पुत्रा ! अरे, मला कसा प्रणाम करीत नाहींस तूं ? अहो ! खरोखर हा क्षत्रिय-कुमार फार गर्विष्ठ दिसतो ! याचा गर्व मी दूर करितों. अरे, याला कोणी पकडला ?

भीमसेनः—मी महाराज !

अभिमन्युः—अशस्त्र असलेल्या मी पकडलं असं म्हण.

भीमसेनः—शांतं पापं, शांतं पापं ! असं नको म्हणूंस:—

आर्या- ( गीति. )

पुष्ट स्कंधें सुंदर मम भुज, हें ईशदत्त शस्त्र मला ।
लढतों तदाश्रयें मी, दुर्बल धरिती करामधें धनुला ! ॥ ५५ ॥

अभिमन्युः—हां ! तसे शब्द उच्चारूं नकोस.

आर्या-( गीति. )

अक्षौहिणी समानचि बाहू एकचि असे जयाचा तो ।
तो मम मध्यम ताताचि असशी कां जो महा बला धरितो ? ॥
हें तव गर्वोक्तीचें वचन असे त्यास एक साजेसें ।
इतरांनीं तें वदतां, उपहासा पात्र होय नच कैसें ? ॥ ५६ ॥

भगवान्:—हो, पण पुत्रा ! हा मध्यम तात कोण ?

अभिमन्युः—कोण तें ऐका,—पण जाऊं दे: ब्राम्हणांपुढें आम्हीं प्रत्युत्तर करीत नसतों. हाच प्रश्न दुसऱ्या कोणी करावा पाहिजे तर.

राजाः—ठीक, ठीक. तसंच होऊं दे. पुत्रा ! मी विचारतों म्हणून सांग. हा तुझा मध्यम तात कोण ?

अभिमन्युः—ऐका कोण तें.

श्लोक [ अनुष्टुप. ]

जरासंधाचिया कंठा । वेष्टुनी निज बाहुनें ।
अंतराळीं धरूनी त्या । उग्र कर्मास जो करी ! ॥

कर्में या कृष्ण–मृत्यूही । जो टाळी स्वीय लाघवें ।
तोचि मध्यम मत् तात । उग्र कर्मास जो करी ! ॥५७॥

राजाः— श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

अधिक्षेपें तुझ्या ऐशा। न कोप चढतो मला ।
परी तूं कोपतां ऐसा । वाटे कौतुक मन्मना ! ॥
विचारूनी तुला प्रश्न । न केला अपराध म्यां !
जावो तो वाद् ! ( सभ्यांकडे पाहून त्यांस )
हा आतां । जावो, कीं राहु दे इथें॥५८॥

अभिमन्युः—माझ्यावर जर दयेचीच पखरण करायची असेल तर–

आर्या ( गीति. )

बंदीला उचित असा मान करा चरण–शृंखलांनींच।
भुजिं मज धरुनी आणिलें, नेतिल मज भीम ते भुजांनींच ॥५९॥

[ इतक्यांत उत्तर प्रवेश करतो. ]

उत्तरः— श्लोकः–[ वृत्त– व. ति. ]

मिथ्या स्तुती खरिच ती बहु कष्टदायी ।
मिथ्यास्तुति–प्रिय जगांत म्हणोत कांहीं ॥
माझा असे झडत हा स्तुतिपाठ युद्धें ।
मी ऐकितों, परि मदंतर लाजताहे ! ॥ ६० ॥

( जवळ जाऊन ) भगवन् ! मीं आपल्याला प्रणाम करितो.

भगवान्ः—कल्याण असो.

उत्तरः—तात ! मी नमस्कार करितों.

राजाः—ये, ये पुत्रा ! चिरंजीव हो. बाळ, पराक्रम केलेल्या सगळ्या वीरांचा तूं योग्य प्रकारें गौरव केलास ना ?

उत्तरः—होय, केला तात ! पण ह्या सर्वात जे अत्यंत पूज्य आहेत त्यांचा गौरव आपणाकडून व्हावा.

राजाः—पुत्रा ! कोणाचा ? कोणाला उद्देशून बोलत आहेस तूं हें ?

उत्तरः—हे इथं धनंजय आहेत यांचा.

राजाः—( साश्चर्य )काय धनंजयांचा ? धनंजय हे ?

उत्तरः—हो, तेच हे. यांनींच—



**राजा**:--पुत्रा ! कोणाचा ? कोणाला उद्देशून बोलत आहेस तूं हें ?
**उत्तर**:--हे इथं धनंजय आहेत यांचा.    [ पंच० पृ. ४२

[ साकी. ]

स्मशानस्थ धनु, अक्षय भाते दोन तसे घेवोनी ।
अम्हां रक्षिलें, भीष्मादिक नृप युद्धीं भग्न करूनी ! ॥ ६१ ॥

बृहन्नलाः—शांत व्हावं महाराजांनीं.

दिंडी–छंद.

बाल्य–भावें संभ्रांत होउनीया ।
प्रहारांतें करुनिही, स्मरेना त्यां ॥
सर्व विक्रम साधुनी स्वीय हस्तें ।
यास भासे तो घडत अन्यहस्तें ! ॥ ६२ ॥

उत्तरः—आपली शंका फेडून घ्यावी. मी म्हणतों याची साक्ष ह्यानं पटेल:—

[ साकी. ]

प्रकोष्ठान्तरीं व्रण जो पडला मौर्वीच्या आघातें ।
द्वादश वर्षे लोटलिं तरि नच ये सावर्ण्य तयातें ॥

[ साकी. ]

बृहन्नलाः— हा व्रण पडला फिरुनि कंकणें हस्तांतिल माझ्या हीं ।
रिचुनि बैसतां विवर्णता ये, गोधास्थल हें होई ! ॥६४॥

राजाः—पाहूं व्रं.

बृहन्नलाः— श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

चाटले बाण शंभूचे । असा अर्जुन मी जरी ! ।
गुप्तरूपी धर्मराज । भीमसेनहि हे तरी ! ॥ ६५ ॥

राजाः—अहो, धर्मराज! वृकोदर ! धनंजय ! तुम्हीं माझ्यावर विश्वास ठेवला नाहींत, हें कस ? ठीक, ठीक. तो योग्य कालीं वाटेल तुम्हांला ! बृहन्नले ! तूं अंःतपुरांत जा.

बृहन्नलाः—जशी महाराजांची आज्ञा.

भगवान्:—अर्जुना ! यापुढं आंत जाण्याचं खरोखर कारण उरलं नाहीं. आपण आपली प्रतिज्ञा पूर्ण केली आहे.

अर्जुनः—जशी आर्यांची आज्ञा.

राजाः— आर्या–( गीति. )

सत्यव्रत, पांडुतनय, दक्षचि जे रक्षणीं प्रतिज्ञेच्या! ॥
त्यांनीं स्व-निवासानें हरिलें कुल–कल्मषाप्रती अमुच्या ॥ ६७ ॥

अभिमन्युः—( आपल्याशीं ) एकून हे सारे माझे वडील आहेत तर, आणि म्हणूनचः—

( साकी. )

अवगणितां म्यां कोपति नच हे, हंसुनी मज खिजवीती ।
गोग्रहणाचा गोड अंत हा तात–चरण मज दिसती ! ॥ ६८ ॥

( भीमसेनाला उद्देशून ) तात !

( आर्या–गीति. )

नच अभिवादन केलें अज्ञानाच्या मुळेंच पहिल्यानें ।
पुत्रापराध विसरुनि करा प्रसादा तरी क्षमादानें ! ॥ ६९ ॥

भीमसेनः—ये, ये पुत्रा ! आपल्या पित्यासारखाच पराक्रमी हो. बाळ, आपल्या पित्याला नमस्कार कर.

अभिमन्युः—( अर्जुनास ) तात ! मी आपल्याला नमस्कार करितों.

अर्जुनः—ये, ये पुत्रा !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

हाच तो तनयांगाचा । स्पर्श आल्हाददायक ।
लाभला द्वादशाब्दांतीं । झालों मी ज्यास पारखा ॥ ७० ॥

पुत्रा ! विराटेश्वरांना नमस्कार कर.

अभिमन्युः—( विराटास ) मी नमस्कार करितों.

राजाः—ये, वत्सा ये !

श्लोक–[ वृत्त–व.ति. ]

लाभो तुला अतुल धैर्य युधिष्ठिराचें ।
ती भीम–शक्ति, वर कौशल अर्जुनाचें ॥
माद्रीसुतांमधिल कांति, मती महा ती ।
लाभो तुला, तशि जगत्प्रिय कृष्ण–कीर्ती ॥ ७१ ॥

( आत्मगत ) पण उत्तरा आणि अर्जुन यांचा हा निकट संबंध माझ्या मनाला जाचत आहे ! या संबंधानं कसं वागावं मी आतां ! ( विचार करून ) ठीक–ठीक ! असंच ! ( उघड ) कोण आहे तिथं ?

[ भट प्रवेश करितो. ]

**भटः**—महाराजांचा जय असो.

**राजाः**—पाणी आण पाहूं थोडं.

**भटः**—जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन परत येऊन ) हें पाणी.

**राजाः**—अर्जुना ! गोग्रहणप्रसंगीं मिळविलेल्या विजयाचं पारितोषिक म्हणून **उत्तरेचा** स्वीकार कर.

**भगवान्**—(आत्मगत) यामुळं खालींच मान घालावी लागत आहे !

**अर्जुनः**—( आत्मगत ) काय ?- हा माझ्या शीलाची परीक्षा करीत आहे काय ? ( उघड ) हे राजा !:-

श्लोक- [ वृत्त–अनुष्टुप. ]

**सर्व अंतःपुरा ह्या मी । मातृवत् मानिलें; तरी ।–**
**स्वीकार उत्तरेचा मी । तनया कारणें करी ! ॥ ७२ ॥**

**भगवान्**—(एकीकडे) आतां वर डोकं करायला हरकत नाहीं, उजळ माथा झाला !

**राजाः**—ठीक आहे. तर मग आतां मी उत्तराला भीष्मपितामहांच्या-कडे धाडतो. अहो, धर्मराज ! वृकोदर ! धनंजय ! आपण इकडून यावं असं..

[ सर्व जातात. ]

**अंक दुसरा समाप्त.**

# अंक ३ रा.

[ नंतर अभिमन्यूचा सूत प्रवेश करितो. ]

सूत—अहो! सर्व क्षत्रियांचे आचार्य ज्यांचे अग्रणी आहेत अशा साऱ्या क्षत्रियांना कळवा, कीं:—

आर्या ( गीति. )

कृष्ण-सुदर्शन भयही लवही रिपुनीं मनीं न वागवुनी, ।
चिर जे नष्टचि झाले पांडव त्यांनाहि तुच्छ लेखूनी,॥
नेलें बंदि करूनी अभिमन्यूला रणांतुनी रिपुंनीं ।
सधनू कौरव असतां, केलें त्याच्या न रक्षणा त्यांनीं ! ॥ १ ॥

याबद्दलची लाज वाटावयाला पाहिजे, असं कळवा.

[ नंतर भीष्म व द्रोण प्रवेश करितात. ]

द्रोण—( सूतास ) सूता ! सांग, सांग. ह्या रणांतून—

श्लोक ( वृत्त-मंदाक्रांता. )

नेलें कोणी रणपटु अशा शिष्य-पुत्रास माझ्या ? ।
युद्धा इच्छी कवण वरदा दैवताशीं शरांच्या ? ॥
सांगा मातें; द्रुत दवडितो दूत ऐसे गणूनी ।—
वीरा, अस्त्रा, चमुस अथवा योग्य ये जें दिसूनी ॥ २ ॥

भीष्म—सूता ! सांग, सांग—

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

झाला मोड तरी पलायन रणांतूनी न ज्या ठाउक ।
तारुण्यें समरस्थलीं भटकणें हें ज्या गमे कौतुक ॥
त्याला नेइ धरून कोण ? कलभा न्यावें जसें हस्तिच्या ।
हस्तींतें धरण्यास जाउनि, तिथें यूथा न देखूनिया ! ॥ ३ ॥

[ नंतर दुर्योधन, कर्ण, व शकुनि प्रवेश करितात. ]

दुर्योधन—सूता ! सांग, सांग. अभिमन्यूला कोणी नेलं ? मीच जाऊन त्याची मुक्तता करितो। कारण—

श्लोक [ वृत्त- शा. वि. ]

तातांच्या सह याचिया कलह तो म्यां मांडिला सांप्रत ।
तेणें संशय तो मदीय सकलां येईल कीं निश्चित ! ॥
हा आधीं मम पुत्र, नंतरचि हा त्या पांडवांचा असे । ! !
चालों तें कुलवैर, दोष लवही बालाकडे या नसे ! ॥ ४ ॥

कर्ण—तूं जें हें बोललास तें अत्यंत प्रेमळपणाचें आणि तुला साजेसेंच आहे. पण हे गांधारीपुत्रा ! एवढेंच करून हें भागणार नाहीं. कारण, केवळ बालभावामुळें—

श्लोक [ वृत्त- शा. वि. ]

आला हा स्वजनैक भाव धरुनी साधावया त्वत्प्रिय ।
युद्धाग्रीं लढला, रणांत धरला गेला, घडे अप्रिय ! ॥
ह्या बाळा अभिमन्युचें अवन तें झालें न अस्मत् करें ।
तेव्हां वल्कल सेविणेंचि उचित त्यागूनि चाप त्वरें ! ॥ ५ ॥

शकुनि—सौभद्राचे वाली पुष्कळ आहेत. तेव्हां हा वेळपर्यंत त्याची मुक्तता खात्रीनें झालीच असली पाहिजे. कारण—

श्लोक [ वृत्त- मदिरा. ]

अर्जुन-पुत्र असें कळतांच विराट तिमूटचि सोडिल त्यातें ।
नातरि कृष्णकृती स्मरुनी मनिं मुक्त करील रण-त्याजित्यातें ॥
मर्दि रणांत प्रलंब तया हलिचें भय वाटुनि सोडिल किंवा ।
ना तरि तो बलभीम रिपूसि विमर्दुनि आणिल घालुनि खेवा ! ॥ ६ ॥

द्रोण—सूता ! बोल, बोल ! कसा त्याला पकडून नेला ?

श्लोक [ वृत्त- शा. वि. ]

त्याचा स्यंदन जात कां उलथुनी ? कीं खैर झाले हय ?
चक्रांच्या वजनामुळें धरणिचा कीं होत शक्ति-क्षय ?
कीं भात्यांतिल संपले शर ? तुझें सारथ्य कीं लोपलें ? ।
कां त्याच्या धनुचीच रज्जु तुटुनी निष्काम तें जाहलें ? ॥
दैवें ओढवती रणांत विपदा ऐशाचि योद्ध्यांप्रती ।
बाणांनीं अथवा रथ्यांस वसुधा- पृष्ठीं कधीं पाडिती ! ॥

याच्या ठायिं न शक्य हें परि असे, कीं त्याप्रती ज्ञान तें ।
युद्धाचें परिपूर्ण, तेविं समरीं कौशल्य जें लागतें ॥ ७ ॥

सूतः—आयुष्मन् ! हा धनुर्वेद पूर्ण संकटमय आहे. आयुष्मंतांना हें ठाऊक नाहीं कां ? कीं:—

आर्या–( गीति. )

कथिले आचार्यांनीं त्यांसम रण–दोष मुळिं न ते घडले ।
होते महारथ्याचे तूणीरीं बाण पूर्ण ते भरले ॥
होता अलातचक्रा सम माझा रथहि गरगरा फिरत ।
तोंची एक पदाती चालुनि येउनि रथीं तया धरित ! ॥ ८ ॥

सर्वः—काय ? पदातीनं धरलं ? असा होता तरी कसला तो पदाति ?

सूतः—काय सांगू त्याचं ? रूप कीं पराक्रम ?

भीष्मः—रूप वर्णन करितात स्त्रियांचं; आणि पुरुषांचा पराक्रमच वर्णन केला जातो. तर त्याचा पराक्रमच सांग.

सूतः—आयुष्मन् !

दुर्योधनः— आर्या–( गीति. )

कवणाची स्तुति करिशी व्यर्थ अशी गर्व-पूर्ण शब्दानें ? ।
अथवा सांग, न मज भय, जरि ये तो मूर्त वायु वेगानें ॥९॥

सूतः—ऐकावं तर महाराजांनीं. त्यानं—

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

मागें टाकूनि अश्वातें । रथांग धरितां करें ।
रथ निश्चल तो झाला । हयग्रीवा पुढारल्या ! ॥ १० ॥

भीष्मः—तर मग आतां आयुधं खालीं ठेऊन द्या.

सर्वः—कां बरं ?

भीष्मः— आर्या–( गीति. )

एकाच बाहुनें जरि थांबविला वेग त्या रथाचा तो ।
तरि समजा भीम–करीं आहे अभिमन्यु पूर्ण रक्षित तो ! ।

याचें कारण असें कीं:—

पूर्वी द्रुपदसुतेतें हरिलें जेव्हां जयद्रथें होतें ॥
तेव्हां पदाति असुनिहि भ्रातांच्या परिच जिंकिलें त्यातें॥ ११॥

द्रोणः—गांगेय बोलले तें अगदीं बरोबर आहे. बाळपणीं माझ्याकडे तो शिकत असल्यापासूनच त्याचा हा वेग मला ठाऊक आहे. कारण शस्त्रशाळेंत एकदां त्यानें—

श्लोक [ वृत्त— वंशस्थ. ]

आकर्ण ओढूनि शरास सोडितां ।
"कांपे तुझें शीर्ष",—म्हणूनि सांगतां ॥
लक्ष्यीं न जों जाउनि बाण पोंचला ।
तों त्यापुढें धांवुनि त्यास गांठिला ॥ १२ ॥

शकुनिः—अहो ! केवढं हास्यास्पद विधान हें !

दिंडी.

काय लोकीं बलवंत दुजा नाहीं ? ।
स्वकीयांचें गुण—कथन जगीं होई ॥
जगत् सारें व्यापिलें पांडवांनीं ।—
काय ऐसें पाहतां लोचनांनीं ? ॥ १३ ॥

भीष्मः—गांधारराज ! हें सर्व अनुमानानेंच मी म्हणत आहें. कारणः—

श्लोक [ वृत्त— व. ति. ]

जातात वीरजन अन्य पहा रणांत ।
घेऊनि अस्त्र, धनु; बैसुनिया रथांत ।
ते दोन,—भीम, बलरामचि—मात्र वीर ॥
युद्धांत ठेविति भुजांवरि सर्व भार ! ॥ १४ ॥

शकुनि—

आर्या—( गीति. )

आम्हां साहसिकांचा आकस्मिक एकटाच मोड करी ।
उत्तर जो-म्हणतिल त्या 'फाल्गुन' ऐसेचि खचित कोणि तरी ?॥१५॥

द्रोण—अहो ! गांधारराज ! या बाबतींतही आपल्याला अद्याप संशय आहे तर ?

श्लोक [ वृत्त– चामर. ]

ओढितांचि जें धनू करी प्रचंड गर्जिता ।
उत्तरास येइ काय तें रणांत खेचतां ? ॥
भानुचा क्षणैक अस्त ताप सर्व वारुनी ।
उत्तराचिये शरींच येइ काय साधुनी? ॥ १६ ॥

भीष्म—( दुर्योधनास ) हे गांधारीपुत्रा ! ही गोष्ट तर आतां अगदीं स्पष्टच होऊन गेली आहे. शिवाय हेंहि पण तुला ठाऊक आहे कीं—

श्लोक [ वृत्त– अनुष्टुप. ]

" धनुष्या कर्षिलें पार्थें " । ज्या-जिव्हा कथिते असें ।
नामाक्षरें बाण-पुंखीं । वीरांची कोरिलीं पहा ॥
शब्दरूपें जणूं त्यांतें । मौर्वी उच्चारिते अहा! ।
या परी कथितांही त्या । कान कोणी न देतसे! ॥ १७ ॥

[ भीष्माचा सूत प्रवेश करितो. ]

सूत—आयुष्मंतांचा विजय असो. शांति करायला पाहिजे आहे.

भीष्म—कशा करितां ?

सूत—

आर्या–( गीति. )

बाणें विद्ध ध्वज तव, म्हणुनी द्रुत शांति पाहिजे केली ।
न कळे कोणाचा शर, पुंखीं नामाक्षरें दिसति लिहिलीं ॥ १८ ॥

भीष्म—आण तो बाण इकडे.

[ सूत बाण जवळ घेऊन येतो. ]

भीष्म—( बाण घेऊन निरखून पाहून ) वत्सा ! गांधारराजा ! वार्द्धक्यामुळं माझी दृष्टी मंद झाली आहे. तर ह्या बाणावरील अक्षरं वाच पाहूं.

शकुनि—( बाण घेऊन वाचून ) अर्जुनाचा. ( असें वाचून बाण टाकतो तो द्रोणाचे पायावर पडतो. )

द्रोणः—( बाण घेऊन ) ये, ये वत्सा !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

मत् शिष्यें टाकिला बाण । भीष्म-पादाभिवंदना ।
क्रमें माझ्या पदीं आला । कराया मज वंदना ॥ १९ ॥



**भीष्मः**—( बाण घेऊन निरखून पाहून) वत्सा ! गांधारराजा ! वार्द्धक्यामुळं माझी दृष्टी मंद झाली आहे. तर ह्या बाणावरील अक्षरं वाच पाहूं. [ पंच० पृ. ५०

**शकुनिः**—अहो! ह्या बाणाच्या पुराव्यावर आपल्याला विश्वासता येत नाहीं. कारणः—

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

योद्धा कुणी अर्जुन नामधारी ।
असेल त्याचा शर नाम—धारी ॥
स्पष्टाक्षरीं ‘ उत्तर’ हें लिहूनी ।—
धाडी, तरी स्पष्टचि ये कळूनी ॥ २० ॥

**दुर्योधनः**— आर्या—( गीति. )

राज्यप्रदानहेतुस्तव जरि हें अनृत वचन निघत असे।
बघतां युधिष्ठिरा मी राज्यार्धा द्यावयास सिद्ध असें ॥ २१ ॥

[ एक भट येतो. ]

**भटः**—महाराजांना विजय असो. विराट—नगराहून एक दूत आला आहे.

**दुर्योधनः**—आंत घेऊन या त्याला.

**भटः**—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

[ नंतर उत्तर प्रवेश करितो. ]

**उत्तरः**— श्लोक [ वृत्त— व. ति. ]

झाला विलंब,—न जरी स्थल दूर, मातें ।
होते महाजव जरी हय ते रथातें ॥
कौंतेय—बाण—हत—हस्ति पडून भू ती ।
झाली असे विषम, अश्व सुखें न जाती! ॥२२ ॥

( पुढें येऊन हात जोडून ) अहो, आचार्य! मी पितामह आदिकरून सर्व राजमंडलाला प्रणाम करीत आहें.

**सर्वः**—आयुष्मान् हो.

**द्रोणः**—विराटेश्वरांचं काय म्हणणं आहे ?

**उत्तरः**— त्यांनीं नाहीं मला पाठविला.

**द्रोणः**—तर मग कोणी पाठविलं तुला ?

**उत्तरः**—आर्य युधिष्ठिरांनीं.

द्रोणः—काय म्हणताहेत धर्मराज ?

उत्तरः—ऐकावं; त्यांचं म्हणणं असं आहे,—

दिंडी.

प्राप्त झाली 'उत्तरा' स्नुषा मातें ।
निमंत्रीतो त्यास्तवचि नृप-गणातें ॥
लग्न व्हावें येथ कीं तेथ याची ।
पाहताहें वाट मी अनुज्ञेची ! ॥ २३ ॥

शकुनिः—तिथं-तिथंच होऊंदे.

द्रोणः—आणि म्हणूनच—

आर्या-( गीति. )

येथें विधि आणितसे, नच सरतां पंचरात्र आम्हांतें ।
धर्मानुसार देणें विहितचि धर्मार्जिता सुभिक्षेतें ! ॥ २४ ॥

दुर्योधनः—ठीक आहे.

श्लोक ( वृत्त- अनुष्टुप. )

पांडवांना दिलें राज्य । प्रतिज्ञा जाहली पुरी ।
नरा मृत्यू जरी येई । सोडीना सत्य तो तरी ! ॥ २५ ॥

द्रोणः- आर्या-[ गीती. ]

सकल प्रसन्न झालों कुलसंग्रह-वर्धनें अहा हा ! या ।
सर्वहि वसुंधरेवर राज्य करो राजसिंह या समया ॥ २६ ॥

[ सर्व जातात. ]

तिसरा अंक समाप्त.

शुभं भूयात्.

पंचरात्र समाप्त.

# ‘प्रतिमा’ नाटकाचें कथासूत्र.

रामायणांतील कथेच्या आधारें लिहिलेलीं भासकवीचीं दोन नाटकेंच आज उपलब्ध आहेत. त्यांपैकीं ‘प्रतिमा’ नाटक हें त्यांतील कथाभागाच्या ओघाकडे लक्ष दिलें असतां पहिलें नाटक होय. या नाटकांत रामायणांतील ‘अयोध्याकांड’ आणि ‘अरण्यकांड’ यांतील कथाभाग ग्रथित केला आहे. यामुळें या नाटकाला भासाचें पूर्वरामायण असें म्हणतां येईल. पण एवढ्यानें कांहीं “पूर्वरामायण” पुरें होत नाहीं. हें पुरें व्हावयाला रामायणांतील बालकांडाचा कथाभाग घेऊन त्यावरहि भासकवीचें एखादें नाटक असावयास पाहिजे होतें. रामकथेवर नाट्यविरचना करण्याचा जो उत्कट उत्साह भासाचे ठिकाणीं दिसून येतो त्यावरून त्यानें श्रीकृष्णकथेवर जसें ‘बालचरित’ नांवाचें एक नाटक लिहिलें आहे, त्याप्रमाणेंच त्यानें श्रीरामकथेवरहि ‘बालकांडा’च्या आधारें एखादें “बालचरित” लिहिलें असण्याचा बराच संभव आहे, आणि असा तर्क करण्यास जागाहि पण आहे. याचें कारण असें कीं, ‘साहित्यदर्पण’ ग्रंथांतील ६ व्या परिच्छेदांतील ८५ व्या कारिकेच्या विवरणांतः—

उत्साहातिशयं वत्स । तव बाल्यंच पश्यतः ।
मम हर्षविषादाभ्यामाक्रान्तं युगपन्मनः ॥

[भावार्थः—हे वत्सा ! हा तुझा मोठा उत्साह आणि हें तुझें बालवय हीं पाहून माझ्या मनांत हर्ष आणि विषाद हे दोन्ही एकाच वेळीं उद्भुत झाले आहेत.] हा श्लोक बालचरितांतील म्हणून उद्धृत केला आहे. पण आज उपलब्ध असलेल्या भासकवीच्या श्रीकृष्णविषयक बालचरित नाटकांत हा श्लोक आढळत नाहीं. साहित्यदर्पणावरील टीकाकार म्हणतात कीं ही परशुरामाची रामचंद्राला उक्ति आहे; यावरून बालकांडांतील कथाभागावर रचिलेल्या बालचरितांतूनच हा उद्धृत केला असावा असें मानल्याशिवाय गत्यतर नाहीं. असें नसतें तर वरील श्लोक साहित्यदर्पणकारांस कोठून उद्धृत करितां आला असता ? भासकवीचें हें श्रीरामविषयक ‘बालचरित’ आज उपलब्ध असतें तर हें बालचरित आणि प्रस्तुतचें प्रतिमा नाटक या दोहोंस मिळून भासकवीचें पूर्वरामायण म्हणून आम्हांस यथार्थ-

पणें म्हणतां आलें असतें. पण आज एक प्रतिमा नाटकच उपलब्ध असल्यामुळें त्यासच आम्हांला पूर्वरामायण म्हणावें लागत आहे. हें पूर्वरामायण तर खरेंच, पण अनुपलब्ध बालचरिताशिवाय ह्याला अपुरें अथवा अपूर्ण पूर्वरामायण असेंच म्हणावें लागेल !

प्रस्तुत नाटकाला दिलेलें "प्रतिमा नाटक" हें नांव वाचून यांत अमूकच कथाभाग अभिप्रेत असावा असें रामायणकथेशीं परिचित असणाऱ्या कोणालाहि सहज अनुमान करतां येण्याजोगें नाहीं. याचें कारण 'प्रतिमा' हें नांव देण्याला अत्यंत उचित आणि समर्पक असा जो प्रसंग भासकवीनें योजिला आहे तो त्यानें आपल्या उज्वल प्रतिभेनें आणि कल्पनाशक्तीनें नवीनच निर्माण केलेला असल्यामुळें मूळ रामायणांत त्याचा कोठेंच ठावठिकाणा नाहीं ! दशरथ महाराजांचें अत्यंत करुण, कठोर, आणि दुःसह निधन ज्या लोकविलक्षण आणि विचित्र घटनेमुळें घडून आलें, ती सर्व घटना आणि तें निधन,—पितृनिधनाची ज्याला यत्किंचित् वार्ताहि नाहीं अशा मातुल—गृहाहून अयोध्येला परत येत असणाऱ्या कुमार भरताला—कोणाच्या तरी तोंडून रोकठोक मार्गानें न कळवितां तें त्याला-पर्यायानें आणि अत्यंत कुशलतेनें कळविण्याकरितां कवीनें दुसऱ्या तीन पाषाण—प्रतिमांच्या बरोबर दशरथ महाराजांचीहि एक पाषाण—प्रतिमा अयोध्यानगरा बाहेर असणाऱ्या एका प्रतिमागृहांत स्थापून तेथें कुमार भरताला अगदीं अचानकपणें आणून सोडलें आहे; आणि माता कैकेयीच्या राज्यलोभामुळें कसकसे प्रकार घडून आले याचा तेथें मोठ्या चातुर्यानें हळूहळू स्फोट केला आहे. ह्या नाटकाच्या तिसऱ्या अंकाचें जें कथासूत्र पुढें दिलें आहे त्यांत हा प्रसंग थोडा विस्तारानें दिला आहे; तो वाचून पाहिला म्हणजे प्रस्तुत नाटकाला प्रतिमा हें नांव किती यथार्थपणें शोभतें हें वाचकांना सहज कळून येईल. भासानें आपल्या ह्या नाटकाला हें नांव देऊन, ह्या नांवाभोंवती एक अद्भुत—रम्य असें ऐंद्रजालिकच निर्माण केलें आहे, असें वाटून वाचकांना कवीविषयीं साहजिकपणेंच अत्यंत प्रेम आणि आदर हींच उत्पन्न होतील. भासानें आपल्या बहुतेक नाटकांना अशीच चमत्कृतिजनक व कुतूहलोत्पादक नांवेंच दिलेलीं दिसून येतात. पण यासंबंधाचा विचार येथें करण्याचें प्रयोजन नसल्यामुळें हा विषय आम्हीं येथेंच ठेवून देतो.

## प्रतिमा.

प्रतिमानाटकांत एकंदर ७ अंक आहेत. आणि यांत रामाला राज्याभिषेक होण्याचें अगदीं ठरलेलें असतांना त्याच्यावर हरताळ पडून रामाला राज्यास मुकून एकदम कसें वनवासाला जावें लागलें, त्यामुळें दशरथ महाराजांचें कसें करुणान्त निधन झालें, त्यामुळें कुमार भरताच्या कोमल मनोवृत्ती कशा दुखवल्या गेल्या, प्रत्यक्ष स्वतःच्या मातेसंबंधानेंहि त्याला कसा तिटकारा वाटला व त्याचें पुढें कसें निराकरण झालें, रामाची भेट घेतल्यावर त्याला राज्यभार कसा स्वीकारावा लागला व १४ वर्षेपर्यंत त्यानें तो केवळ रामाचा प्रतिनिधि म्हणून कसा वाहिला, आणि शेवटीं १४ वर्षांनंतर राम विजयी होऊन परत आल्यानंतर त्यांस राज्याभिषेक करवून त्यानें तो त्यांच्या हातीं कसा टाकिला इत्यादि कथाभाग फार मनोरंजकपणें गुंफिला गेला आहे. तो कसा गुंफला गेला आहे तेंच आतां अंकवार कथासूत्र देऊन सांगण्याचें आम्हीं योजिलें आहे. अशा प्रकारें कथासूत्र देण्यांत आमचा उद्देश एवढाच कीं मूळ कवीच्या नाटकाचें भाषांतर वाचीत असतां तें समजण्यास फारशी अडचण पडूं नये.

प्रतिमानाटकाच्या आरंभीं नांदी झाल्यावर सूत्रधार नटीला उद्देशून शरत्कालाला अनुसरून गायन करण्यास सांगतो. नटी गीत म्हणण्यास आरंभ करितें तोंच पडद्यांतून " आर्य ! आर्य ! " म्हणून कोणी हांक मारीत असल्याचें ऐकूं आलें. त्याबरोबर सूत्रधारानें पाहिलें तों ती दशरथ महाराजांच्याकडून आलेली प्रतिहारी मोठ्या लगबगीनें राजवाड्यांत इकडून तिकडे धांवत असल्याचें त्याच्या दृष्टीस पडलें. अशा प्रकारें प्रतिहारीला रंगभूमीवर आणून सूत्रधार नटीसह पडद्या आड गेला. प्रतिहारीनें दशरथ राजाच्या कांचुकीयाला हांक मारून त्याला रामाच्या अभिषेकास लागणारें सर्व साहित्य तयार ठेवण्याविषयीं दशरथ महाराजांची आज्ञा सांगितली. कांचुकीयानें सर्व सिद्धता आहे, वेदीवर भगवान् वसिष्ठ ऋषि सर्व सिद्धता करून तिष्ठत उभे आहेत, आणि सारे पौरजन व अमात्य वगैरेहि तेथें जमले आहेत, असें सांगितलें. हें ऐकून प्रतिहारी सर्व सिद्धता असल्याची वर्दी द्यावयाला महाराजांच्याकडे निघून गेली, व कांचुकीयहि घाई घाईनें सर्व तयारी नीट झाली आहे कीं नाहीं तें पाहण्याकरितां निघून गेला.

याच वेळीं रामचंद्र रहात होते त्या राजमंदिरांत निराळाच प्रकार चालला होता. देवी सीतेची अवदातिका नांवाची एक दासी हंसत हंसत तेथें आली. तिच्या हातांत वल्कलें होतीं. हीं तिनें महाराजांच्या रंगशाळेवर आर्यरेवा म्हणून एक ' नेपथ्यपालिका ' होती तिचा डोळा चुकवून उचलून आणली होती. आर्यरेवेकडे अवदातिकेनें अशोक पल्लवांची एक डहाळी मागितली होती. ती तिनें न दिल्यामुळें अवदातिकेनें तिच्यावर उट्टें काढण्याकरितां तिची ही कुचेष्टा केली होती. देवी सीता आपल्या परिवारांतील दासीसह तेथें आली, आणि तिनें अवदातिकेला हंसण्याचें कारण विचारिलें. तेव्हां वल्कलें चोरून आणल्याची गोष्ट सहजच उघडकीला आली. सीतेनें तीं वल्कलें परत नेऊन देण्याविषयीं अवदातिकेला सांगितलें. अवदातिका तीं परत करण्यास निघाली देखील, इतक्यांत सीतादेवीला काय वाटलें कोणास ठाऊक ! तिनें अवदातिकेला परत बोलाविलें, आणि म्हटलें:—" हीं मी परिधान केलीं तर मला कशीं काय दिसतील बरं ? " त्यावर उत्तरादाखल अवदातिका म्हणाली—" जातीच्या सुंदरांना कांहीही शोभतें !" सीतादेवीनें कौतुकानें तीं वल्कलें घेतलीं आणि परिधान केलीं; आणि जवळच्या एका दासीला आरसा घेऊन येण्याला सांगितलें. ती आरसा आणण्यास गेली तोंच दुसरी एक दासी कुमार रामचंद्राना राज्याभिषेक करण्याचें ठरलें असल्याची आनंदाची बातमी घेऊन आली. ही आनंदाची बातमी ऐकून तिनें आपल्या अंगावरील अलंकार उतरून ही बातमी आणणाऱ्या दासीला दिले ! इतक्यांत नगाराही झडूं लागला. पण तो एकदम बंद झाला ! हा काय प्रकार आहे हें कोणालाच कांहीं उमगेना. इतक्यांत कुमार रामचंद्र तेथें आले व त्यांनीं आपल्यास राज्याभिषेक होण्याची सर्व सिद्धता झाली असतां, दशरथ महाराजांच्या कानाशीं मंथरा लागल्यामुळें तो बेत एकदम कसा फिसकटला तें सीतेला सांगितलें. तें ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. पण कुमार रामचंद्रानीं जेव्हां सांगितलें कीं आपल्याला राज्याभिषेक करून दशरथ महाराजांचा मनोदय तपोवनाला जाण्याचा होता, तेव्हां सीता देवीला रामाचा अभिषेक रहित झाला आणि महाराजांचें तपोवनाला जाण्याचेंहि थांबलें हें पाहून एकापरीनें आनंदच झाला. सीतेनें वल्कल नेसल्याचें व अंगावरील अलंकारहि काढल्याचें पाहून रामानीं तिला

तसें करण्याचें कारण विचारिलें. तेथें जवळच असलेल्या अवदातिकेनें सांगितलें कीं—"हीं वल्कलं आपल्याला कशीं काय दिसतात तें पहावें एवढ्याच करितां देवीनें तीं परिधान केलीं आहेत." तेथें दुसरें आणखीहि एक वल्कल पडलें होतें. तें परिधान करून पाहण्याची रामानें आपली इच्छा दर्शविली. पण सीतेनें त्यास तें अशुभ म्हणून घेऊं दिलें नाहीं. इतक्यांत कांचुकीय दशरथ महाराज मूर्च्छा येऊन पडल्याची बातमी घेऊन आला. व त्या मूर्च्छनेचें कारण राणी कैकेयी असल्याचें त्यानें सांगितलें. भरताला राज्याभिषेक करण्याचा तिनें आग्रह धरल्यामुळे हा सारा प्रकार ओढवला, हें सांगून तो तिची निंदा करूं लागला. रामाच्यानें ही निंदा ऐकवेना. इतक्यांत हें सारें वृत्त कुमार लक्ष्मणाला कळून तो अत्यंत क्रुद्ध होऊन धनुर्बाण सज्ज करून जगांतील सर्व स्त्रियांचा संहार करण्यास उद्युक्त होऊन तेथें आला ! रामाला वाटलें कीं, आपला अभिषेक रहित होऊन तो भरताला होत आहे यामुळेंच लक्ष्मण क्रुद्ध झाला आहे. पण लक्ष्मणाच्या क्रोधाचें कारण हें नसून कैकेयीनें रामाला १४ वर्षे वनवासाला धाडून देण्याचें वचन घेतलें हें होतें. रामाला हें कळून आलें. आणि दशरथ महाराजांना मूर्च्छा येण्याचें कारणहि हेंच होय, हेंहि पण मग रामाच्या लक्षांत आलें. तेव्हां रामचंद्रानीं सीतेजवळ तत्काळ वल्कल मागितलें. आणि सीतेनेंहि पण तें तत्काळ दिलें. रामाचा वनांत जाण्याचा निश्चय झाला होता. सीता देवीनेंहि रामाबरोबर वनांत जाण्याचा हट्ट धरिला. रामानें पुष्कळ प्रकारें तिचें निवारण करण्याचा प्रयत्न केला. पण ती ऐकेना. हें पाहून त्यानें तिची समजूत घालावयाला लक्ष्मणास सांगितलें. पण ती गोष्ट अशक्य कोटींतील दिसल्यामुळें लक्ष्मणानें तिला त्यापासून परावृत्त न करितां उलट तोच रामाबरोबर त्याची सेवा करण्या-करितां वनास जाण्याला उद्युक्त झाला. रामाला त्या दोघांना त्यांच्या निश्चयापासून परावृत्त करितां आलें नाहीं. इतक्यांत आर्यरेवेकडून नवीं वल्कलें घेऊन एक दासी आली, तिनें असा निरोप आणिला कीः— "अवदातिकेनें संगीत शालेंतून उचलून आणलेलीं वल्कलें जुनीं असून दुस-ऱ्यांनीं वापरलेलीं आहेत. म्हणून आतां ही अगदीं नवीन धाडलीं आहेत, यांनीं आपलें काम करून घ्यावें." याचवेळीं अशा अकल्पित रीतीनें तीं वल्कलें आलेलीं पाहून त्या सर्वांनीं तीं धारण केलीं आणि तीं तिघेंहि वनवासाला जावयास निघालीं. ही बातमी हां हां म्हणतां सगळ्या पौरजनांना कळली

आणि त्यांनीं सारे राजमार्ग एकच गर्दी करून अडवून टाकले. लक्ष्मण ही गर्दी दूर करीत पुढें चालला होता व त्याचे मागून राम आणि सीता हीं दोघेंहि चाललीं होतीं. इतक्यांत दशरथ महाराजांचा कांचुकीय तेथें आला आणि त्यानें कुमारांना—"जाऊं नका, महाराजच इकडे येत आहेत," असें सांगितलें. पण रामलक्ष्मण हा प्रसंग टाळून सीतेसह वनवासाला निघून गेले ! [पहिल्या अंकांत येथवर कथाभाग आला आहे.]

राम लक्ष्मण जानकीसह वनाला गेल्यामुळें दशरथ महाराज अत्यंत शोकविव्हल झाले! त्यांचें मस्तक फिरून जाऊन ते त्या उन्मादावस्थेंत वेड्यासारखे प्रलाप करूं लागले. मधून मधून ते उठून त्या तीघांच्यीं नांवें घेऊन त्यांना हांका मारीत. कोणीच प्रत्युत्तर देत नाहींसें पाहून 'हाय हाय !' म्हणून मोठ्यानें आक्रोश करीत, आणि मग ज्या मार्गानें ते निघून गेले होते त्या मार्गाकडे डोळे लावून एकसारखे पहात बसत ! महाराजांची ही अशी अवस्था पाहून देवी कौसल्या आणि सुमित्रा यांचा धीर सुटून त्या जलमंदिरांत महाराजांच्या सेवेला सदासर्वदा दक्ष राहूं लागल्या. ते एखादवेळ शुद्धींत असत; पण बहुतेक गैरशुद्धींतच ! जवळ असलेलें माणूसहि त्यांना ओळखूं येईनासें झालें. एकदां खुद्द कौसल्याच "राम लौकरच येऊन महाराजांना भेटतील," असें त्यांचें सांत्वन करण्याकरितां म्हणाली. तेव्हां तिला दशरथानें "तूं कोण?" म्हणून विचारिलें! अशाप्रकारें त्यांचा पुत्रशोक दिवसेंदिवस वाढतच चालला. राम, लक्ष्मण आणि सीता यांच्या स्मृतिशिवाय त्यांना दुसरा विषयच नव्हता. सदासर्वदा एकच ध्यास. रामाला वनांत पोंचवून सुमंत्र परत आल्याची वर्दी कांचुकीयानें महाराजांस दिली. तेव्हां महाराजांनीं विचारिलें:—"ते रामाला घेऊन आले काय ? कांचुकीय म्हणाला,—"नाहीं, रथ घेऊन आले आहेत." हें ऐकून दशरथ उद्गारला:—"तर मग प्रत्यक्ष काळानेंच ह्या दशरथाला नेण्याकरितां हा रिकामा रथ पाठविला आहे !" असें म्हणून ते पुन्हां दारुण शोक करूं लागले ! मधून मधून ते सुमंत्रास कांहीं प्रश्न करीत, या शोकभरांत त्यांनीं सुमंत्राला विचारिलें कीं, "तुम्हीं त्यांना वनांत सोडून परत येत असतां त्यांनीं तुमच्या बरोबर मला कांहीं निरोप धाडला आहे का ?" त्यावर सुमंत्र म्हणाला:—"ते कांहीं तरी निरोप सांगणार होते असें दिसलें पण त्यांचा कंठ आणि डोळे भरून आल्यामुळें त्यांच्याकडून कांहींच बोलवलें नाहीं आणि ते कांहींएक न बोलतां तसेच तडक वनाकडे निघून गेले !"

सुमंत्राचे हे शब्द ऐकून महाराजांना अधिक बलवत्तर मुर्च्छा आली. कौसल्या जवळच होती. ती त्यांना सावध करूं लागली, तेव्हां ते थोडे शुद्धीवर आले आणि त्यांनीं सुमंत्राकडे कैकेयीला सांगण्याकरितां निरोप सांगितला तो असाः—"राम वनाला गेल्यामुळें तुझी आवडती गोष्ट घडून आली. आतां माझे प्राणहि मला सोडून चालले आहेत. तर आतां तूं भरताला आणून अभिषिक कर !" दशरथांनीं एवढा निरोप सांगितला आणि एकदम वर आकाशाकडे दृष्टि लावली. तों त्यांस त्यांचे स्वर्गीय पितर अंतरिक्षांत आले असल्याचा भास झाला, म्हणून त्यांनीं पाणी मागितलें. कांचुकीयानें पाणी देतांच महाराजांनीं तें घेऊन आचमन केलें, आणि दिलीप, रघु, व अज यांचीं नांवें घेऊन ते म्हणाले:—"मला आतां तुमचा सहवास घडो!" असें म्हणून त्यांनीं—"रामा! वैदेहि! लक्ष्मणा! अशा हांका मारून,—" हा मी पितरांच्या संन्निध चाललों!" असें त्यांस सांगितलें आणि लागलीच पुन्हां एकदम भयंकर मूर्च्छा येऊन पडले ! ही त्यांची अखेरचीच मूर्च्छा होती ! [ येथें दुसरा अंक संपतो. ]

राम वनवासाला निघून गेले होते, भरत, शत्रुघ्न आपल्या मातुलगृहीं होते, अशा वेळीं दशरथ महाराजांनीं आपला देह ठेविला. तेव्हां अर्थात् भरताला अत्यंत तांतडीनें आणविल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. सूताला बरोबर देऊन त्याला घेऊन येण्याकरितां रथ गेला व त्यांतून तो परत आला. सूताकडून महाराज फार अस्वस्थ आहेत एवढेंच भरताला कळलें होतें. कारण सूताला तरी घडलेला सारा प्रकार सांगण्याचा धीर कसा होणार ? भरताचा रथ अयोध्येच्या जवळ येऊन ठेपला. वडिलांचें दर्शन घेण्यास तो फार उत्सुक झाला होता. तो आपल्या मनाशीं भावी भेटीची मोठी रमणीय चित्रें चितारीत होता ! इतक्यांत राजोपाध्यांच्या कडून निरोप घेऊन एक सेवक आला. त्यानें सांगितलें कीं, "आणखी एका घटकेनें कृत्तिका संपून रोहिणी नक्षत्र लागतें. तें लागल्यावर कुमारांनीं नगरप्रवेश करावा," असें उपाध्यायांचें सांगणें आहे. भरतानें त्याला 'ठीक आहे' म्हणून सांगून क्षणैक विश्रांति घेण्याचें मनांत योजिलें. तो सभोंवतीं निरखून पाहूं लागला, तों जवळच झाडीमध्यें एक मंदिर असल्याचें त्याला दिसलें. त्यानें सूताला रथ थांबवून घोड्यांना थोडी विश्रांति देण्यास सांगितलें

आणि स्वतः तो त्या मंदिराकडे वळला. तों त्याला तें मंदिर शृंगारल्याचें व तेथील दैवतांची नुकतीच पूजा-अर्चा झाल्याचें दिसून आलें. देवदर्शन घेऊन मग विश्रांति घ्यावी म्हणून तो मंदिरांत शिरला. तों त्याला एका सुंदर चौथऱ्यावर पाषाणाच्या चार प्रतिमा उभ्या असलेल्या दिसल्या. त्या मूर्ति भव्य आणि रमणीय होत्या. त्या बनविण्यांत मूर्तिकारांचें अपूर्व कौशल्य प्रकट झालें होतें. त्या कोणा देवतांच्या मूर्ति नसून मानुषी मूर्ती असाव्यात अशी त्याची कल्पना झाली; तरी देखील त्यांना देवतांसमान मानून त्यांना प्रणाम करावयाला तो उद्युक्त झाला. इतक्यांत त्या देवळाचा गुरव–देवकुलिक–तेथें आला आणि त्यानें भरताला:—“ ह्या प्रतिमा क्षत्रियांच्या आहेत, ह्यांना प्रणाम करूं नका, ” म्हणून सांगितलें. तेव्हां भरतानें त्या प्रतिमा कोणाच्या आहेत ?– म्हणून त्यास विचारलें. देवकुलिकानें त्या प्रतिमा इक्ष्वाकुकुलांतील राजांच्या असल्याचें सांगितलें. तें ऐकून भरताला फार आनंद झाला. एकेका प्रतिमेकडे बोट करून “हो कोणाची प्रतिमा?” म्हणून तो त्या देवकुलिकाला विचारी आणि देवकुलिक ती अमक्याची प्रतिमा म्हणून त्याला सांगे. दिलीप, रघू, आणि अज अशीं पहिल्या तीन प्रतिमांचीं नांवें त्याला देवकुलिकाकडून समजलीं. चवथ्या प्रतिमेंत त्याला दशरथ महाराजांचें सादृश्य दिसलें, म्हणून–“ही कोणाची ?” असा प्रश्न करण्यास त्याला धीर होईना! या वेळीं त्याच्या मनांत अनेक विचारांचें भयंकर काहूर माजून राहिलें होतें ! त्याची चित्तवृत्ती गोंधळून गेली होती. भरत त्या देवकुलिकाला पुनः पुनः त्या तीन प्रतिमांचीं नांवें विचारी. पण चवथ्या प्रतिमेपर्यंत आला म्हणजे तो थांबे ! ‘ दशरथ महाराजांची मूर्ती इथें कां ’?–हें त्याला विचारवेना ! पण शेवटीं धीर करून तो त्याला म्हणालाः–“ जिवंत असलेल्यांच्या सुद्धां प्रतिमा स्थापन करितात काय ? ” देवकुलिक उत्तरादाखल म्हणालाः—“ छेः फक्त मृतांच्या तेवढ्याच ! ” देवकुलिकाचे हे शब्द ऐकतांच–“ हा तात ! हा तात ! ” म्हणून भरत तेथेंच एकदम मूर्च्छित होऊन पडला ! पण थोड्याच वेळांत तो शुद्धीवर आला आणि देवकुलिकाला प्रश्नावर प्रश्न विचारून त्याच्याकडून त्यानें सर्व इत्थंभूत हकीगत काढून घेतली. तो भरत असल्याचें देवकुलिकाला अगदीं शेवटीं समजलें. तेव्हां तो तेथून कसा तरी पाय काढूं पहात होता. ती हृदयविदारण करणारी हकीगत ऐकून भरताला पुन्हा मूर्च्छा आली आणि तो तेथेंच जमि-

नीवर पडला. इतक्यांत सुमंत्र तीघींहि राण्यांसह तेथें येऊन पोंचला. तों भरत तेथें मूर्च्छित पडलेला पाहून सगळ्यांच्याच काळजांत धस्स झालें! पण थोड्याच वेळांत भरत सावध झाला आणि सुमंत्रांस म्हणाला. " आपण सुमंत्रच नव्हे का ? " नतर जवळ उभ्या असणाऱ्या कौसल्येला आणि सुमित्रेला त्यानें नमस्कार केले आणि माता कैकेयीला पाहून तो एकदम क्रुद्ध होऊन म्हणाला—"हे पापिणी ! ह्या गंगायमुनामध्यें तूं एखाद्या कुनदी सारखी घुसली आहेस ! या साऱ्या अनर्थाला तूं कारण झाली आहेस ! " सुमंत्रांनीं व कौसल्यादि मातांनीं परोपरीनें त्याचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला पण तो व्यर्थ झाला. सुमंत्रांनीं अभिषेकाची तयारी केली असल्याचें भरताला सुचविलें. त्यावर भरतानें उत्तर दिलें—" तो आतां आमच्या ह्या मातांश्रींना करा ! " असें उत्तर देऊन,—" यापुढें जेथें राम असेल तेथें मी जाणार; जेथें राम नाहीं ती अयोध्या नव्हे ! जेथें राम राहत असतील ती खरी अयोध्या ! " असें म्हणून भरत एकदम निघून गेला. [ येथें तिसरा अंक संपतो. ]

भरत सुमंत्राना बरोबर घेऊन रथांत बसून जो निघाला तो त्यानें थेट राम रहात असलेल्या तपोवनाची वाट धरली. ते रामाश्रमाच्या अगदीं समीप येऊन पोंचले. भरतानें सूताला रथ थांबवावयास सांगून घोड्यांना सोडून विश्रांति देण्यास सांगितलें,आणि आपण आल्याचें रामाला कळविण्या-विषयीं सुमंत्रांना विनंति केली. सुमंत्रांनीं त्याला विचारिलें:—" काय म्हणून कळवूं ? " भरतानें सांगितलें कीं:—" राज्यलुब्ध कैकयीचा पुत्र भरत आला आहे, म्हणून सांगा ! " सुमंत्राच्या हातून हें सांगवेना. तेव्हां भरत स्वतःच पुढें झाला आणि मोठ्यानें म्हणाला: —" पितृवचन-तत्पर अशा आर्य राघवांना भेटण्याकरितां एक कृतघ्न आणि निर्दय आला आहे; त्यानं थांबावं कीं निघून जावं ? " आश्रमाचे आंत राम, लक्ष्मण, व सीता हीं तीघेंहि बसलीं होतीं. त्या सर्वांना हे शद्ब स्पष्ट ऐकूं आले. राम त्यांना म्हणाले:—" हा मेघगंभीर ध्वनि तातांच्या आवाजासारखा दिसतो. हा माझ्या बंधूचाच तर नसेल ! लक्ष्मणालाहि तसेंच वाटलें. रामानें कोण आहे तें पाहून येण्यास लक्ष्मणास सांगितलें. तो बाहेर येतो तों भरताला पाहून त्याला क्षणैक रामाचाच भास झाला ! भरताजवळ सुमंत्र होते. त्यांना लक्ष्मणानें तत्काळ ओळखलें व नमस्कार केला. सुमंत्रानें कुमार भरत

आला असल्याचें त्याला सांगितलें. भरतानें लक्ष्मणास नमस्कार केला व त्यानेंहि त्याला आशीर्वाद दिला. नंतर भरतानें रामदर्शना-करितां आपण अत्यंत अधीर झालों असल्याचें सांगितलें. तेव्हां लक्ष्मण भरत आल्याचें रामाला कळविण्याकरितां आंत गेला. भरत आल्याचें ऐकून राम आणि सीता दोघेंहि आश्चर्यचकित झालीं. राम भ्रातृस्नेहानें आर्द्र झाला आणि त्यानें " भरताला सत्कारपूर्वक आंत घेऊन ये," म्हणून लक्ष्मणाला सांगितलें. पण पुन्हा रामास काय वाटलें कोणास ठावूक ? त्यानें लक्ष्मणाला थांबवून म्हटलें,—" हर्षाश्रू ढाळणाऱ्या ह्या देवीलाच जाऊन कुमारास इकडे घेऊन येऊं दे."रामाच्या आज्ञेनुसार सीता भरताला आणण्याकरितां आश्रमा-बाहेर आली. भरत रामामध्यें पुष्कळसें रूपसादृश्य असल्यामुळें सीता क्षणैक फसली. ती संशयांत पडली कीं आर्यपुत्र राम इतक्यांत आश्रमा बाहेर कसे आले ! भरतानें सीतेला ओळखून,स्वतःचा नामोच्चार करून तिला नमस्कार केला. तेव्हां तिनें त्याला आशीर्वाद दिला.पण यावेळीं तिला त्याचा आवाजहि थेट रामाच्याच आवाजासारखा असल्याचें आढळून आलें. ती त्याला आंत रामाकडे घेऊन गेली. रामाची व भरताची भेट झाली. हा भरतभेटीचा प्रसंग अत्यंत हृदयद्रावक होता ! भरताचे मागून पाठोपाठ सुमंत्रहि आंत आले. ते अभिषेकाची सर्व सामुग्री घेऊन आले होते. भरतानें रामाला अभिषेक करून घेऊन परत अयोध्येला येण्याविषयीं अत्यंत आग्रहाची विनंति केली. पण रामानें—" आपणांस पितृवचन मोडतां येत नाहीं, " म्हणून सांगून भरताची अनेक प्रकारें समजूत करून त्याच्यावर सारा राज्यभार सोंपविला. भरतानें तो १४ वर्षें संपेपर्यंत वाहण्याचें कबूल केलें. आणि रामाकडे त्यानें त्यांच्या पायांतील पादुकांची मागणी केली. रामानेंही ती मान्य केली. पादुका हातीं पडतांच भरत म्हणाला—" आतां १४ वर्षेंपर्यंत मी या पादुकांचाच दास होऊन राहीन. या पादुकांनाच आतां राज्याभिषेक करावा ! " भरताची ही अत्यंत प्रेमळ आणि कळकळीची उत्कट इच्छा पाहून रामालाहि नको म्हणवेना. त्यांनीं भरताचें प्रिय करण्याविषयीं सुमं-त्रांना सांगितलें. पादुकाभिषेक झाल्या नंतर रामानीं कुमार भरताला राज्यभार स्वीकारण्याकरितां तावडतोब अयोध्येला जावयास सांगितलें. सीतादेवीच्या मनांतून भरतानें कांहीं काळ तेथें रहावें असें होतें. पण राम म्हणालेः— " स्नेहांत गुंतून राहण्याची ही वेळ नव्हे. " भरत रामाज्ञेनुसार जावयास

सिद्ध झाला. कुमार भरताचें महाराजांच्या प्रमाणेंच पालन करावें म्हणून रामानें सुमंत्रांना सांगितलें. राम—लक्ष्मण आणि सीता यांच्यासह आश्रमाच्या द्वारापर्यंत भरताला पोंचवावयास गेले. भरत आणि सुमंत्र रथावर चढले आणि सूतानें रथ हांकला. [ येथें चवथा अंक संपतो.]

भरत रामाला भेटून परत अयोध्येकडे गेल्याला बराच काळ लोटला होता. राम आतां पंचवटींत येऊन आश्रम बांधून राहिले होते. एके दिवशीं लक्ष्मण कोठें बाहेर गेला होता. राम आणि सीता दोघेच आश्रमांत होतीं. राम सचिंत दिसलेले पाहून सीतेनें चिंतेचें कारण काय म्हणून विचारिलें. तेव्हां रामानीं—" उद्ईक वडिलांची श्राद्धतिथि आहे, तेव्हां ती कशी पार पाडावयाची या विवंचनेंत आपण आहों, " असें तिला सांगितलें. इतक्यांत संन्यास-वेषधारी रावण तेथें आला. रामानें त्याचें स्वागत केलें. पुढें रामानें त्याच्यापाशीं श्राद्धाची गोष्ट काढली. तेव्हां रावणानें सांगितलें—"हिमवत् पर्वतावर राहणारें कांचनपार्श्व मृग श्राद्धाला फार श्रेयस्कर. वैखानस, वालखिल्यादि महर्षि इच्छामात्रें करून ह्यांनाच जवळ करून, त्यांच्या वधानें श्राद्ध करितात; आणि तीं पितरांना अत्यंत प्रिय होतात." असें म्हणून रावणानें आपल्या राक्षसी मायेनें एक मायामृग उत्पन्न केला. तो मृग सोन्याच्या पाठीचा होता. तो मृग रामाला दाखवून, तो कांचनपार्श्व असल्याचें रावणानें त्याला सांगितलें. राम धनुष्यबाण सज्ज करून त्याच्या मागें धांवला. इकडे राम गेला असें पाहून रावणानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें, आणि सीता—"आर्य पुत्र ! रक्षण करा, रक्षण करा ! " म्हणून आरडत असतां तिला उचलून नेलें ! जातांना तपोवनांत असणाऱ्या तपस्व्यांना त्यानें ओरडून सांगितलें कीं:—मी हा रावण सीतेला बलात्कारानें घेऊन जात आहे, रामाच्या ठिकाणीं क्षात्रतेज आणि पराक्रम असेल तर त्यानें तिला सोडवून न्यावी ! " " जटायू " नांवाचा एक महान्पक्षी एका वृक्षावर बसला होता. तो दशरथाचा मित्र होता. हा प्रकार पाहून तो प्रचंडचंचू असलेला जटायू रावणावर तुटून पडला. रावणहि त्याच्या नाशार्थ उद्युक्त झाला. [ येथें पांचवा अंक संपतो. ]

रावणानें उच्चारलेले हे शब्द त्या तपोवनांतील दोघां तापसांनीं ऐकिले, रावण सीतेला उचलून नेत असतां तिची चाललेली धडपडहि त्यांनीं पाहिली, आणि याच वेळीं रावणावर धांवून जाणारा जटायू रावणाच्या प्रहारानें कसा पडला हेंहि दृश्य त्यांनीं अवलोकन केलें; आणि मग ते दोघे हें

सारें वृत्त रामाला कळविण्याकरितां निघून गेले. इकडे अयोध्येंत रावणानें सीतेला हरण करून नेल्याचें वृत्त कोणाला ठावूक नव्हतें. पंचवटींतील तपोवनांत राहणाऱ्या रामादिकांच्या समाचाराकरितां कुमार भरत सुमंत्राना मधून मधून पाठवीत असे. त्याप्रमाणें पंचवटींतून नुकत्याच परत आलेल्या सुमंत्रा कडून भरताला जेव्हां ही सीताहरणाची हृदयद्रावक वार्ता कळली तेव्हां तो एकदम मूर्च्छित होऊन पडला! शुद्धीवर येतांच तो सुमंत्रांना घेऊन तडक कैकेयीच्या महालाकडे गेला. त्याला पाहून कैकेयी म्हणाली:-"बाळा! विजया सांगत होती कीं रामा कडून सुमंत्र आले आहेत म्हणून!" भरत उपरोधिकपणें म्हणाला:—"होः! पण ह्याहिपेक्षां अधिक आनंदाची बातमी मी देवींच्याकरितां आणली आहे!" भरताच्या ह्या बोलण्यांतील खोंच कैकेयीला समजली नाहीं. ती त्याला म्हणाली:—"तर मग देवी कौसल्या आणि सुमित्रा ह्यांनाहि बोलवूं कां इथंच?" यावर भरत म्हणाला:—"त्या दोघींना ऐकण्याजोगी नाहीं ती!" भरताचे हे शब्द ऐकून कैकेयी मनांत चपापली आणि म्हणाली:—"सांग, सांग बाबा! अशी कोणची बातमी-" भरत म्हणाला:—"ऐक. ज्याला तुझ्या आज्ञेमुळें स्वराज्याला मुकून वनवास स्वीकारावा लागला, त्याच्या बायकोचा अपहार झाला आहे, आणि त्याबरोबर तुझा मनोरथहि पण सफल झाला आहे! तुझ्यासारख्या वधूमुळंच इक्ष्वाकुकुळांतील कुलजांच्या नशीबीं हा वधूहरणाचा प्रसंग आला!" भरताचे हे शब्द कैकेयीच्या काळजाला शल्यासारखे टोंचले. ती म्हणाली:—महाराजांना शाप झाला होता, ही गोष्ट तुला माहीत नाहीं म्हणून तूं असें बोलतोस." कैकेयीचे हे शब्द ऐकून भरत आश्चर्यचकित झाला! कैकेयीनें शापासंबंधीं साद्यंत हकीकत भरताला सांगण्याविषयीं सुमंत्रास सांगितलें. सुमंत्रानें दशरथ महाराजांच्या कडून कुमार श्रावणाचा चुकून कसा वध झाला, व त्या कुमाराच्या वृद्ध पित्यांनीं त्याला कसा शाप दिला ती सर्व हकीकत साद्यंत सांगितली. त्या वृद्ध मुनींचें शापवचन हें होतें:—"पुत्रशोकें मला आला। मृत्यू येवो तसा तुला!" हें शापवचन ऐकून भरताला गहिंवर आला. तेव्हां कैकेयी म्हणाली:-"महर्षींचा शाप टाळतां येणं शक्य नव्हतं म्हणून मी हें केलं. राज्यलोभानं केलं नाहीं." यावर भरतानें दुसऱ्याहि अनेक शंका काढल्या. त्यावर कैकेयीनें त्याचें समाधान केलें. तें ऐकून आपल्या आईकडे कांहीं एक अपराध नाहीं अशी भर-

ताची खात्री झाली आणि त्यानें झाल्या अपराधाबद्दल तिची क्षमा मागितली. नंतर तो तिची अनुज्ञा घेऊन रामाचे साहाय्यार्थ जावयास निघाला. इतक्यांत हें वृत्त ऐकून कौसल्या देवी मूर्च्छित झाल्याची बातमी आली. त्याबरोबर तीं सर्वजण कौसल्येच्या मंदिराकडे एकदम निघून गेलीं. ( येथें सहावा अंक संपतो. )

सुग्रीव हनुमानादि वानरवीरांच्या साहाय्यानें रामचंद्र रावणावर विजय मिळवून, सीतादेवीची मुक्तता करून, आणि लंकेच्या सिंहासनावर बिभीषणाची स्थापना करून अयोध्येला येण्याकरितां परत फिरले होते. वाटेंत ते जनस्थानांत तेथील तपोवनांतील तपस्वीजनांचें दर्शन घेण्याकरितां म्हणून उतरले होते. रामचंद्र सीतेला पूर्वपरिचयाचीं स्थळें आणि वस्तू दाखवून त्यांची आठवण आहे काय—म्हणून तिला विचारीत होते. अशा वेळीं कुमार भरत आपल्या तिन्हीहि माता, पुरोहित आणि प्रजाजन यांसह मोठें चतुरंगबल घेऊन आल्याची बातमी लक्ष्मणानें रामास कळविली. ही बातमी ऐकून तीं दोघेंहि फार आनंदित झालीं. भरतहि लागलाच पाठोपाठ आपल्या मातांसह रामासन्निध येऊन पोंचला. त्यांस पाहतांच रामानें त्या सर्वांस प्रणाम केले आणि त्यांनींहि त्याला मंगलप्रद आशीर्वाद दिले; देवी सीता आणि लक्ष्मण यांनींहि साऱ्या गुरुजनांस वंदन केलें. अशा प्रकारें सर्वांच्या भेटी झाल्यावर भरतानें रामाला राज्यभार स्वीकारण्याविषयीं विनंति केली. कैकेयीनेंहि रामचंद्राला राज्याभिषेक करून घेण्याविषयीं आग्रह केला, आणि रामानेंहि मग तिची आज्ञा शिरसामान्य केली. वसिष्ठादिकांनीं आपल्याबरोबर आणलेल्या पुण्यजलांनीं त्याला राज्याभिषेक केला तेव्हां सर्वांनीं रामचंद्राचा मोठा जयजयकार केला. या वेळीं कैकेयीनें हा राज्याभिषेकाचा उत्सव अयोध्येंत पुनः पहाण्याची आपली इच्छा दर्शविली. रामानें तिला तसेंच होईल म्हणून आश्वासन दिलें आणि त्यानें पुष्पकविमानाचें चिंतन केलें. त्याबरोबर तें दिव्य विमान तेथें आलें. आणि मग रामचंद्र सर्वांसह विमानांत बसून अयोध्येला जाण्यास निघाले. अशा प्रकारें रामाचा वनवास संपून, सर्वांच्या पुन्हां गांठी पडून जिकडे तिकडे आनंदी आनंद होऊन गेला. असें ह्या प्रतिमानाटकाचें मनोहर कथासूत्र आहे.

# नाटक.

काव्याचे दोन विभाग केले आहेत. एक श्राव्य आणि दुसरा दृश्य. दृश्य काव्याला संस्कृत साहित्यांत **रूपक** अशी संज्ञा दिली आहे. या **रूपकांसच** सामान्य व्यवहारांत आपण **नाटक** असें म्हणतों. पण नाट्य-शास्त्रांतील पारिभाषिकाकडे पाहतां **नाटक** हा शब्द **रूपकाचे** जे अनेक प्रकार आहेत त्यांतील एका विशिष्ट प्रकारास लाविलेला आहे. **दृश्यकाव्याचे**-अर्थात् **रूपकाचे**-नाट्यशास्त्रकारांनीं एकंदर १० प्रकार सांगितले आहेत, ते असे:- (१) **नाटक**, (२) **प्रकरण**, (३) भाण, (४) प्रहसन, (५) डिम, (६) समवकार, (७) ईहामृग, (८) उत्सृष्टिकांक, (९) व्यायोग, आणि (१०) वीथी. या दहा प्रकारांपैकीं प्रत्येक प्रकाराचें लक्षण अर्थातच वेगवेगळें आहे. **भासकवीनें** ह्या नाटकाला "**प्रतिमा नाटक**" असें नांव दिलें आहे. अभिषेक नाटकालाहि तो "**अभिषेक नाटक**" असेंच नांव देतो. 'मध्यम व्यायोग' या नांवांत या दशरूपकांपैकीं **व्यायोग** नामक प्रकाराचा अंतर्भाव झालेला दिसून येतो. आतां ज्याअर्थी **प्रतिमा** व **अभिषेक** ह्या दोन्हीं दृश्य काव्यांना कवीनें 'नाटक' म्हणून संबोधिलें आहे त्याअर्थी ह्या **नाटक** प्रकाराचें येथें थोडक्यांत लक्षण दिलें असतां तें प्रस्तुत नाटकास कितपत लागू पडतें हें वाचकांस अजमावून पाहतां येईल, आणि या '**नाटक**'**प्रकाराची** वाचकांना साधारणपणें तरी कल्पनाहि येईल. एवढ्याच हेतूनें तें आम्ही येथें देत आहों.

१. नाटकाचें संविधानक प्रख्यात अशा वृत्तावर उभारलेलें असावें.

२. **नाटक**-प्रकारांतील नायक प्रख्यात असून उदात्त असावा. मग तो राजा, राजर्षि, मनुष्य-देहधारी देव, अथवा एखादा नेता, शीलवान् पुरुष, यांपैकीं कोणीहि असल्यास चालेल.

३. नायक धीरोदत्त, प्रतापी आणि कुलीन असावा.

४ यांत पांच ते दहा पर्यंत अंक असावेत. दहा अंक असले म्हणजे त्याला **महानाटक** म्हणतात.

५. यांत शृंगार, वीर अथवा करुण हे रस प्रधानत्वें करून असावे; आणि नाटकाच्या निर्वहणांत शेवटीं अद्भुत रस असावा.

६. लौकिकव्यवहारांचीं चित्रें यांत जागजागीं दृश्य व्हावीत.

७. नाटकाचें नांव असें असावें कीं, त्यायोगें त्या नाटकाचा विषय चटकन् लक्षांत यावा. अथवा नाटक वाचल्यावर त्या नांवाचें याथार्थ्य पूर्णपणें पटावें; इतकेंच नव्हे पण त्या नांवानें वाचक आणि प्रेक्षक भारले जावे. अशी अद्भुत जादू त्यांत असावी.

८. नाटकांतील पात्रांची संख्या फार मोठी असूं नये. चार किंवा पांच मुख्य पात्रें असलीं म्हणजे पुरे.

९. नाटकांत प्रस्तावना, विष्कंभक व प्रवेशक हे असावे.

१०. प्रत्येक अंकांत एकच दिवसाचें कार्य असावें.

११. नाटकाचा शेवट गोपुच्छासारखा असावा. अर्थात् संविधानकाचा विकास हळूं हळूं होत जावा.

१२. नाटकाच्या एकंदर संविधानकांत पांच संधी असावे. . संधी पांच प्रकारचे आहेत, ते असे—(१) मुख, (२) प्रतिमुख, (४) गर्भ, (५) विमर्ष, व (५) निर्वहण. हे संधी म्हणजे नाना प्रकारचे रस उत्पन्न करून त्यांचा चढउतार वगैरे करण्याचीं क्रमवार स्थानेंच होत.

# प्रतिमा नाटकांतील पात्रें.

**पुरुषपात्रें:—**

दशरथ—...... अयोध्येचा राजा.

राम—...... दशरथाचा वडील पुत्रः कौसल्येचा मुलगा.

लक्ष्मण—......दशरथाचा द्वितीय पुत्रः सुमित्रेचा मुलगा.

भरत—
शत्रुघ्न— } ... ,, चे पुत्र; कैकेयीचे मुलगे.

सुमंत्र—...... दशरथ महाराजांचा अमात्य.

बालाकी.—... दशरथाचा कांचुकीय.

सूत.—...... भरताचा सारथि.

सुधाकार.—...एक सेवक, झाडलोट व साफसूफ करणारा.

भट.—...... एक राजसेवक.

काश्यप.—... तपोवनांतील एक तपस्वी मुनि.

तापस—...... ,, दुसरा एक ,, ,,

देवकुलिक——... प्रतिमा-गृहांतील गुरव.

रावण—...... लंकापति.

[संभवक व जटायु ह्यांचा नाटकांत उल्लेख आला आहे.]

**स्त्री पात्रें:—**

कौसल्या.—... दशरथाची सर्वांत वडील पत्नी; राममाता.

सुमित्रा.—.... ,, द्वितीय पत्नी; लक्ष्मणमाता.

कैकेयी.—.... ,, तृतीय पत्नी; भरतशत्रुघ्नांची माता.

सीता—...... जनक राजाची कन्या: रामाची पत्नी.

अवदातिका.— एक दासी.

नंदिनिका—
विजया — } ...चेटी अथवा दासी.

तापसी—......तपोवनांतील एक मुनिपत्नि.

विजया—... दशरथराजाची द्वारपालिका.

[संगीत शालेंतील नेपथ्यपालिनी आर्यरेवा व दासी सारसिका यांचा नाटकांत उल्लेख आला आहे.]

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

महाकवि श्रीभास-प्रणीत.

# प्रतिमा नाटक.

[ नांदी झाल्यावर सूत्रधार प्रवेश करितो. ]

श्लोक [ वृत्त--शा. वि. ]

सूत्रधारः—

सीतानाथ सुमन्त्रतुष्ट, भरत, श्रीराम, सुग्रीव तो
रक्षो, लक्ष्मण-युक्त देविसह, जो आनंद संवर्धितो ॥
दुष्टां काल, बिभीषणात्मक असा यद्भास सर्वांतरीं
रक्षो रावण-शत्रु अप्रतिम तो यां जन्मजन्मांतरीं ॥१॥

( पडद्याकडे तोंड करून, पाहून. )

र्ये ! इकडे ये.

[ नटी प्रवेश करिते. ]

नटीः—आर्य ! ही मी आलें.

सूत्रधारः—आर्ये ! ह्या शरत्कालाला अनुसरून कांहीं गायन कर पाहूं.

नटीः—जशी आर्यांची आज्ञा. [ गाते. ]

सूत्रधारः—या कालीं:—

विचरे हंसी पुलिनीं काश-वसन वरुनि चित्तिं हरिखूनी ॥

( पडद्यांत. )

" आर्य ! आर्य ! "

सूत्रधारः—( ऐकून ) हां समजलों.

द्रुत संचार करी ही प्रतिहारी जेंवि मुदित नृपभवनीं ॥२॥

( दोघेहि जातात. )

[ स्थापना ]

( प्रतिहारी येते. )

प्रतिहारी—कांचुकीयांपैकीं इथं जवळपास कोण आहे ?

( कांचुकीय प्रवेश करितो. )

**कांचुकीयः**—बाई! हा मी आहे इथं. काय आहे काम?

**प्रतिहारीः**—आर्य! ज्या दशरथ महाराजांच्या महारथानं देवदानवांच्या संग्रामांत कधीं माघार खाल्ली नाहीं, त्यांची आज्ञा आहे कीं—कुमार रामाला आज सर्व राज्याधिकार द्यावयाचे आहेत, तर त्याच्या अभिषेकाचं सगळं साहित्य तयार करा.

**कांचुकीयः**—महाराजांच्या आज्ञेनुसार सर्व तयारी होऊन राहिली आहे.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

हें सिंहासन, छत्र, चामर, तसें या दुंदुभी मोददा, ।
तीर्थांबू, सुमदर्भपूर्ण घट हे जांबूनदी संपदा ॥
हे मंत्र्यासह पौर, पुष्यरथ हा, सारे जुळे संप्रती ।
सर्वां मंगल हे वासिष्ठ भगवान् वेदीवरी तिष्ठती ॥३॥

**प्रतिहारीः**—असं असेल तर फारच चांगलं झालं.

**कांचुकीयः**—अहाहा!

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

रामाभिधान चंद्रा या । भूराज्यीं अभिषेकुनी ॥
धन्य केल्या प्रजा साऱ्या । भूपें आनंद देउनी ॥४॥

**प्राति०**—तर आर्यांनीं आतां जलदी करावी.

**कांचुकीय**—बाई! ही पहा जलदीच करितों. [ जातो.

**प्रतिहारीः**-(इकडे तिकडे फिरून, पाहून) आर्य, संभवका! संभवका! जा. तूंहि जा आणि आर्यपुरोहितांना जरा घाई कर; म्हणावं महाराजांनीं सांगितलं आहे जरा त्वरा करायला—मात्र नीट मर्यादेनं सांग. (दुसरीकडे जाऊन) अगं सारसिके! ए सारसिके! संगीत शाळेंत जा आणि नट लोकांना सांग,—कालाला उचित अशा नाटकाची तयारी असूं द्या. तोंपर्यंत मीहि जाऊन सर्व सिद्धता झाल्याचं महाराजांना कळवितें. [ जाते.

[ नंतर अवदातिका वल्कलें घेऊन प्रवेश करिते. ]

**अवदातिकाः**—(स्वगत) छेः छेः काय केलं मी हें! चूकच झाली ही माझ्याकडून. थट्टेनें म्हणून मी हें वल्कल उचलून आणलं तरी सुद्धां मला याचं

इतकं भय वाटतं, मग लोभाला गुंतून जर परधन हरण केलं तर त्याची काय स्थिती होईल ! बाई, बाई, बाई ! मला हंसू तर येतय, पण मी आपल्याशींच काय हंसू !

[ नंतर परिवारासह देवी सीता प्रवेश करिते. ]

**सीताः**—(चेटीस) अग, ही पाहिलींस का अवदातिका-हिच्या मुद्रेवरून ही कशी घाबरल्यासारखी दिसते आहे. कां बरं घाबरली असेल ही अशी ?

**चेटीः**—देवि ! परिजनांच्या हातून पदोपदीं चुका घडत असतात. हिच्या हातून झाली असेल

**सीताः**—छेः छेः तिला तर हसूं फुटतसं दिसतंय.

**अवदातिकाः**—(जवळ येऊन) देवींचा विजय असो. देवि! खरोखरच माझ्याकडे कांहीं चूक नाहीं.

**सीताः**—अग पण हें तुला विचारलंय कोणी ? अवदातिके ! तुझ्या डाव्या हातांत कायग आहे हें ?

**अवदाः**—देवि ! हें वल्कल आहे.

**सीताः**—वल्कल ? कोणाकडून आणलंस हें ?

**अवदा०**—ऐकावं देवींनीं. रंगसाहित्याची राखणदारीण- ती नेपथ्य-पालिका- आर्यरेवा नाहीं का, तिच्याकडे मी अशोक पल्लवांचा एक टाळा मागितला.रंगपटाकडे तिला यापुढें कांहीं त्याची जरूरी नव्हती—तरी देखील तिनं कांहीं तो मला दिला नाहीं; ह्याचं उट्टं काढावं म्हणून मी हें घेऊन आलें !

**सीताः**—वाईट गोष्ट केलीस तूं ही. जा, परत कर जा तें.

**अवदा०**—देवि ! हें तिची केवळ थट्टा करावी एवढ्याच हेतूनें मी आणलं आहे.

**सीताः**—वेडे ! यामुळें तर अधिकच दोष पदरांत येतो. जा, जा परत कर जा तें आधीं.

**अवदा०**—जशी देवींची आज्ञा. [ जाऊं लागते.

**सीताः**—पण थांब, जरा थांब. इकडं ये पाहूं अंमळ.

**अवदा०**-देवि ! ही आलें मी.

**सीताः**—अग, हें मला चांगलं दिसेल कां ?

अवदा०—देवि! हें पहा, एक रूप चांगलं असलं म्हणजे सर्व कांहीं शोभतं, परिधान करावं हें देवीनीं.

सीताः—आण, आण तर इकडं. ( घेऊन परिधानकरून ) अगं, हें बघ. हें कसं काय शोभतं गं मला ?

अवदा०—खरंच, देवीनां हें चांगलं शोभतं. हा पाहिला कां चमत्कार,—बाईसाहेबांच्या अंगकांतीनं हें वल्कल जसं कांहीं सोन्याचं झालं आहे!

सीताः—( चेटीला ) अगं, तूं कशी कांहींच बोलत नाहींस ?

चेटीः—मी आणखी बोलून तें काय दाखवायचं ? माझे हे हर्षरोमांचच बोलताहेत! ( रोमांच दाखविते. )

सीताः—अगं, आरसा घेऊन ये पाहूं जरा.

चेटीः—जशी देवींची आज्ञा. ( जाऊन, आरसा घेऊन येते. ) देवि! हा आरसा.

सीताः—( चेटीचे तोंडाकडे पाहून ) राहूं दे तो आरसा. तुला कांहीं बोलायचं आहेसं दिसतं.

चेटीः—देवि! मी इकडं येतायेतां असं ऐकलं–हो, कंचुकी बालाकीच–"अभिषेक–अभिषेक" असं कांहींसं म्हणत होता !

सीताः—कोणातरी राजाला वा राज्याभिषेक होणार असेल झालं.

( दुसरी चेटी प्रवेश करिते. )

२ री. चेटीः—देवि! आनंदाची बातमी! आनंदाची बातमी!

सीताः—मग ती सांगायला वाट कशाची बघतेस ?

२ री. चेटीः—कुमारांना अभिषेक करायचं ठरलं आहे.

सीता—हो, पण महाराज कुशल आहेत ना ?

२ री. चेटीः—महाराजच तर अभिषेक करविणार आहेत.

सीताः—असं असेल तर ही दुसरी आनंदाची बातमी मी ऐकली म्हणायची! हें बघ,—ह्या आनंदाच्या बातमीबद्दल मी तुझी ओटी भरणार आहे. बैस पाहूं जरा खालीं.

चेटी—जशी देवींची आज्ञा. ( ती खालीं ओटी पसरून बसते. )

सीताः—( अलंकार काढून तिला देते. )

२ री. चेटीः—देवि! नगारा झडल्या सारखा आवाज ऐकूं येतो आहे.

सीताः—हो, नगाऱ्याचाच आवाज हा !

२ री चेटीः—नगारा थांबून ही एकदम सामसूम झाली कीं !

सीताः—अभिषेकाला कांहीं व्यत्यय तर नाहीं आला ? राजांचे वाडे म्हटले म्हणजे तिथं नाना प्रकारच्या गोष्टी घडून येत असतात !

२ री चेटीः—देवि ! माझ्या कानांवर असं आलंय कीं—कुमारांना अभिषेक करून महाराज वनाला जाणार आहेत.

सीताः—असं असेल तर तो अभिषेक नव्हे, तो *मुखसेक आहे !

[ नंतर रामचंद्र प्रवेश करितात. ]

रामः—( स्वगत ) अहो !

श्लोक [ वृत्त–शा. वि . ]

चाले दुंदुमि–नाद, तोंच चढलों भद्रासनाच्यावर,
होते वृद्ध उभेचि, मंत्र म्हणतां मी नम्र केलें शिर ॥
लागे तें स्रवण्या पवित्र जल त्यां कुंभांतलें मत्शिरीं
या ऐशा समयींच तात मजला पाचारुनी सत्वरी ॥
आज्ञापी मज जावया तिथुनिया; मी तद्वचा मानुनी–
जातां, विस्मित जाहले सकलही मद्धैर्य हें देखुनी ॥
मीही विस्मित जाहलों बघुनिया त्यांच्या अशा विस्मया
बापाच्या जरि पाळि पुत्र वचना, जागा कुठें विस्मया ? ॥५॥

‘ कुमारा ! हें अभिषेकाचं कार्य आतां इतकंच पुरे, ’—असं म्हणून, स्वत. महाराजांनीच जेव्हां मला जायाला सांगितलं, तेव्हां माझ्या मनावरचा भार नाहींसा होऊन मला कितीतरी हलकं वाटलं ! आणि मला आनंद वाटतो तो हा कीं, मी पहिल्या सारखा रामच असून महाराज हे पूर्वी प्रमाणं महाराजच कायम राहिले आहेत ! तर आतां अगोदर मैथिलीला जाऊन भेटावं.

अवदा०—देवि ! कुमार आले, अजून हें वल्कल नाहीं तुम्हीं दूर केलंत.

रामः—( जवळ येऊन ) मैथिलि ! काय,–बसली आहेस ?

सीताः—हो,–आर्यपुत्रच ! विजय असो आर्यपुत्रांचा. ( ती उठते. )

रामः—बैस, मैथिलि ! बैस. ( स्वतः बसतो. )

---

*मुखसेक आहे=चूळ भरून टाकलेल्या पाण्याच्या किंमतीचा आहे.

सीताः—जशी आर्यपुत्रांची आज्ञा. ( ती बसते. )

अवदा०—देवि! कुमारांचा वेष तर पूर्वी सारखाच आहे. तर मग एकून खोटंच म्हणायचं तें?

सीताः—लोक अशा प्रकारचं खोटं नाहीं बोलायचे. अथवा राजांचे वाडे म्हटले म्हणजे तिथं नाना प्रकारच्या गोष्टी घडून येत असतात!

रामः—मैथिलि! काय म्हणते आहे ही?

सीताः—कांहीं नाहीं; ही चेटी–' अभिषेक अभिषेक ' असं कायसस म्हणते आहे.

राम—आलं लक्षांत; तें समजून घ्यायला तूं उत्सुक झाली आहेस! हो, अभिषेकच होता. ऐक–त्याची हकीगत अशी आहेः–महाराजांनीं सारं कोसल राज्य एकसूत्री करून आज उपाध्याय, अमात्य, आणि प्रजाजन यांच्या समक्ष मला–ज्या तातांच्या मांडीचा मला लहानपणीं लाभ होत असे त्या मांडीवर बसवून घेऊन, माझ्या मातृ–गोत्राचा प्रेमभरानं उच्चार करून मला म्हटलंः–" पुत्रा, रामा! ह्या राज्याचा स्वीकार कर! "

सीताः—तेव्हां आर्यपुत्रांनी काय म्हटलं?

रामः—मैथिलि! तुझा काय तर्क चालतो, सांग पाहूं?

सीताः—माझा तर्क असा–कीं, आर्यपुत्रांच्याकडून कांहींच बोलवलं नसेल,–नुसता एक दीर्घ निःश्वास टाकून, महाराजांच्या पायांवर डोकं ठेवायचं झालं असेल!

रामः—बरोब्बर ताडलंस! समानशील अशी जोडपीं विरळाच जुळून येतात! खरोखर, त्यावेळीं मी आपल्याला महाराजांच्या पायांवरच घालून घेतलं.

आर्या - [ गीति. ]

॥ धरितां पद ते गळती वरुनी ताताश्रु, खालुनी माझे ॥
॥ एकाचि समयिं भिजले मात्छिर, नृपपाद, पूज्य मजला जे! ॥६॥

सीताः—आणि मग पुढं?

रामः—मग त्यांच्या आज्ञेनुसार राज्यभार घ्यावयाला मी कबूल होत नाहीं असं पाहून, आपण वृद्धावस्थेमुळें थकलों आहों असं सांगून त्यांनीं मला आपल्या प्राणांचीं शपथ घातली!

**सीताः**—आणि मग ?

**रामः**—नंतर मग—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

शत्रुघ्न, लक्ष्मण करीं अभिषेक पात्र—
घेती, तसे नृप धरी स्वकरांत छत्र ॥
तों मंथरा त्वरित येउनि भूप-कानीं
लागे हळूच;—आज राम न भूप-मानी ! ॥७॥

**सीताः**—मला तर बाई आनंदच वाटतो आहे,—कीं महाराज पूर्वी-प्रमाणें महाराजच आहेत, आणि आर्यपुत्र—आर्यपुत्रच आहेत !

**रामः**—हो, पण मैथिलि, तूं हे आपले अलंकार कां बरं काढून ठेवले आहेस ?

**सीताः**—काढून नाहीं ठेवले; घालतें आतां.

**रामः**—नाहीं कसे ? हे अलंकार अंगावरून नुकतेच उतरून ठेवल्या-सारखं दिसतं आहे; कां तरः—

श्लोक. [ वृत्त—शिखरिणी. ]

अलंकारांतें या त्वरित—गतिनें त्वां उतरिलें
कथा ही कर्णाग्रें कथिति लवलेलीं, सुविमलें! ॥।
करस्थानीं जेथें धरिलि अवतंसें सखि, पहा—
तिथें आतां होती प्रकट तळ ते गौरचि अहा ! ॥
तुझी जीं जीं गात्रें लवलि असती भूषणभरें
तयांते अद्यापी बघ न समता ये लवभरें ॥८॥

**सीताः**—मी सहज खोटं बोलून गेले खरी, पण नेमकं खरं तेंच शोधून काढणं इकडल्या इतकं दुसऱ्या कोणाला साधणार आहे.

**रामः**—हं, मग घाल तर हे अलंकार. हा पहा तुझ्यापुढें मी आरसा धरतों. ( तसें करून, निरखून पाहून ) थांब !

आर्या [ गीति. ]

आदर्शांतरिं दिसतें तव तनुवरि वल्कलापरी काय ?
कां ते सुवर्णशोभी रविरश्मी भूषणांति तव काय ?

परि सखि, हंसित तुझें हें-रविरश्मि नव्हत हे,-असें कथितें, ।
तरि तूं क्रीडा-नियमें वरिशी या वल्कलां गमत मतितें ! ॥९॥

अवदातिके ! सांग, काय-खरं काय आहे,-सांग पाहूं ?

**अवदातिकाः**—कुमार ! वल्कलं आपल्याला शोभतात कीं नाहीं हें जाणण्याच्या बुद्धीनेंच देवींनीं तीं परिधान केलीं आहेत.

**रामः**—मैथिलि ! इक्ष्वाकुवंशांतल्या पुरुषांचा हा वृद्धावस्थेंतला अलंकार तूं धारण केला आहेस हें काय ? तीं आम्हांला फार प्रिय वाटतात. आण पाहूं इकडं तीं.

**सीताः**—छेः छेः आर्यपुत्रांनीं असं अशुभ भाषण करूं नये !

**रामः**—मैथिलि ! कां-तूं कां याच्या आड येतेस ?

**सीताः**—आर्यपुत्र नुकतेच अभिषेक टाकून आले आहेत, तेव्हां त्यांना-

**रामः**— श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

वल्कलां सेवुनी तूं या-। छेः! अर्धांगींचि माझिया ।
उत्कंठा जागृता केली, । विनोदा आदरूनिया ॥
मागतां वल्कलातें ह्या । जें मी आधींच सेविलें ।
तें देण्या आड कां येशी ? कोठें अशुभ राहिलें ? ॥१०॥

[ पडद्यांत. ]

" हाय ! हाय ! महाराज ! "

**सीताः**—आर्यपुत्र ! हें काय आहे ?

**रामः**—( ऐकून )

आर्या-[ गीति. ]

ध्वनि हा प्रचंड येई नरनारींचा किती तरी स्पष्ट ॥
मूलीं कुठार हाणी दैवाचि तें मज गमें तरि अनिष्ट ! ॥११॥

ही काय गडबड आहे याचा लौकर शोध करा पाहूं.

[ कांचुकीय प्रवेश करितो. ]

**कांचुकीयः**—रक्षण करा, रक्षण करा कुमार !

**रामः**—आर्य ! कुणाचं रक्षण करायचं ?

**कांचु०ः**—महाराजांचं.

रामः—काय महाराजांचं ? आर्य! त्यांच्या एकट्यांच्या ठिकाणीं संक्षेपानें असणाऱ्या साऱ्या पृथ्वीचं रक्षण करायचं कीं काय ? बोला पाहूं, हें संकट उद्भवलं आहे तरी कुठून ?

कांचु०:—स्वजनापासून.

रामः—काय स्वजनापासून ? तर मग याला कांहीं उपायच नाहीं.

कारण— पद— [ अंजनी गीत. ]

प्रहार करी अरि शरीरावरी । स्वजन परी तो हृदयाभ्यंतरीं ॥
स्वजन शब्द हा लज्जा निपजवि । कवण लक्ष्य त्याचें ? ॥१२॥

कांचु०:—मी देवी कैकेयीना अनुलक्षून बोलत आहे.

रामः—काय मातेला? तर मग यांत परिणामीं कांहींतरी हितच घडून येणार !

कांचु०:—कसं बरं ?

रामः—ऐकाः—

श्लोक [ अनुष्टुप. ]

इंद्रापरी पती जीचा । जीचा रामचि पुत्र हा ॥
कोणतें फल वांच्छूनी । ती अकार्य करीत हें ? ॥१३॥

कांचु०:—कुमार! स्त्रियांची बुद्धि जात्याच दूषित असते. तेव्हां त्यांच्या ठिकाणीं कुमारांनीं आपल्या मनाचा सरळपणा आरोपित करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण त्यांच्याच सांगण्यावरून तर कुमारांचा अभिषेक रहित झाला !

रामः—आर्य ? मग यानं चांगलं घडून आलं.

कांचु०:—तें कसं ?

रामः—कसं तें ऐकाः—

श्लोक— [ वृत्त—मालिनी ]

वनगमन नृपाचें राहिलें आज यानें
मजवरि जनकाचें राहिलें छत्र—लेणें ॥
पुनरपि मज लाभे बाल्य तेंही सुखाचें ॥
नव—नृप—भय जाई पार साऱ्या प्रजेचे ॥

विषमपण न येई बांधवां बांधवांत
सकलहि समतेनें राहुं आम्हीं सुखांत ॥

कांचु०:—तर मग—न बोलावतां न सवरतां आपणच येऊन देवी कैकेयीनीं कुमार भरताला राज्याभिषेक करावा म्हणून जें सांगितलं त्यांत देखील त्यांचा कांहीं लोभ नव्हता तर ?

रामः—आर्य! तुम्हांला आमचा पक्षपात वाटतो म्हणून यांतला खरा अर्थ आपल्या लक्षांत येत नाहीं. कारण लग्नाच्या वेळीं—

( साकी. )

शुल्क म्हणुनियां अर्पियलें जें, तेंच राज्य तनयार्थ-
मागें ती जरि, तिचाच होतो लोभ आणि तो स्वार्थ ! ॥
लोभ न पारे अमुचा ॥ बंधुचें राज्य,-हरी त्याचा ? ॥ १५ ॥

कांचुकीयः—पण—

रामः—आतां या पुढं कैकेयीमातेच्या संबंधानं निंदा ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. महाराजांच्या संबंधाची जी हकीकत असेल ती सांगा तेवढी.

कांचुकीयः—पुढें मग—

श्लोक-[वृत्त—व. ति. ]

शोकामुळें न वदवे म्हणुनी करानें
जाण्या निरोप दिधला मजला नृपानें ॥
वाटे, कसेंतरि तिचें वच मान्य केलें ।
तत्काल नाथ मग मूर्च्छित तेथ झाले ! ॥ १६ ॥

रामः—काय, महाराजांना मूर्च्छा आली ?

[पडद्यांतः—"काय ? काय ? महाराजांना मूर्च्छा आली म्हणून म्हटलंत ? "
जरि न बघवे तातांची ही अशी तुज मूर्च्छना ॥ ]

रामः—( ऐकून समोर पाहून )

आर्या—( गीति. )

जो न कधीं खवळे तो, लक्ष्मण आजि खवळला कशानें हा ?।
क्षुभित असा हा होतां भासे शत ठायिं जणुं उभा मज हा ! ॥ १७ ॥

[ नंतर धनुष्यबाण हातांत आहेत असा लक्ष्मण प्रवेश करितो. ]

लक्ष्मणः---(क्रोधानें) काय? काय म्हटलंत? महाराजांना मूर्च्छा आली म्हणून?

श्लोक [ वृत्त-हरिणी. ]

जरि न बघवे तातांची ही अशी तुज मूर्च्छना ।
उचलि धनु हें ह्या हस्तांनीं ! दया न शिवो मना ॥
स्वजनिं धरिती विश्वासा जे मृदू जन त्यांप्रती ।
परिभव सदा लाभे; दुःखें तयांवरि लोटतीं ॥
रुचत अथवा तूंते, रामा ! जरी नच ही कृती ।
तरि मज कथीं, झाला माझा सुनिश्चय संप्रती ॥
करिन जगतीं स्त्री-शून्या ही ! घडेल न अन्यथा ।
कपट करुनी कीं कैकेयी करी कृति दुष्कृता ! ॥ १८ ॥

सीताः---आर्यपुत्र ! या शोकप्रसंगीं लक्ष्मणानीं धनुष्य उचललं आहे ! हें यांचं करणं अगदींच अस्थानीं दिसतं !

रामः---सुमित्रानंदना ! हें काय हें !

लक्ष्मणः---कसं-कसं म्हटलंत ? ' हें काय हें '-म्हणून ?

श्लोक [ वृत्त-इंद्र. व. ]

संप्राप्त जें राज्य कुलक्रमानें । तें या प्रकारें हरिलें छलानें ।
झालें नृपा जीवित शोक-पूर्ण ! । राहे तरी संशय कां अजून ? ।
हा कां क्षमाशीलपणा म्हणावा । कीं बुद्धिचा मंदपणा गणावा?॥१९॥

रामः---सौमित्रे ! माझं राज्य जाणं तुला ह्या उद्योगाला प्रवृत्त करितं? हः! तर मग तूं अगदींच मूढ आहेस म्हणायचा !

आर्या [ गीति. ]

भरत असो तो राजा, अथवा मी, हे समान तुज दोनी ।
स्वबलाभिमान जरि मनिं, योजी त्या भरत-भूपति-त्राणीं ॥२०॥

लक्ष्मणः---हा क्रोध कांहीं मला सहन होत नाहीं. ठीक आहे, ठीक आहे तर ! हा चाललोंच मी इथून आतां.

रामः--- आर्या [ गीति. ]

लक्ष्मणललाट-पुटिंची भ्रुकुटी ही सकल विश्व-दहनाला ।
उद्यत व्हावी तैशी विधि-लेखा भास देत नयनाला ॥ २१ ॥

लक्ष्मणा ! थांब, जाऊं नकोस ! इकडं ये पाहूं.

लक्ष्मणः—आर्य ! हा आलों मी.

रामः—अरे, तुझ्या ठिकाणीं स्थैर्य यावं म्हणून मी हें असं म्हटलं. बरं, आतां तूंच मला असं सांग कीं—

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

सत्या आदरितात तात, धनु हें त्यांच्या वरी योजुं का ? ।
स्वश्री जी जननी हरी तिजवरी कीं सोडुं त्या सायकां ? ॥
कां मर्दूं निज बंधु तो भरत मी ज्या दोष ना ठाउक ? ।
त्वद्रोषा प्रिय कोणतें वद करूं तींहींतलें पातक ? ॥ २२ ॥

लक्ष्मणः—( डोळयांत अश्रू येऊन) हाय ! हाय ! दुर्दैव माझं ! सगळी हकीकत ऐकून न घेतां मला आधींच दोष देत आहांत.

[ साकी. ]

शिवे न मज लव राज्य–लोभ, परि होतो क्लेश मनास ! ।
कीं तुज व्हावा घोर चतुर्दश वर्षांचा वनवास ! ॥ २३ ॥

रामः—तर महाराजांना यामुळं मूर्च्छा आली? हंः! ह्या मूर्च्छेनेंच दर्शविलं कीं महाराजांचं प्रभुत्व राहिलं नाहीं—त्यांचा निरुपाय झाला! मैथिलि,-

आर्या [ गीति. ]

जीं वल्कलें तुज दिलीं आण बघूं मंगलार्थ तीं इकडे ।
मीं पुण्य साधितों, जें अन्य नृपां लाभलें न, वा न घडे ! ॥२४।

सीताः—घ्यावं हें आर्यपुत्रांनीं.

रामः—मैथिलि ! मी वनवासाला गेल्यानंतर तूं काय करावयाचं ठरविलं आहेस ?

सीताः—मी इकडची सहधर्मचारिणीच आहे ना ?

रामः—मला एकट्यालाच वनाला जायचं आहे.

सीताः—म्हणून तर मी बरोबर येणार.

रामः—वनांत राह्यचं आहे.

सीताः—तेंच माझं राजमंदिर !

रामः—पण तूं सासू सासऱ्यांचीहि सेवा केली पाहिजेस.

सीताः---त्या सेवेसंबंधानं हा मी देयतांना प्रणाम करितें !

रामः---लक्ष्मणा ! तूं तरी हिचं निवारण कर.

लक्ष्मणः---आर्य ! जिथं स्तुतीच्च करणं योग्य तिथं तिचं निवारण करायला माझं मनच घेत नाहीं. कारणः---

श्लोक [ वृत्त-मंदाक्रांता. ]

राहुग्रस्ता शशिसहितही जातसे रोहिणी ती ।
वृक्षा संगें उलथुनि पडे कीं लता भूमि-पृष्ठीं ॥
पंकीं हस्ती रुतत तरि, ती हस्तिनी त्या न टाकी ।
लोकीं पत्नी पतिवश पहा; घ्या हिलाही सवें कीं ॥ २५ ॥

[ चेटी प्रवेश करिते. ]

चेटीः---देवींचा विजय असो. नेपथ्यपालिनी आर्यरेवाबाईनीं आपल्याला प्रणाम सांगून अशी प्रार्थना केली आहे कीं,-अवदातिकेनं संगीत शाळेंतून गुपचुपपणें वल्कलं आणलीं आहेत तीं जुनीं आहेत. दुसऱ्या कोणीं न वापरलेलीं अशीं हीं नवीन वल्कलं धाडिलीं आहेत, यांनीं आपलं काम करून घ्यावं.

रामः---अगं, इकडं आण तीं. हिची हौस भागली आहे. आम्हांला जरूरी आहे यांची.

चेटीः---घ्यावीं हीं कुमारांनीं. ( देऊन निघून जाते. )

[ राम तीं वल्कलें घेऊन धारण करितात. ]

लक्ष्मणः---आर्यांनीं प्रसन्न व्हावं. राग मानूं नये माझ्या बोलण्याचा.

श्लोक- [ वृत्त-अनुष्टुप. ]

नियोग, भूषणें, माला । दिला यांतील अर्ध तूं ।
एकटें सेवितां चीर । दूर सारूनिया मला ! ॥२६॥

रामः---मैथिलि ! तूं याचं निवारण कर.

सीताः---लक्ष्मणा ! खरोखर हा विचार सोडून द्या तुम्हीं.

लक्ष्मणः---आर्ये !

श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

गुरूंची पादसेवा ही । करूं इच्छिशि एकटी ! ॥
सेवी तूं उजवा पाद । डावा लाभो मजप्रती ॥ २७ ॥

सीताः—आर्यपुत्रांनीं यांच्यावर दया करावी;यांना फार दुःख होत आहे.

रामः—लक्ष्मणा !

आर्या [ गीति. ]

जाण तपःसंग्रामीं वल्कल हें करित कार्य कवचाचें ।
अंकुश नियम गजाला वल्कल हें जाण आकळायाचें ॥
कंटक–युक्त खलीनचि इंद्रिय–तुरगाननांत देण्याचा ॥
घे हें वल्कल, वत्सा ! आहे हा धर्म–सारथी साचा ॥ २८॥

लक्ष्मणः—माझ्यावर हा प्रसादच झाला म्हणायचा ! ( वल्कल घेऊन परिधान करितो. )

रामः—हा वृत्तांत ऐकून नागरिकांनीं राजमार्ग अडवून टाकला आहे. तर, दूर करा, दूर करा त्यांना मार्गांतून.

लक्ष्मणः—आर्य ! मी पुढें होतों. (पुढें जाऊन) सरा–बाजूला, सरा !

रामः—मैथिलि ! तूं हें आंपलं अवगुंठन दूर कर आतां.

सीताः—जशी आर्यांची आज्ञा. ( ती तें दूर करिते. )

रामः—हे पौरजनहो ! ऐका, ऐका आपणः—

श्लोक–[ वृत्त–शा. वि. ]

अश्रूंनीं युत युष्मदीय वदनें, तैसोचि हे लोचन ।
ही देवी, मनसोक्त घ्या अजि इला प्रेमें तुम्हीं पाहुन ॥
लोकांच्या जरि दृष्टिला पडाति त्या नारी विवाहीं, वनीं, ।
किंवा संकटिं, यज्ञकालिं अथवा, दोषी न होई कुणी ॥ २९ ॥

[ कांचुकीय प्रवेश करितो. ]

कांचुकीयः—कुमार ! जाऊं नका, जाऊं नका आपण. कारण हे महाराज–

श्लोक–[ वृत्त प्रहर्षिणी. ]

ऐकोनी वनगमना करीतसां हें ।
सीतेच्या सह, न जिला वियोग साहे ॥
सौमित्रि द्रवुनि मनीं सुबंधु–भावें ।
जाती, हें नरपतिच्या मना न भावे ॥

जैसा ये वनगज वृद्ध तो उठोनी ।
धूलीनें क्षितितालिंच्या तनू भरूनी ॥
तैसेची नरपति तेहि शोक–पूर्ण ।
येताती विवश–मनेंचि येथ तूर्ण ॥ १० ॥

लक्ष्मणः—आर्य !—

श्लोक–[ वृत्त–अ. नु. ]

वल्कलें वेष्टिल्या आम्हां । वनस्थां काय पाहणें ?
रामः— पाहोत ते शिरस्थानें । सेवितां आम्हि तीं वनें ! ॥२१॥

[ सर्व जातात. ]

पहिला अंक समाप्त.

# अंक २ रा.

[ तदनंतर **कांचुकीय** प्रवेश करितो. ]

**कांचुकीयः**—अहो, द्वाररक्षक हो! तुम्हीं सर्वजण आपापल्या ठिवाणीं फार दक्षपणानं रहा.

( प्रतिहारी प्रवेश करिते. )

**प्रतिहारीः**—आर्य ! असं कां सांगता बरं ?

**कांचुकीयः**—याचं कारण असं कीं—वनवासाला जायला निघालेल्या कुमार रामचंद्रांना परत फिरविण्याला असमर्थ झाल्यामुळें, सत्यवचन रक्षण-तत्पर अशा आपल्या महाराजांचं हृदय पुत्रविरहरूपी शोकाच्या अग्नीनं करपून जाऊन, त्यांचं मस्तक फिरून, ते सध्यां ह्या जलमंदिरांत वेड्यासारखे प्रलाप करीत पडले आहेत !

श्लोक—[ वृत्त—अद्रितनया. ]

युग-अवसानकालिं हदरूनि मेरुगिरि, जेंवि तोहि चळतो।
अटुनि अशेष तोय अवघा महा उदधि जेंवि शुष्क दिसतो ॥
रवि-परिवेष मात्र दिसतो, परी तिथुनि हो अदृश्य तरणी।
गलित नृपाल-देह-मति, तो सशोक धरि आज तेंवि धरणी!॥१॥

**प्रतिहारीः**—हंः ! एकून अशी अवस्था झाली आहे तर महाराजांची ?

**कांचुः**—हो. जा तूं आपल्या कामावर.

**प्रतिहारीः**—ही चालले, आर्य !

**कांचु॰**—(सर्व बाजूस पाहून) खरोखर, रामचंद्र निघून गेले त्या दिवसापासून ही अयोध्या नगरी कशी शून्य दिसते आहे ! कारणः—

श्लोक—[ वृत्त—शा. वि. ]

हत्ती वांछिति ना तृणा, हय तसे खिंकाळणें टाकुनी।
अश्रू ढाळिति, बाल, वृद्ध, वनिता अन्नादिका वर्जुनी ॥
मोठ्यानें रडती, पहात बसती मार्गाकडे लोचनीं।
ज्या मार्गे वनिं जात राम अनुजापत्नीसवें येथुनी ! ॥ २ ॥

तर आतां आपणहि महाराजांच्या जवळच असलेलं बर. ( इकडे तिकडे फिरून, पाहून ) अरे, हे महाराज तर इथं आहेत, आणि ह्या थोरल्या राणीसाहेब आणि देवी सुमित्रा–पुत्रविरहाचा आपला दुःसह असा शोक गिळून कसाबसा धीर धरून महाराजांच्या सेवेला अगदीं सिद्ध आहेत. केवढी कष्टतर स्थिति ही ! हे–हे महाराजः—

आर्या–[ गीति. ]

पडती उठ–उठुनि पुन्हा, आक्रोशति "हाय ! हाय !" मोठ्यानें।
जिकडून राम गेले, तिकडेची निरखितात नयनानें ! ॥ ३ ॥

( सर्व जातात. )

मिश्र विष्कंभक समाप्त.

---

[ तदनंतर वर वर्णन केल्याप्रमाणें राजा दशरथ दोन्ही राण्यांसह प्रवेश करितो. ]

दशरथः— श्लोक–[ वृत्त–मंदाक्रांता. ]

हा ! हा ! रामा ! नयन–सुखद ! क्ष्मातलीं एक तूंची ।
हा ! हा ! वत्सा ! गुरु गुणवपू लक्ष्मणा ! शोक जाची ॥
हा ! साध्वी ! हे दृढ पतिरते, कन्यके, मैथिली हे ! ।
हा ! हा ! गेले तनुज सगळे टाकुनीया मला हे ! ॥ ४ ॥

हें विलक्षण नव्हे का, कीं ज्या लक्ष्मणानें भ्रातृस्नेहाला जागून पितृस्नेहावर पाणी सोडलं त्या लक्ष्मणाला पाहण्याची मला इच्छा व्हावी ? मुली, वैदेहि !

श्लोक–[ वृत्त–इं. व. ]

तो राम गेला मज टाकुनी या ।
त्या लक्ष्मणें दोष दिला पित्या या ॥
मी पात्र झालों अयशास लोकीं ।
त्वांही मला जानकि ! सोडिलें कीं ! ॥ ५ ॥

पुत्रा, रामा ! वत्सा, लक्ष्मणा ! बाळे, वैदेहि ! कांहींतरी प्रत्युत्तर द्या मला, बाळानो ! हाय ! हाय ! जिकडे तिकडे शून्यच शून्य ! मला कोणीच नाहीं देत उत्तर ? हे कौसल्यानंदना ! कुठं–कुठं आहेस तूं ?

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

सत्यप्रतिज्ञा हे रामा ! । जितक्रोधा ! विमत्सरा ! ।
गुरुभक्ता, ! जगत्कांता ! । दे दे, प्रत्युत्तरा मला ! ॥६॥

हाय, हाय ! सगळ्याच्याच हृदयांना आणि डोळ्यांना आनंद देणारा तो राम कुठं आहे ? रामा ! तुझी ती वडिलांची आज्ञा पाळण्याची तत्परता कुठं गेली ? शोकविव्हळ होणाऱ्या बद्दलची ती तुझी अनुकंपा कुठं लोपली ? सगळ्या राज्यैश्वर्याला तृणासमान तुच्छ मानणारा तो राम कुठं आहे ? वत्सा, रामा ! अरे, तूं आपल्या ह्या वृद्ध पित्याला टाकून, ज्या धर्माशीं तुझा संबंध नाहीं अशा भलत्याच धर्माला चिकटून राहून तुला काय करायचं आहे ? हाय ! हाय ! धिःकार असो मला !

आर्या—[ गीति. ]

रवि, दिन, छाया, या परि दिसती हे राम, लक्ष्मुमण, सीता ।
जातां रवि, दिन जाई; छायाही जाय दोन्हि हे जातां ॥
त्याच परी आजिं घडलें, जातां रवितुल्य राम दिनसाच—।
लक्ष्मण गेला मागुनि, सीता छायाहि ती दिसेनाच ! ॥ ७ ॥

( वर पाहून ) हे, दुष्टा कृतांता !

आर्या—[ गीति. ]

मज पुत्रहीन केलें, रामा केलेंस अन्य—नृप—तनय ! ।
नाहींतर कां त्यजितों रामातें मी करूनिया अनय ? ॥
केलीस कैकयीला विपिन—व्याघ्री तशीच तूं दुष्टा ! ।
उरली याहुन दुसरी गोष्ट असे कोणती अति अनिष्टा ?॥८॥

कौसल्याः—( रडत ) महाराजांनीं असा घोर संताप करून घेऊन असें अगदीं परवश होऊं नये; हीं एवढीं चौदा वर्सं संपलीं म्हणजे ती आणि ते दोन्ही कुमार इकडच्या दृष्टीला खास पडतील.

दशरथः—तूं कोण ?

कौसल्याः—प्रत्यक्ष पोटच्या गोळ्यावरहि जिचं प्रेम आपल्या इतकं उत्कट नाहीं ती मी—एक कठोर अंतःकरणाची आई आहे !

दशरथः—काय-काय ? सर्व लोकांच्या हृदयांना आणि डोळ्यांना आनंद देणाऱ्या त्या रामाची आई—तूं कौसल्या आहेस ?

**कौसल्या**:—महाराज ! होय, तीच मी हतभागिनी कौसल्या !

**दशरथ**:—कौसल्ये ! तूं मोठी समर्थ, तूं म्हणूनच रामाला आपल्या गर्भात धारण केलं होतंस ! मी हतबल,—माझ्यांत कसलंच सामर्थ्य उरलं नाहीं !

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

हें दुःख अत्यंत असह्य आहे
अग्नीपरी जें मज जाळिताहें ॥
माझ्यांत सामर्थ्य न सोसण्या तें ।
किंवा न त्या दूर करावयातें ॥ ९ ॥

( सुमित्रेला पाहून ) ही कोण दुसरी ?

**कौसल्या**:—महाराज ! वत्स लक्ष्मण—( एवढेंच बोलून थांबते. )

**दशरथ**:—( एकदम उठून ) कुठं आहे लक्ष्मण ? इथं तर कुठं दिसत नाहीं ! हाय ! हाय !

[ दोघीजणीं गोंधळून जाऊन राजाला सावरतात. ]

**कौसल्या**:—महाराज ! वत्स लक्ष्मणाची माता ही सुमित्रा आहे,—असं मी आपल्याला सांगत होतें.

**दशरथ**:—अग, सुमित्रे !

श्लोक ( वृत्त–अनुष्टुप. )

तुझाच पुत्र सत्पुत्र । सेवी रामा अहर्निश ! ।
छायाचि होउनी त्याची । जो रघूत्तम सद्यश ॥ १० ॥

[ कांचुकीय प्रवेश करितो. ]

**कांचुकीय**:—महाराजांचा विजय असो. हे इथं सुमंत्र आले आहेत.

**दशरथ**:—( एकदम उठून हर्षानें ) काय, रामाला घेऊन ?

**कांचुकीय**:—छेः तसं नव्हे, रथ घेऊन.

**दशरथ**:—काय–काय नुसता रथच घेऊन ? ( असें म्हणून मूर्च्छा येऊन पडतात. )

**दोघीदेवी**:—महाराज ! सावध व्हावं, सावध व्हावं ! ( अंगावर हात फिरवितात. )

**कांचुकीय**:—हाय ! हाय ! असल्या मोठ्या पुरुषावरहि ज्या अर्थी असले

खडतर प्रसंग येतात, तेव्हां दैवापुढं कोणाचा इलाज चालत नाहीं,–हेंच खरें ! महाराज ! सावध व्हा, सावध व्हा.

दशरथः—( किंचित सावध होऊन ) बालाके! सुमंत्र तर मग एकटेच आले ?

कांचुकीयः—होय महाराज.

दशरथः—हाय! हाय!

आर्या–[ गीति. ]

शून्यचि रथ ये जरि तो, होत मनोरथ मदीय तो भग्न! ।
धाडीत दशरथास्तव काळ पहा ह्या रथा नियोजून ! ॥११॥

तर मग सुमंत्रांना लौकर घेऊन ये आंत.

कांचुकीयः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

दशरथः— श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

धन्य ते वनिंचे वायू । तटाका भोंवतालचे ।
वाहतां ज्यांस रामाचें । स्पर्श–सौख्य सुखें घडे ॥ १२ ॥

[ नंतर सुमंत्र प्रवेश करितात. ]

सुमंत्रः—( सगळीकडे पाहून दुःखानें )

श्लोक. [ वृत्त–वसंत ति० ]

हे राजभृत्य आजि टाकुनि आत्म–कार्यं ।
होती सचिंत, किति यांप्रति दीनता ये ! ॥
राम–स्मृती नयन आर्द्र करी जयांचे ।
शोकेंचि देह जळती परिचारकांचे ॥
देखूनिया दशरथा सुत–शोकमग्ना ।
हे भृत्य देति नृपतिप्रति दोष नाना ! ॥ १३ ॥

( जवळ जाऊन ) महाराजांचा विजय असो.

दशरथः—बाबा, सुमंत्रा !—

श्लोक [ शिखरिणी. ]

कुठें आहे माझा—?

छेः छेः मी कांहीं हें ठीक बोललों नाहीं !

कुठें आहे तूझा कमलमुख राम, प्रिय सुत?।
करी जो भक्तीतें स्वगुरुजनिं सीमा-विरहित ! ॥
कुठें आहे तो त्वत् तनय, वद कोठें जनकजा? ।
कुठें सौमित्री तो प्रियकर गमें रामपद ज्या ? ॥
जयें शोकाब्धीच्यामधिं बुडविले आप्त सकल ।
बसे मृत्युद्वारीं अहह अजिं होऊनि विफल-॥
अशा ह्या दुर्दैव्या-अदय जनका-सांग सखया ! ।
कुणी एका शब्दें तरि कळविलें कांहिं सदया ! ॥ १४ ॥

**सुमंत्र**—महाराज ! नका, नका—असलं अभद्र भाषण खरूं नका. लौकरच तीं तुमच्या दृष्टीला पडतील.

**दशरथः**—खरोखरच मी अगदीं अनुचित भाषण केलं; तपस्वीजनांच्या संबंधानं असा प्रश्न करणं उचित नव्हे, नाहीं का ? बरं तर,—हें आतां सांगा पाहूं:—त्या तपस्वी जनांचं तप वाढतं आहे ना ? रामलक्ष्मणांनीं आपल्या पराक्रमानें निर्भय केलेल्या अरण्यांतून संचार करीत असतांना वैदेहीला क्लेश होत नाहींत ना ?

**सुमित्राः**—सुमंत्र ! वल्कलं धारण करणारी, लहान असून देखील वागण्यांत प्रौढ आणि पतिनिष्ठ अशा त्या जानकीनं आम्हांला आणि महाराजांना कांहीं निरोप नाहीं का धाडला ?

**सुमंत्रः**—सगळ्या जणांनीं महाराजांना—

**दशरथः**—छेः छेः ! असं नाहीं उपयोगी ! प्रत्येकाचं निरनिराळं नांव घेऊन हें ऐकवा. कारण हीं नांवं म्हणजे माझ्या कानांना रसायण आणि त्रस्त हृदयाला औषधीच आहेत.

**सुमंत्रः**—महाराजांच्या आज्ञेप्रमाणंच सांगतों तरः—आयुष्मान् राम.

**दशरथ**—काय राम ? हा राम ! त्याचं नांव ऐकल्या बरोबर-मला त्याचा स्पर्श झाल्यासारखं वाटतं ! आणखी कोण बरं ?

**सुमंत्र** आयुष्मान् लक्ष्मण.

**दशरथः**—हं ! हा ! लक्ष्मण ! बरं आणखी कोण ?

**सुमंत्र**—आयुष्मती—जनकराज-कन्या.

दशरथः—हं ! ही वैदेही ! राम—लक्ष्मण—वैदेही ! पण हा क्रम नाहीं बरोबर.

सुमंत्रः—कसा असावा तर मग तो ?

दशरथः—राम, वैदेही, लक्ष्मण—असं म्हणा.

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

राम लक्ष्मण या दोघां—। मध्यें सीतेस राहुं दे ।
विपिनीं संकटें नाना । राहूं दे म्हणुनी मधें ॥ १५ ॥

सुमंत्र—हं ! हें ठीक आहे, तसंच. आयुष्मान् राम,—

दशरथ—हं, हा राम !

सुमंत्रः—आयुष्मती जनकराजकन्या,—

दशरथ—हं ! ही वैदेही !

सुमंत्रः—आयुष्मान् लक्ष्मण.

दशरथः—हं ! हा लक्ष्मण ! हे रामा ! हे वैदेहि ! हे लक्ष्मणा ! या, या बाळांनो, आणि भेटा मला एकदां कडकडून !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

एकदांही जरी होई । स्पर्श, वा रामदर्शन, ।
तेणें सुधेपरी मातें । पुन्हा येईल जीवन ! ॥१६॥

सुमंत्रः—शृंगिवेरपुराला पोंचल्यावर, रथावरून खालीं उतरून, अयोध्येकडे तोंड करून उभे राहून, सगळ्या जणांनींच महाराजांना शिरसाप्रणाम करून विज्ञापना करायला सुरवात केली, तोंच—

आर्या. [ गीति. ]

चिंतित दिसले कांहीं वचनोत्सुक अधरही तसे स्फुरले ।
बाष्पस्तंभित कंठें परि ते निर्वच वनाकडे वळले ! ॥ १७ ॥

दशरथः—काय,—तर मग कांहीं एक न बोलतांच वनाकडे निघून गेले ?

( द्विगुणित मूर्च्छा येते. )

सुमंत्रः—( गडबडून ) बालाके ! अमात्यांना जाऊन कळवा कीं,—महाराज अगदीं अत्यवस्थ स्थितीला येऊन पोचले आहेत.

कांचुकी०—ठीक आहे. [ जातो.

दोघी देवीः—महाराज ! सावध व्हा ! सावध व्हा !

दशरथः—( किंचित् सावध होऊन ) कौसल्ये !

आर्या. [ गीति. ]

मम नयनास न दिसे, स्पर्श तरी तूं करी मदंगास ।
रामीं गेलें मन्मन, परतुन येई न तें ठिकाणास ! ॥ १८ ॥

कुमारा रामा ! मी जें अगदीं एक सारखा विचार करून ठरवून टाकलं होतं कीं:—

श्लोक. [ वृत्त—शा. वि. ]

राज्यीं स्थापुनिया तुला, करुनिया तेणें कृतार्थ प्रजा—।
सल्लाभें नृपतीचिया, निरखुनी तैसें त्वदीयानुजा ॥
तेंवी सांगुनि तूज कीं, करि तयां संपन्न वा त्वत्सम ।
जावें मोदभरें वनास मग, हा हेतू मनींचा मम ॥
आशा ज्यां धरिल्या अशा मनिं, परी त्या सर्व एकक्षणीं ।
केल्या कैकयिनें विनष्ट! जगिं ह्या मी एक पापाग्रणी ! ॥ १९ ॥

सुमंत्र, कैकेयीला असं सांगाः—

श्लोक. [ वृत्त—इ. व. ]

तो राम गेला, प्रिय होवुं तूतें ! । मत्प्राणही टाकुनि जाति मातें ।
आणीव आतां झणिं आत्मजातें ! । येवो तुझें पाप तुला फळातें ! ॥२०॥

सुमंत्रः—जशी महाराजांची आज्ञा.

दशरथः—( वर पाहून ) अरे, रामासंबंधाचं हें वृत्त ऐकून दग्ध झालेल्या माझ्या अंतःकरणाच समाधान करण्याकरितां हे माझे स्वर्गीय पितर आले आहेत ! कोण आहे रे तिथं ?

[ कांचुकीय येतो. ]

कांचु०—महाराजांचा विजय असो.

दशरथः—पाणी आण पाहूं जरा.

कांचु०—जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन पुन्हा परत येतो ) महाराजांचा विजय असो. हें पाणी.

दशरथः—( आचमन करून, पाहून )

श्लोक. [ वृत्त–पुष्पिताग्रा. ]

सुरपति–सख, हे दिलीपराज!
रघु, अज, तात मदीय येथ आज ॥
स्वमनिं धरुनि काय हेतु आलां?
पितृ–सहवास घडो भवत्सुताला ! ॥ २१ ॥

रामा ! वैदेहि ! लक्ष्मणा ! मी इथून निघून आतां पितरांच्या संन्निध जात आहे. हे पितर हो ! हा–हा आलोंच मी ! [ मूर्च्छा येऊन पडतात. ]

[ कांचुकीय आच्छादन घालतो. ]

सर्वः—हाय ! हाय ! महाराज ! हाय ! हाय ! महाराज !

[ सर्व जातात. ]

दुसरा अंक समाप्त.

# अंक ३ रा.

—⁓—

[ नंतर सुधाकार प्रवेश करितो. ]

सुधाकार:—(झाडलोट वगैरे सर्व कामं उरकून) आर्य संभवकांनीं सांगितलेलीं सर्व कामं तर उरकून टाकलीं, आतां क्षणभर पडावं.

( भट प्रवेश करितो. )

भट—( चेटाजवळ जाऊन त्यास ताडन करून ) अरे, रांडलेका! निजलास कां? काम कां नाहीं करीत? ( त्याला मारितो. )

सुधाकार:—(जागा होऊन) मार, मार तूं मला.

भट:—हा मारतों! काय—करणार काय तूं मारलं तर?

सुधाकार:—मी दुर्दैवी—मला कार्तवीर्यासारखे हजार हात नाहींत!

भट:—हजार हात असते तर तूं काय केलं असतंस रे?

सुधाकार:—तुला ठार केलं असतं!

भट:—ये, रांडलेका! तुला आतां ठार केल्याशिवाय नाहींच सोडीत!

( पुन्हां मारतो. )

सुधाकार:—( रडून ) पण माझा अपराध काय आहे?

भट:—छे: छे: नाहीं,—अपराध नाहींच कांहीं तुझा! अरे, मी तुला सांगितलं नव्हतं का कीं:—कुमार रामाच्या राज्यभ्रंशामुळं स्वर्गवासी झालेल्या दशरथ महाराजांचं प्रतिमामंदिर पाहावयाला आज कौसल्यादि साऱ्या अंत:पुरांतील राजस्त्रिया इथं येणार आहेत म्हणून? त्या संबंधानं आतांपर्यंत तूं काय काय काम केलंस?

सुधाकार:—पहा—पहा तरी बाबा, मी काय काम केलं आहे तें:—देवळाच्या गाभाऱ्यांत कबूतरांच्यासाठीं बांधलेल्या दोऱ्या मी काढून टाकल्या आहेत, भिंतींना चुना देऊन त्यांवर चंदनाचीं पांच पांच बोटें सगळीकडे उठविलीं आहेत, दरवाजांवर फुलांच्या माळा टांगून ते शृंगारले आहेत, वाळू पसरली आहे! आतां तुम्हींच सांगा बरं कीं,—मी केलं नाहीं असं काय आहे?

भटः—असं असेल, तर जा, खुशाल जा तूं आतां. मीहि पण जाऊन सर्व तयारी केली असल्याचं अमात्यांना कळवितो.

[ दोघेहि जातात. ]

(प्रवेशक समाप्त.)

[ तदनंतर रथासह भरत व सूत येतात. ]

भरतः—( उमाळा येऊन ) सूता ! फार दिवस मामांच्याकडे राहि ल्यामुळं मला अयोध्येकडची कांहींच हकीकत समजली नाहीं. मी असं ऐकलं आहे कीं, महाराज फार आजारी आहेत म्हणून. तर सांग पाहूं—

श्लोक [ वृत्त—शिखरिणी. ]

व्यथा ताता कैची ?—

सूतः— हृदय—परितापेंचि पिडिले ॥

भरतः—निदाना वैद्यानीं ?—

सूतः— नच ठरविलें, सर्व थकले ! ॥

भरतः—बरें, निद्रा ? खाणें ?—

सूतः— निजति धरणीं, अन्न त्यजितीं ॥

भरताः—असे आशा ?—

सूतः— दैव—

भरतः— प्रवल !—रथ हांकी द्रुतगती ! ॥१।

सूतः—जशी कुमारांची आज्ञा [ रथ हांकतो ].

भरतः—( रथवेगाचा अभिनग दाखवून ) अहाहा ! काय ह रथाचा वेग ?

श्लोक [ वृत्त—शिखरिणी ]

रथाच्या या वेगें दिसति जणुं झाडें पळत तीं ।
रथाच्या चक्रांनीं उडुनि धुळ ती जाय निगुती ॥
परी त्यांच्या पंक्तीं पुनरपि धुळीनेंचि भरती ॥
नदीच्या लाटांची कृति अनुभवा येत जणुं ती ।
अरा चक्रांच्या या दिसति न मुळीं, मात्र दिसतें—
रथाच्या चक्रांचें वलय, जव--योगें न फिरतें !

खुरांनीं अश्वांच्या उडति रज जे, जाति पुढती ।
हयांच्या वेगाचें विभव अवघें ते प्रकटती ! ॥ २ ॥

सूतः—कुमार ! इथल्या वृक्षांना जलसिंचन केलेलं दिसतं, यावरून अयोध्या जवळ आली असावी असं वाटतं!

भरतः—स्वजनानां भेटायला उत्सुक झालेल्या माझ्या मनाची किती लांबवर धांव ही ? आतांच मला असं वाटतं आहे कीं:—

श्लोक [ वृत्त—लघुदंडक. ]

गमत मजशिं म्यां जणूं ठेविलें मस्तका माझिया तात–पादांवरी ॥
उठविति मज तात ते प्रेम–भावें पहा, वंदितां तोषुनी स्वांतरीं ॥
त्वरित निकट बंधुही पातले; त्या तशा मातृदेवी तिघी धांवुनी ॥
भिजविति जणुं त्या मला स्वाश्रुपातें, तदा मीहि गेलों पहा मोहुनी ! ॥
"नृपति–सदृश हे किती ! पिंड बांधाहि हा त्या नरेंद्रा परी भासतो"!॥
वदति सकल भृत्य ते एकमेकांमधें, मीहि तें या स्तवें हर्षतों ॥
स्तुति–मुदित अशा मला लक्षि सौमित्रि, मद्भाषणा तेंवि वेषाप्रती ॥
हंसत हलुंच गालिं तो ! दृश्य हें देखतों मन्मनश्चक्षुनीं संप्रती ॥३॥

सूतः—( आत्मगत ) हाय ! हाय ! कुमारांना महाराजांच्या मृत्यूची वार्ता न कळल्यामुळें हे मोठी आशा बाळगून अयोध्येला जात आहेत; पण परिणामीं ती निष्फळ होणार ! हें आम्हांला ठाऊक असून देखील सांगण्याचा धीर होत नाहीं ! कारण त्या तीन गोष्टी—

आर्या–( गीति. )

प्राणत्याग पित्याचा, मातेचा लोभ वैभवा साठीं, ।
वनगमन अग्रजाचें, वदवति कवणास अशुभ या गोष्टी ? ॥ ४ ॥

[ भट प्रवेश करितो. ]

भटः—कुमारांचा विजय असो.

भरतः—अरे, हें सांग पाहूं–माझा शत्रुघ्न आला आहे कां ?

भटः—कुमार यायला निघाले आहेत. पण कुमारांना उपाध्यायांचं असं म्हणणं आहे कीं:—

भरतः—काय ! काय म्हणणं आहे ?

भटः—कृत्तिका नक्षत्र आणखी एक घटकाभर उरलं आहे; तेव्हां रोहिणी नक्षत्र लागल्यावर कुमारांनीं अयोध्येंत प्रवेश करावा.

भरतः—ठीक, तसंच करू. गुरुजनांचं वचन या पूर्वी देखील मी कधींच मोडलेलं नाहीं. जा तूं.

भटः—जशी कुमारांची आज्ञा. [ जातो.

भरतः—आतां कोणच्या ठिकाणीं बरं विश्रांति घ्यावी ! ठीक, असंच करावं. ह्या झाडी मधून एक मंदिर दिसतं आहे, इथंच एक मुहूर्तभर विश्रांति घ्यावी; म्हणजे दोन्हींहि होतील,—देवदर्शन आणि विश्रांति. शिवाय नगरप्रवेश करण्यापूर्वी , बाहेर—जवळपास—थोडा वेळ बसून, मग नगरांत जावं असा शिष्टसांप्रदाय आहे. तेव्हां थांबीव आतां रथ इथंच.

सूतः—जशी आयुष्मान्‌नांची आज्ञा. ( रथ थांबवितो. )

भरतः—( रथावरून खालीं उतरून ) सूता ! घोड्यांना एका बाजूला विश्रांति घेऊं दे.

भटः—जशी कुमरांची आज्ञा. [ तो जातो.

भरतः—( कांहीं पुढें जाऊन, पाहून ) इथं हीं फुलं आणि लाह्या देवांना वाहिलेलीं दिसतात, यावरून इथं पूजन झाल्याचं उघड होत आहे; भिंतीवर चंदनाची पांच बोटं सगळीकडे उठविलेलीं दिसताहेत, दरवाजावर फुलांच्या माळा टांगून ते शृंगारले आहेत, वाळू पसरली आहे; एखादं पर्वबिर्व आहे म्हणून हें मुद्दाम केलं आहे कां हें रोजचंच देवताकर्म आहे ? कोणत्या दैवतांचं हें स्थान असेल बरं ? इथं तर कांहीं आयुधं अथवा ध्वज वगैरेंचं बाह्यचिन्ह असं कांहींच दिसत नाहीं ! जाऊं दे, आंत गेलं म्हणजे काय आहे तें समजेल.( आंत जाऊन, पाहून ) ह्या पाषाणांच्या ठिकाणीं मानवी क्रियेनं (मनुष्याच्या हस्त-कौशल्यानं)किती माधुर्य आलं आहे ! ह्या मुर्तींत भाव कसे उत्तम उमटलेले दिसतात ! ह्या प्रतिमा दैवतांच्या म्हणून केल्या असल्या तरी ह्या मनुष्यांच्या असाव्यात असं भासतं ! ह्या चार देवतांची चौकडी इथं एका ठिकाणीं एका चौथऱ्यावर अधिष्ठित केली आहे, तेव्हां हें काय असेल बरं ? अथवा कांहीं कां असेना ! माझ्या मनाला तर ह्यांना पाहून अत्यंत हर्ष होत आहे !



**भरतः**—( कांहीं पुढें जाऊन, पाहून ) इथं हीं फुलं आणि लाह्या देवांना वाहिलेलीं दिसतात, यावरून इथं पूजन झाल्याचं उघड होत आहे. [ प्रति० पृ. ४४

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

मानुनी देवता यांना । शीर्षा नमविणें बरें ॥
जरी वृषलतुल्या ही–। मंत्रहीना नमस्कृती ॥५॥

[ देवकुलिक प्रवेश करितो. ]

देवकुलिकः—अरे, माझं नित्यकर्म आटपून मी जेवणखाण उरकण्यांत गुंतलों असतां, ह्या प्रतिमांत सामावणारी जणूं काय आणखी एक प्रतिमाच--असा हा कोण बरं या प्रतिमागृहांत शिरला आहे? कोणी असो. आंत गेलं म्हणजे समजेल. ( आंत जातो. )

भरतः—प्रणाम करितों.

देवकुलिकः—छेः छेः प्रणाम नाहीं करायचा–प्रणाम नाहीं करायचा !

भरतः—कां बरं ? तुमच्या नियमाचा अंमल मोठा कडक दिसतो ! अहो !—

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

देखुनी दोष माझ्यांत । प्रणामास निषेधितां ?
काय तें मजला सांगा । आदरूं नियमा अम्हीं ॥ ६ ॥

देवकुलिकः–ह्या कारणामुळं मी आपल्याला निषेध करितों असं नव्हे,–तर देवता समजून कोणी ब्राह्मण यांना प्रणाम करील तो मी होऊं देत नाहीं. ह्या प्रतिमा क्षत्रियांच्या आहेत.

भरतः—असं काय ? एकून हे क्षत्रिय आहेत तर ? कोण बरं हे ?

देवकुः—इक्ष्वाकुकुलांतले—

भरतः—( हर्षानें ) काय इक्ष्वाकु कुलांतले आहेत हे ? तर मग तेच हे अयोध्येचे राजे—

श्लोक [ वृत्त–सुवदना. ]

ज्यांनीं स्वर्गी सुरांना असुरपुरवधीं साह्यास दिधलें ।
ज्यांनीं त्या स्वर्ग–लोकीं निज सुकृतबलें पौरां चढविलें ॥
जे बाहूंच्या बळानें करगत करिती संपूर्ण धरणी ।
ज्यांना मृत्यू अकालीं शिवुंहि न शकला, जो स्वैर हननीं ॥ ७ ॥

तर मग अहो, अगदीं अकल्पितपणानंच म्हणायचं आज मला हें मोठं फल प्राप्त झालं आहे ! तर आतां यांपैकीं प्रथम हे कोण सांगा पाहूं.

देवकुलिकः—हे तर सर्व रत्नें एकत्र जमवून विश्वजित् नांवाचा यज्ञ करणारे, आणि त्या योगानं आपला धर्म-प्रदीप प्रज्वलित करणारे दिलीप !

भरतः—या धर्मरत दिलीपानां माझा प्रणाम असो ! आतां हे कोण तें सांगा पाहूं.

देवकुलिकः—निजायच्या वेळीं आणि उठायच्या वेळीं हजारों ब्राम्हणां-कडून पुण्याहवाचनाचा घोष करविणारे हे रघुराज !

भरतः—अहो! त्या बलवान् मृत्यूनं ही पुण्याहवाचनाची रक्षणमर्यादा देखील आतिक्रमण केलीना ? ब्रह्मवृंदांनी ज्यांचे पदरांत राज्यरूपी फल टाकलं होतं त्यांना माझा हा नमस्कार असो ! आतां हे कोण बरं सांगा पाहूं.

देवकुलिकः—आपल्या प्रियपत्नीच्या वियोगदुःखामुळं ज्यांनीं राज्यभार टाकून दिला होता, आणि नित्याच्या अवभृथ स्नानामुळं ज्यांचं पाप नाहींसं झालं होतं, ते हे अज महाराज !

भरतः—पत्नीशोकामुळं उत्पन्न झालेलं ज्यांचं वैराग्य इतकं प्रशंसनीय होतं त्यांना माझा नमस्कार असो !

( दशरथाची प्रतिमा पाहून चित्त गडबडून जाऊन ) अहो, या सर्वांच्या थोर आणि विविध कृतीं संबंधानं माझ्या मनांत अत्यंत आदर असल्यामुळें माझं मन व्यग्र होऊन गेलं होतं. त्यामुळं आपण सांगितलेलं माझ्या नीटसं लक्षांत राहिल नाहीं,-तर हे कोण तें पुन्हा सांगा पाहूं एकदां—

देवकुलिकः—हे दिलीप.

भरतः—म्हणजे—महाराजांचे पणजे ! बरं पुढें—

देवकुलिकः—हे रघु.

भरतः—महाराजांचे आजे ! बरं, पुढें हे—

देवकुलिकः—हे अज.

भरतः—म्हणजे तातांचे पिते ? कसं—कसं—म्हटलंत ?

देवकुलिकः—हे दिलीप, हे रघू, हे अज.

भरतः—आपल्याला थोडसं विचारायचं आहे. अहो,-जिवंत असलेल्यांच्या सुद्धा प्रतिमा स्थापन करितात कां ?

देवकुलिकः—छेः फक्त मृतांच्या तेवढ्याच.

भरतः—अस्सं ? बरं तर,—मी येतो आतां.

देवकुलिकः—थांबा.

[ आर्या—गीति. ]

स्त्रीशुल्काच्या साठीं राज्य, प्राणहि विसर्जिले ज्यानें ।
त्या दशरथ–मूर्ति विषयिं पुसशि कां न कुतुकानें ? ॥ ८ ॥

भरतः–हा तात ! हा तात ! ( मूर्छित होऊन पडतो, पण पुन्हां शुद्धीवर येऊन ).

श्लोक [ वृत्त–हरिणी. ]

श्रवण करि, जें ऐकायाला मदीय मना ! भिशी ।
पितृ–निधन तें ऐके ज्याच्या भयाप्रति वाहशी ! ॥
धृति धरित मी,–ही शुल्काची कथा परि झोंबते !
निधन गमतें मत्तातांचें सकारण होत तें ! ॥
वचन जरि या शुल्काचें हें असें मज लक्षुन ! !
तनुस कवण्या प्रायश्चित्तें करूं तरि पावन ? ॥ ९ ॥

आर्या !—

देवकुलिकः—काय ' आर्य ' म्हणतां ? हें वळण इक्ष्वाकु–कुलजांचं दिसतं. तर आपण कैकेयी–पुत्र भरत तर नव्हेना ?

भरतः—होय, होय. मी भरतच; दशरथ–पुत्र भरत, कैकेयी–पुत्र नव्हे !

देवकुलिकः—अस्सं ! तर मग मी आतां निरोप घेतों आपला !

भरतः—थांबा, उरलेली हकीकत सांगा पाहूं मला.

देवकुलिकः—काय करायची ती ? ऐकावी कुमरांनीं:–दशरथ महाराज विराम पावले. पण राम,–सीता आणि लक्ष्मण यांच्यासह-जे वनाला गेले, त्याचं कारण काय तें मात्र मला ठाऊक नाहीं !

भरतः—काय–काय ? आर्य रामहि वनाला गेले ? ( द्विगुणित मूर्च्छित होतो. )

देवकुलिकः—कुमार ! सावध व्हा, सावध व्हा.

भरतः—( सावध होऊन )

श्लोक ( वृत्त–अनुष्टुप. )

शून्य ती तात, बंधूंनीं । अयोध्या,–वन होतसे ! ।
आशेनें त्या अयोध्येतें–। जातां, स्पष्टचि कीं दिसे ॥
जल–शून्य नदीतीरा । मी तृषाकुल जातसें ! ॥ १० ॥

आर्या ! ही हकीगत जर विस्तारानें ऐकायला मिळेल तर माझं म
जरा स्थिर होईल. तर कांहीं एक शिल्लक न ठेवतां सर्व हकीकत सां
पाहूं.

देवकुलिकः—ऐका,तर मगः—महाराज दशरथ,—कुमार रामांना अभिषे
करीत होते, इतक्यांत आपल्या मातोश्रींनीं त्यांना असं सांगितलं कीः—

भरतः—थांवा—

श्लोक [ वृत्त—सुवदना. ]

ध्यानीं आणूनि शुल्का, नृपति—मृदुलता, तद्दत्त वचना,—
" द्या राज्या मत्सुतातें"—जननि वदलि ना? तातां—नृपतिनां?
धैर्ये उत्साहिता ती वचन वदलि ना? "रामा ! विपिनिं जा"
गेला ना राम सांगा ? प्रिय तदनुजही, तेंवी जनकजा ? ॥
त्या आर्यां चीरबद्धां बघुनि, नृपतिनां आलें निधन तें ॥
वात्सल्याची कसोटी जणुं पितृ—निघनें लोकीं प्रकटते ॥
"धिक्! धिक्! धिक्!" या प्रलापांसदृश इतरही सारे पुरजन
काढूनी निंदिती ना मजशिं ? अनुदिनीं रोषा प्रकटुन ! ॥११

( मूर्च्छा येऊन पडतात. )

[ पडद्यांत. ]

" आर्य हो ! दूर व्हा, दूर व्हा ! "

देवकुलिकः—( पाहून ) अरे !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

वेळींच पातल्या माता । होतां हा पुत्र मूर्च्छित ।
जननीचा करस्पर्श । होई जणुं जलांजली ! ॥ १२ ॥

[ इतक्यांत तिघी राण्या व सुमंत्र येतात. ]

सुमंत्रः—असं इकडून यावं देवींनीं.

श्लोक [ वृत्त—विभावरी. ]

असत हें नरपति—प्रतिमा—गृह ॥
अधिक उच्च ! नृपहर्म्य सुदुःसह ! ॥
पथिक लोक किति यांत प्रवेशिती ।
न परि त्यां कवणही अटकाविती ॥ १३ ॥

( आंत प्रवेश करून पाहून ) देवींनो ! नका, नका—आपण आंत येऊं नका·—!

आर्या ( गीति. )

पडले कोण इथें हे—? पार्थिव हे तरुण कोणि तरि दिसती ! ।
देवकुलिकः—परशंका कां घेतां ? उठवा यां तरुण भरत हे असती !॥१४॥

[ जातो.

तिघी देवीः——( एकदम जवळ जाऊन ) हाय ! हाय ! बाळा, भरता !

भरतः——( थोडा सावध होऊन ) आर्ये !

सुमंत्रः—विजय असो महा—( असें अर्धेच म्हणून, विषादपूर्वक. ) अहो ! आवाजांतहि सादृश्य ! तोच आवाज ! मला वाटलं,—प्रतिमारूपांत असलेले महाराजच बोलताहेत कीं काय ?

भरतः—(देवकुलिकास) बरं, मग पुढं मातांची काय बरं अवस्था झाली ?

देवीः——बाळा ! ही पहा आमची अवस्था ! ( तोंडावरील अवगुंठनें दूर करितात. )

सुमंत्रः——देवींनो ! आपल दुःख आवरून धरा.

भरतः—( सुमंत्रांना पाहून ) सारे शिष्टाचार पाळले जाताहेत यावरून मला असं वाटतं कीं,—तात ! आपण सुमंत्रच नव्हे कां ?

सुमंत्रः—कुमारा ! होय, मी सुमंत्रच आहे.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

मी ज्यांच्या जवळीं सदा वसतसे, तो मी तयां टाकुनी ।
झालों वैरिच दीर्घकाल जगुनी ! हें जांचतें मन्मनीं !
गेला घेउनि काल तो नृपवरां ! अद्यापि आम्हीं तरी—
हा ! त्यांच्या बसुनी रथांत, धरितो त्या अश्वरश्मी करीं ! ॥१५॥

भरतः—हाय ! हाय ! तात ! ( उठून ) तात ! मी मातांना कोणच्या क्रमानं नमस्कार करावे तें आपण सांगावं,—अशी माझी इच्छा आहे.

सुमंत्रः——ठीक आहे. ह्या कुमार रामांच्या जननी-देवी कौसल्या.

भरतः—आई ! हा निरपराधी असा मी आपल्याला अभिवादन करीत आहे.

**कौसल्या**—बाळा ! कष्टी होऊं नकोस.

**भरतः**—( आत्मगत ) ही पर्यायानं माझी निंदाच आहे असं मला वाटतं ! (उघड) अनुग्रह झाला हा माझ्यावर. ( सुमंत्रास ) आतां पुढं ?—

**सुमंत्र**—ह्या कुमार लक्ष्मणाच्या जननी,—देवी सुमित्रा.—

**भरतः**—आई ! आपल्याला मी नमस्कार करितों. रामाबरोबर वनवासांत जाणाऱ्या आपल्या लक्ष्मणानं मला फसवलं !

**सुमित्राः**—बाळा ! यशस्वी हो !

**भरतः**—आई ! या करितां मी प्रयत्न करीन. अनुग्रह झाला हा माझ्यावर.

( सुमंत्रास ) आतां पुढं ?—

**सुमंत्रः**—ही आपली जननी—

**भरत**—(क्रोधानें उठून उभा राहून ? ) हा पापिणी !

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

ही एक, ही दुजी माता ! । यां मध्यें तूं न शोभशी ।
ह्या गंगा—यमुना मध्यें । घुसशी कुनदी जशी !॥ १६ ॥

**कैकेयी**—बाळ ! मी काय—केलं तरी काय असं ?

**भरतः**—काय केलं म्हणून विचारतेस ?

श्लोक [ वृत्त—हरिणी. ]

अयश मजला, रामा चीरा, नृपा गृह—मृत्युतें ।
सतत रुदितें साऱ्या पौरां, दिलीं कुणि सांग तें ? ॥
मृगवसति त्या सौमित्राला, स्नुषेप्रति आपदा ।
प्रिय सुत अशा होशी मातांप्रती किति दुःखदा ? ॥
परुष वचनें "धिक् धिक्!" ऐशीं स्वतः प्रति जोडिलीं ।
वद, वद, अशीं दुष्कृत्यें हीं कशीं प्रिय वाटलीं ? ॥१७॥

**कौसल्याः**—वत्सा ! तुला सारे शिष्टाचार समजतात, मग तूं आपल्या मातेला कां बर वंदन करीत नाहींस ?

**भरतः**—काय,—माता ? माता म्हणता ? तुम्हीं माझ्या माता. हा मी तुम्हांला प्रणाम करितों.

**कौसल्याः**—नाहीं, नाहीं. हीच तुझी जन्मदात्री माता.

**भरतः**—पूर्वी होती; पण आतां नाहीं ! तुम्हींच पहाः—

श्लोक– [ वृत्त–शालिनी. ]

शीलभ्रष्टा शील–दोषें स्वतःच्या।
पुत्रस्नेहा त्यागुनी अंतरींच्या ॥
पुत्रालाही जी करी हा! अपुत्र। ॥
माता कैशी ते गणावी पवित्र ? ।
भर्तृ–द्रोहा जोडिते ती, न माता ॥
पुत्रांच्याही आपुल्या त्या अमाता ! ॥
लोकीं धर्म स्थापितों मी नवीन!
कीं,–माता जी दुष्ट, माताच ती न ! ॥ १८ ॥

**कैकेयीः**—बाळा ! महाराजांचं सत्यवचन पाळलं जावं म्हणून मी तसं म्हटलं.

**भरतः**—कसं,–कसं म्हटलंस ?

**कैकयीः**—माझा पुत्र राजा व्हावा म्हणून.

**भरतः**—तर मग आर्य राम तरी तुझा कोण ?

आर्या [ गीति. ]

औरस तात–सुत न कां, ज्येष्ठहि सर्वांत तो न कां आर्य ?॥
द्वेष करी कां अमुचा ?–नव्हता रुचत प्रजेस तो काय ?॥ १९॥

**कैकेयीः**—बाळा ! शुल्काबद्दल जिला लोभ असेल तिला विचार हें !

**भरतः**— दिंडी–छंद.

नृपश्रीतें घेतलें हिरावूनी ।
तुवां रामा सजविलें वल्कलांनीं !
पादचारी सह-भार्य आर्य गेला ॥
त्वदाज्ञेनें वनवास त्यास आला !
समावें हें शुल्कांत सकल काय ?
म्हणुनि त्याला धाडिलें वनां, हाय! ॥ २० ॥

**कैकेयीः**—योग्य वेळीं आणि योग्य ठिकाणीं तें मी तुला सांगेन.

**भरतः**— श्लोक. [वृत्त–वसं. ति.]

वाटे जरी तुजसि लोभ अकीर्तिचा त्या।
तें सांगण्यांत मज, लाभ तुला कशाचा ? ॥

होती जरी तुजशिं हांव नृपाधिकारीं ।
ती तात कां पुरवते न तशा प्रकारीं ? ॥
हें राज-मातृ-पद गे! जरि इष्ट तूतें ।
ते राम काय तंव पुत्र न सांग होते ? ॥ २१ ॥

तूं फार वाईट गोष्ट केली आहेस:—

श्लोक-[ वृत्त-शा. वि. ]

तुवां राज्येच्छेनें नृपति-असुनांही न गणिलें ।
तसें ज्येष्ठा पुत्रा निघुनि वनिं जाया कथियलें ॥
न फाटे हें तूझें हृदय वधुचें चीर बघुन !
अहा! धाता केंवी हृदय तुज दे वज्र-कठिण ! ॥ २२ ॥

**सुमंत्रः**—कुमार ! हे वसिष्ठ वामदेव प्रजाजनांसह अभिषेकाची सामग्री घेऊन आपल्याला सामोरे आले असून, आपल्याला अशी विज्ञप्ति करीत आहेत कीं,—

श्लोक- [ वृत्त-अनुष्टुप. ]

गोपालाऽरक्षिता गाई । जातात विलयाप्रती ।
नृपाविणें प्रजा तैशा । जगतीं नाश पावती ॥ २३ ॥

**भरतः**—प्रजा येऊं देत की माझ्या मागोमाग.

**सुमंत्रः**—म्हणजे ? हा अभिषेक सोडून, आपण कुणीकडे निघाला ?

**भरतः**—काय ? अभिषेक ! तो आमच्या ह्या मातुश्रींना करा !

**सुमंत्र**—आणि आपण कुठं जाणार ?

**भरतः**—

श्लोक [ वृत्त- भु. प्र. ]

जिथें तो असे लक्ष्मण-प्रेमकंद ।
तिथें चाललों, ओढितो भ्रातृ-बंध ॥
अयोध्या न ती, जेथ तो राम नाहीं ।
अयोध्याच ती जेथ तो राम राही ! ॥ २४ ॥

( सर्व जातात. )

तिसरा अंक समाप्त.

# अंक ४ था.

[ नंतर दोन चेटी प्रवेश करितात. ]

**विजयाः**—अगं नंदिनिके ! सांग, सांग तर खरी–आज कौसल्यादि सर्व अंतःपुरांतली मंडळी प्रतिमागृह पाहायला गेली होती आणि तिथं कुमार भरताची गांठ पडली म्हणे ? मी मंदभागीं माझी देवडीवर नेमणूक झाल्यामुळं तिथंच अडकून पडलें मी !

**नंदिनिकाः**—अग, आम्हीं कितीतरी कौतुकानं कुमार भरताला पाहिलं !

**विजयाः**—कुमार,–देवी कैकेयींना काय म्हणाले ?

**नंदनिका**—काय म्हणाले ? हंः ! त्यांचं मुखावलोकन देखील करण्याची त्यांची इच्छा नव्हती !

**विजया**—हाय ! हाय ! हिनं राज्यलोभाच्या पायीं कुमार रामचंद्राला राज्यभ्रष्ट केलंन, आपल्या स्वतःवर वैधव्य ओढवून घेतलंन, आाण अयोध्येतल्याहि पण सगळ्या लोकांचं वाटोळं करून टाकलंन. खरंच, किती निष्ठुर देवी ! घोर अपराध केला तिनं !

**नंदनिका**—अग, ऐक तर खरी. प्रजाजनांनीं नेलेल्या अभिषेकाच्या सामुग्रीचा त्याग करून, कुमार भरत राम–तपोवनाकडे निघून गेले !

**विजया**—[ खेदयुक्त ] हं ! अस्सं ? एकून कुमार गेले तर ? नंदिनिके ! चल, आपण दोघोंहि देवी कैकेयींच्याकडे जाऊ या.

( दोघी जातात. )

[ तदनंतर रथांतून भरत, सुमंत्र व सूत येतात. ]

**भरत**— श्लोक. [ वृत्त व. ति. ]

जातां नृपाल सुकृतासह देव–लोकीं ।
मी जात या पुरजनाश्रुसवें वनीं कीं ॥
रामाख्य जो अपर चंद्रचि या जगांत ।
त्या पाहण्या मन तपोवनिं धांव घेत ! ॥ १ ॥

**सुमंत्रः**—हा–हा आयुष्मान् भरत,–

श्लोक. [ वृत्त–शा. वि. ]

ज्या भूपें असुरेंद्र–गर्व मथिला त्याचाच कीं पुत्र हा ।
जो वेंची विभवास सर्व अपुल्या यज्ञार्थ तत्पौत्र हा ॥
राजाला प्रिय जो, जगत्प्रियहि जो श्रीराम, तद्बंधु हा ।
रामा योग्य अशा पथा धरुनिया जाई वनातें पहा ! ॥२॥

भरत—अहो, तात !

सुमंत्र—कुमार! हा मी इथं आहें.

भरत—तात! माझे आर्य राम कुठें आहेत ? ते महाराजांचे प्रतिनिधि कुठें आहेत ? साऱ्या बलवानांचा आदर्शभूत असा तो राम कुठं आहे ? राज्यलुब्ध कैकेयीला आपल्या वर्तनानें लाजविणारा तो राम कुठं आहे ? यशाचं पात्र होऊन राहिलेला तो राम कुठं आहे ! तो नरपतींचा खरा पुत्र कुठं आहे ! तो सत्यव्रताला वाहून घेणारा राम कुठं आहे ?

साकी.

मम जननीचें प्रिय साधाया, वैभव ज्यानें त्यजिलें ।
तें मम दैवत परम,–पहाया मन्मन उत्सुक झालें ॥ ३ ॥

सुमंत्रः—कुमार! याच आश्रमांत,–

श्लोक. [ वृत्त–अनु० ]

श्रीराम, जानकी, आणि । सौमित्री येथ राहती ।
सत्य, शील, तशी भक्ती । मूर्त ज्यांच्यांत नांदती ॥४॥

भरत ( सूतास ) अरे, तर मग इथंच उभा कर रथ.

सूतः—जशी कुमारांची आज्ञा. ( तसें करितो. )

भरतः—(रथांतून उतरून) घोड्यांना एका बाजूला नेऊन विसावा दे.

सूतः—जशी कुमारांची आज्ञा. [ जातो.

भरतः—( सुमंत्रास ) अहो, तात ! कळवा, रामाला जाऊन कळवा.

सुमंत्रः—कुमार ! काय म्हणून कळवूं ?

भरतः—राज्यलुब्ध कैकेयीचा पुत्र भरत आला आहे म्हणून.

सुमंत्रः—कुमार ! वडिलांच्या संबंधानं असं निंदापर भाषण बोलणं आतां पुरे झालं.

भरतः—बरोबर आहे. खरंच, दुसऱ्यांच्या दोषांचा उच्चार करणं न्याय्य नव्हे. तर मग असं कळवा कीं, इक्ष्वाकु कुलाला खालीं पहायला लावणारा भरत तुमच्या दर्शनाची इच्छा करीत आहे !

सुमंत्रः—कुमार ! माझ्यानं असं सांगवणार नाहीं. भरत आला आहे, एवढं मात्र मी सांगेन.

भरतः—छे ! छे ! नुसतं नांव सांगणं म्हणजे अपराधाबद्दल प्रायश्चित्त न भोगणं—अशा सारखं हें होतं असं वाटतं मला ! अहो, ब्रह्महत्या करणाऱ्यांची वर्दी सुद्धां दुसऱ्यांनीं कां दिली पाहिजे ? तर मग तातांनीं स्वस्थच रहावं. मी स्वतःच आपली वर्दी देतों. ( मोठ्यानें ) अहो ! अहो ! पितृवचन पाळणाऱ्या आर्य राघवांना जाऊन कळवा कीं:—

आर्या—( गीति. )

प्राकृत, कृतघ्न, निर्दय, साहस--वृत्ती असा कुणी भावें ।।
आला दर्शन घ्याया, थांबावें कीं, तयें निघुनि जावें ? ।। १५ ।।

[ नंतर रामचंद्र सीता व लक्ष्मण यांसह प्रवेश करितात. ]

रामः—( ऐकून सहर्ष ) लक्ष्मणा ! तूं ऐकतो आहेस कां हें ? जानकि ! तुलाहि ऐकूं आलं ना ?

श्लोक. [ वृत्त—प्रहर्षिणी. ]

तातांच्या सदृशचि हा ध्वनी कुणाचा ?--
गांभीर्यें परिभावि जो ध्वनी घनाचा ! ।।
बंधू हा, अशि उपजे मनांत आशा ।
हा कर्ण--प्रिय रव, दे अपूर्व तोषा ! ।। ६ ।।

लक्ष्मणः—आर्य ! माझ्या मनांत देखील हा आवाज बंधु—विषयक आदरभाव जागृत करीत आहे.

श्लोक. [ वृत्त—स्रग्धरा. ]

आहे आवाज मोठा मृदु, मधुर, असा मत्तनंदिध्वनीच ।
तैसा गंभीरही हा शुक--कलरवसा गोड कंठी तसाच ।।
वेगातें ह्या ध्वनीच्या अटक न कसली, मुक्तसंचार याचा ।
योग्य स्थानींच पोंचे, पृथक पृथक तो नाद सर्वाक्षरांचा ।।

तेथोनी जो पहा, हा स्फुट विशदपणें,--काढितो वर्णमाला ।
तो वाटे चारि वर्णा अभय वितरण्या सत्य उद्युक्त झाला ! ॥७॥

रामः—कोणत्याहि प्रकारें पाहिलें तरी हा आवाज आमच्या बंधुजनाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाचा नाहीं हें खास. हें पहा,—ह्यानं माझं हृदय पाझरूं लागलं आहे. तर वत्सा, लक्ष्मणा ! पहा बरं कोण आहे तें.

लक्ष्मणः—जशी आर्यांची आज्ञा. ( इकडे तिकडे फिरतो. )

भरतः—अरे ! कोणीच कसं उत्तर देत नाहीं ?—काय ? कैकेयीचा पुत्र—मी भरत इथं आलों आहे हें त्यानीं ओळखलं तर नसेल ?

लक्ष्मणः—( त्याला पाहून ) अरे ! हे तर आर्य राम ! छेः छेः त्यांच्या सारखं रूप आहे, एवढेंच !

श्लोक [ वृत्त– हरिणी. ]

मुखकमल हें आर्यांचें कीं शशांक–मनोहर ।
पितृसमचि हा भासे याचा सुपुष्ट तसा उर ॥
द्युतिवलयिता तेजोमूर्ती जगत्प्रियदर्शन ।
नृपति, मघवा, कीं आहे हा प्रभू मधुसुदन ? ॥ ८ ॥

( सुमंत्रास पाहून ) अरे ! हे तात सुमंत्र !

सुमंत्रः—अरे ! हा कुमार लक्ष्मण !

भरतः—अस्सं ! तर मग हे माझे वडील बंधू ? (लक्ष्मणास) आर्य ! मी आपल्याला प्रणाम करितों.

लक्ष्मणः—ये ! ये ! आयुष्मान् हो. ( सुमंत्राकडे पाहून ) कोण हे ?

सुमंत्रः—कुमारा,–

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

चतुर्थ रघु पासूनी । अजा पासूनि तीसरा ।
प्रख्यात तुझिया ताता–। पासूनि दुसरा असे ॥
ज्या वंशकेतु रामाचा । धाकटा बंधु तूं स्वतः ।
त्या वंशकेतुचा हाही । बंधू भरत गा ! असे ॥ ९ ॥

लक्ष्मणः—( भरतास ) ये, ये. इक्ष्वाकुकुलजा ये. वत्सा ! तुझं कल्याण असो; आयुष्मान् हो.

श्लोक [ वृत्त–स्रग्धरा. ]

कोशा यज्ञार्थ साऱ्या नृपवर रघुनीं वेंचुनी, ते गुणांचे— ।
झाले भांडार तेजोमय नृपति, तसें तूं धरी तेज त्यांचें ॥
दैत्यांशीं झुंज घेतां निज करिं धरिलीं वज्रतुल्यें धनुष्यें– ।
इक्ष्वाकू वंशजांनीं, अनुपम बल तद्वीर्यही थोर तैसें ॥
यत्नें संपादुनी तीं अमित गुणयशें, तूंहि राजेंद्र होई ।
स्वर्गस्थां पूर्वजातें गुणकृति तव ही होवुं संतोषदायी ॥ १० ॥

भरतः—अनुग्रहच झाला हा माझ्यावर.

लक्ष्मणः—कुमारा ! इथंच उभा रहा. तूं आल्याचं मी आर्यांना कळवितों.

भरतः—आर्या ! आतां त्यांना अभिवादन करायला मी अगदीं अधीर झालों आहे. लौकर कळवा तर त्यांना.

लक्ष्मणः—ठीक आहे. ( रामाजवळ जाऊन ) आर्यांचा विजय असो; आर्य !:—

श्लोक [ वृत्त–रथोद्धता. ]

पातला दयित बंधु सोज्वल । हा इथें भरत बंधुवत्सल ।
दर्पणापरि जयांत आपुलें–। मूर्त रूप जणुं काय बिंबलें ! ॥११॥

रामः—वत्सा, लक्ष्मणा ! तर मग भरत आला आहे इथं ?

लक्ष्मणः—होय, आर्य !

रामः—मैथिलि ! भरताला पाहण्याकरितां तूं आपले डोळे पूर्ण विशाल कर.

सीताः—आर्यपुत्र ! काय भरत आले ?

रामः—होय, मैथिलि !

आर्या–( गीति )

आजच मज तें कळतें दुष्कर कृतिचें स्वरूप तातांच्या ॥
भ्रातृस्नेह असा जरि, तरि पुत्रस्नेह तो असे कैचा ! ॥ १२ ॥

लक्ष्मणः—आर्य ! तर कुमारांना आंत येऊं दे का ?

रामः—वत्सा, लक्ष्मणा ! एकून, तूं मला आपल्या इच्छेनुसार वागा-

यला लावण्याचीच इच्छा करितोस म्हणायची ? जा, जा. कुमाराला सत्कारपूर्वक लौकर आंत घेऊन ये.

लक्ष्मणः—जशी आर्यांची आज्ञा.

रामः—अथवा तूं थांब जरा—

श्लोक [ वृत्त–उपजाति. ]

तुषारपूर्णोत्पलपत्रनेत्रा ।
हर्षाश्रुतें ढाळित हे पवित्रा ॥
देवी स्वयें जाउनिया कुमारा ।
आणो इथें, सत्वरि सौख्यसारा ॥
मातेपरी भाव धरून पूर्ण ।
आणो कुमाराप्रति येथ तूर्ण ॥ १३ ॥

सीताः—जशी आर्यपुत्रांची आज्ञा. [ उठून पुढें जाऊन, भरताला पाहून ] अग बाई ! तर मग आर्यपुत्र तिथून इतक्यांत इथं आले ? छेः छेः हे नुसतं रूपसादृश्य !

सुमंत्रः—अरे ! ही तर जानकी !

भरतः—अरे ! ही तर जनकराजकन्या जानकी !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

स्त्री–रूपीं हेंच तें तेज–।भूगर्भांतुनि जें निघे ॥
जनकाच्या तपस्येचें । पूर्ण द्योतक जें असे ॥ १४ ॥

आर्ये ! मी हा भरत तुम्हांला नमस्कार करितों.

सीताः—( आत्मगत ) नुसतं रूपच तिकडचं आहे असं नाहीं, तर आवाजहि तोच ! ( उघड ) वत्सा ! दीर्घायू हो.

भरतः—अनुग्रह झाला हा माझ्यावर.

सीताः—वत्सा ! ये. आपल्या बंधूंचे मनोरथ पूर्ण कर.

सुमंत्रः—जावं कुमारांनीं.

भरतः—तर मग तात ! तुम्हीं काय करणार आतां ?

सुमंत्रः—कुमारा,—



भरतः--! [ रामाजवळ जाऊन ] आर्य ! हा मी भरत अभिवादन करितों.

[ प्रति० पृ. ५९

आर्या [ गीति. ]

नरेंद्रनिधनानंतर, कीं कळतां वृत्त रामभद्रा हें ॥
प्रथमचि हें मम दर्शन, येतों मी तेथ मागुनी पाहे ॥ १५ ॥

भरतः—ठीक आहे, तसंच करावं. [ रामाजवळ जाऊन ] आर्य ! हा मी भरत अभिवादन करितो.

रामः—( हर्षानें ) ये, ये. इक्ष्वाकुनंदना ! ये. कल्याण असो. आयुष्मान् हो.

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

त्वद्वक्ष आयत कपाटपुटा समान ।
विस्तारुनी, निज भुजांस पुढें करून ॥
आलिंगनास मज दे, शरदिंदुकांत ! ।
या आनना उचलुनी, करि पूर्ण हेत ॥
आल्हादवी मम तनुप्रति दुःखदग्धा ।
आलिंगनें सुखवि, गा ! मज मोह–मुग्धा ॥ १६ ॥

भरत—हा माझ्यावर अनुग्रहच आहे !

सुमंत्रः—(जवळ येऊन ) आयुष्मानांचा विजय असो.

रामः—(सुमंत्रास) हा हा ! हाय ! तात !

श्लोक. [ वृत्त—स्रग्धरा. ]

पूर्वी स्वर्गास गेले चमुसह अपुल्या बैसुनीया विमानीं—।
देवांच्या सारखी जीं,—अभिसर करण्या निर्जरां विक्रमांनीं ॥
तेव्हां ते ज्ञात झाले असुर सुरगणां विक्रमें सर्वमान्य ।
"हे ते ! हे, ते !" म्हणोनी सकलहि गणिती त्यांप्रती धन्य ! धन्य ! ॥
जातां युद्धार्थ नेती कधिं न विसरती युष्मदीयांस तात ।
त्या तुम्हां स्नेहवंता त्यजुनि अजि कसें, हाय ! स्वर्गास जात ? ॥
ते राजे स्वर्गलोकीं अमरपुरिमधें, लाभुनी सर्व आप्त ।
आनंदें राहती कां रमुनि निशिदिनीं पूर्वजांच्या समेत ? ॥१७॥

सुमंत्रः—( शोकविव्हळ होऊन )

श्लोक [ वृत्त–पुष्पिताग्रा. ]

नरपति–निधनासि साहिलें मीं ।
तव विपिनांत निवास पाहतों मीं ! ॥
खर भरत–विषाद हा अपार ।
नृपकुल–दैन्य तसेंच दुर्निवार ॥
अनुभवुनि असंख्य दुष्प्रसंग ।
अजुनि न जीवित होतसे दुभंग ! ॥
बहु दिन मम आयु वाढुनी हें ।
अति अपराधिच मात्र होत आहे ! ॥ १८ ॥

**सीताः**—आर्यपुत्र अगोदरच अश्रु ढाळीत आहेत, आणि तात त्यांना आतां आणखी अश्रु गाळायला लावीत आहेत !

**राम**—मैथिलि ! हें पहा, मी आपलं चित्त स्थिर करितों. वत्सा, लक्ष्मणा ! थोडं उदक आण पाहूं.

**लक्ष्मण**—जशी आर्यांची आज्ञा.

**भरतः**—आर्य ! हें कांहीं न्यायाचं होणार नाहीं. मीच जातों. आपला धाकटा भाऊ या नात्यानं आपली ही सेवा करण्याचा आतां माझाच पहिला अधिकार आहे. (कलश घेऊन बाहेर जाऊन पुन्हां परत येतो) हें पाणी.

**राम**—( आचमन करून ) मैथिलि ! लक्ष्मणाचं काम त्याच्या हातून गेलं तर आतां ?

**सीता**—यांनीं सुद्धां नाहीं का करायची आर्यपुत्रांची सेवा ?

**राम**—ठीक, बरोबर आहे. लक्ष्मण इथं राहून माझी सेवा करूं दे. आणि भरत तिकडं अयोध्येंमध्यें राहून करूं दे.

**भरतः**—आर्यांनीं प्रसन्न व्हावं.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

येथें राहीन देहानें । कर्मे हा तेथ राहिल ।
नांवावरीच प्रभुच्या । राज्य–रक्षण होइल ! ॥ १९ ॥

**रामः**—छेः वत्सा, कैकेयीनंदना ! असं म्हणूं नकोस.

श्लोक [ वृत्त—इं. व. ]

मी तात—शद्ब—प्रतिपालनार्थ ।
स्वीकारिलें या विपिना यथार्थ ॥
वत्सा ! न दर्पें, न भयें, न मोहें ।
न विभ्रमें म्यां वन सेविलें हें ॥
अस्मत्कुलाचें धन ' सत्य ' होय ।
असत्पथें इच्छिशि जाउं काय ? ॥
तूं जन्म या थोर कुलांत घेशी ।
प्रवृत्त कां नीच पथास होशीं ? ॥ २० ॥

सुमंतः—तर मग आतां ह्या अभिषेकोदकानं काय करायचं ?

रामः—तें आमच्या माता कैकेयींनीं सांगितल्याप्रमाणेंच करायचं.

भरतः—आर्यांनीं प्रसन्न व्हावं. आर्य ! आतां व्रणावर प्रहार करूं नका.

हे गुणनिधान ! श्लोक [ वृत्त हरिणी. ]

जनन कुळि ज्या झालें तूझें, तयाच कुळीं मम ॥
जनक तव जो तोची माझा, पितृत्व असे सम ॥
जरि जननिच्या दोषें दोषी न पुत्र कधीं ठरे ।
हृदयिं बघ या त्वत् शद्बांनीं किती पडलीं घरें ! ॥२१॥

सीताः—आर्यपुत्र ! हा भरत अत्यंत करुण वाणीनं बोलतो आहे. तर आर्यपुत्रांनीं आतां इतकं विचारांत कसल्या पडायचं तें ?

रामः—मैथिलि !

श्लोक—[वृत्त—व. ति. ]

तातास मी स्मरत, जो सुर-लोकिं जाई ।
जो सद्गुणी सुत असा बघण्या न राही ! ॥
ऐशापरी गुणनिधी सुत लाभतांही ।
श्रेष्ठा नराहि जगिं होत न लाभ कांहीं ॥
ऐशा नरावरि करी विधि वक्रदृष्टी ।
धिग् धिग् ! जगास असल्या, मन होत कष्टी ! ॥ २२ ॥

वत्सा, कैकेयीनंदना !

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

चारित्र्यें तुझिया प्रसन्न मन हें, निष्पाप तूं सज्जना ।
ह्या श्लाघ्य स्वगुणांहि सत्य, भरता ! त्वां जिंकिलें मन्मना ॥
शब्दातें तुझिया न मानिन असें केव्हांहि बा ! ना घडे ।
होती कीं वश सर्व लोक–हृदयें सत्शुद्ध भावापुढें ! ॥

तरी पण,––

तातांचें वच अन्यथा घडविणें हें योग्य नाहीं सुता ।
त्वत्तुल्य तनयें न कीं वदविणें " मिथ्याभिधायी पिता"! ॥२३

भरतः— श्लोक. [ वृत्त–व. ति. ]

जाई न जोंवरि तुझें व्रत शेवटास
राहीन तोंवरि इथें पद–सेवनास ॥

रामः—छेः छेः असं करूं नकोस.

सिद्धी मिळो स्वसुकृतें नृपतीस प्राज्य ॥
माझी तुला शपथ, ना वरितां स्वराज्य ! ॥ २४ ॥

भरतः—मोठी खेदाची गोष्ट ! ज्याला पुढें उत्तर देतां येणार ना असंच आपण बोललात. हं. ठीक आहे तर; एका अटीवर मी ह्या तुमच राज्याचं परिपालन करीन.

रामः—वत्सा ? कोणची अट ?

भरतः—माझ्या हातीं ठेव म्हणून दिलेलं आपलं राज्य चौदा व संपलीं म्हणजे तुम्हीं परत घ्यावं, हीच माझी इच्छा.

रामः—तसंच होईल.

भरतः––आर्य, लक्ष्मण ! ऐकलंत ? आर्ये, ऐकलंत ? आर्य, सुमंत्र ऐकलत ना ?

सर्वः—हां, हो–आम्हीं सर्वांनीं ऐकलं.

भरतः—आणखीहि एक वर मी आपल्याकडून मागून घेणार आहें.

रामः—वत्सा ! काय ? काय तुझी इच्छा आहे ? काय देऊं तुला मी काय करूं मी तुझ्याकरितां ?

श्लोक [ वृत्त. इ. व. ]

भरतः— युष्मत्पदींच्या शुभ पादुका या ।
शीर्ष-प्रणीता भरतास द्याव्या ॥
संपे न हा त्वद्वनवास जोंवरी ।
यांचाच मी दास असेन तोंवरी ! ॥ २५ ॥

रामः—( स्वगत ) अहाहा ! अरे !

श्लोक. [ वृत्त–अनुष्टुप. ]

यश संपादिलें म्यां जें । दीर्घ काल खपूनिया ।
जोडिलें भरतें तेंची । अत्यल्प अवधींत या ! ॥ २६ ॥

सीताः—आर्यपुत्र ! भरतानीं प्रथमच मागितलेली मागणी त्यांना द्यायची ना ?

रामः—तथास्तु ! वत्सा ! घे ह्या पादुका.

भरतः—मोठाच अनुग्रह. (पादुका घेऊन) आर्य ! आतां या पादुकांनाच अभिषिक करावा अशी माझी इच्छा आहे.

रामः—तात ! ( सुमंत्रास ) भरताचे इच्छेप्रमाणें सर्व होऊं द्या.

सुमंत्र—जशी आयुष्मंतांची आज्ञा.

भरतः—( आत्मगत ) अहाहा ! अहो !

श्लोक [ वृत्त- शा. वि. ]

विश्वास्य स्वजना, प्रजाप्रिय असा, शीलास संपादिता ।
स्वर्गस्था जनकाप्रती दयितसा, मी जाहलों सर्वथा ! ॥
नेत्रां येतिल नेत्र ते भिर्डावतां लोकांचिया ते अतां ।
झालों कीं गुणशालि बंधुकडुनी सुप्रेम संपादिता ॥
झालों भाजन कीर्तिचें परम मी प्राप्तप्रियातें प्रिय ॥
संवादीं गुणि सांगती जइं कथा, लाभों तिथें आश्रय ! ॥२७॥

रामः—वत्सा ! कैकेयीनंदना ! राज्य म्हटलं म्हणजे क्षणभरहि त्याची उपेक्षा होतां कामा नये. म्हणून तो राज्यभार घेण्याकरितां कुमारांनीं आजच येथून अयोध्येला जावें हें बरं.

सीताः—हे आजच जायचे का कुमार भरत तर मग ?

रामः—स्नेहांत गुंतून पडण्याची ही वेळ नाहीं, म्हणून तो राज्यभार घेण्याकरितां कुमाराला आजच इथून अयोध्येला जाऊं द्या.

भरतः—आर्य ! आजच जातों मीः---

आर्या [ गीति. ]

त्वद्दर्शन-लाभाची असतिल आशा धरून पौरजन ।
भवदीय पादुकांचा प्रसाद दावुनि तयां सुखी करिन ॥ २८ ॥

सुमंत्रः—आयुष्मान् ! मी काय करूं आतां ?

रामः—महाराजांच्या प्रमाणें कुमारांचं पालन करावं आपण.

सुमंत्रः—जगलों वाचलों तर जिवांत जीव असे पर्यंत हा प्रयत्न करीन.

रामः—वत्सा ! कैकेयीनंदना ! माझ्या देखतच चढ तर रथावर.

भरतः—जशी आर्यांची आज्ञा. [ दोघे रथारूढ होतात. ]

रामः—मैथिलि ! इकडे ये. वत्सा, लक्ष्मणा ! तूंहि इकडे ये. आश्रमाच्या दरवाजापर्यंतच कां होईना,—चला, आपण भरताला पोंचवूं या.

[ सर्व जातात. ]

अंक ४ था समाप्त.

# अंक ५ वा.

[ नंतर सीता व तापसी प्रवेश करितात. ]

**सीताः**—आर्ये ! निर्माल्याचीं फुलं इकडं तिकडं पडलीं होतीं तीं झाडून मी आश्रम स्वच्छ केला आहे, आश्रमांतील सामुग्रीनं मी देवांची पूजा यथासांग केली आहे; तर आतां आर्यपुत्र येईपर्यंत ह्या बालवृक्षांना पाणी घालूनच मी त्यांचं संगोपन करितें.

**तापसीः**—हिला कांहीं विघ्न वगैरे न येवो !

[ तदनंतर राम प्रवेश करितात. ]

**रामः**—( शोक–विव्हल असा. )

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

त्या रम्या नगरींत मीहि अथवा मत्तात नाहीं असें– ।
देखोनी, अभिषेक–वस्तु सकला घेवोनि जो येतसे–॥
माझ्या सन्निध, त्याप्रती पुनरपी तेथेंचि म्यां धाडिलें ।
रक्षाया निज राज्य बंधु भरता ज्या सद्गुणीं मंडिलें ॥
त्या वत्सावर एकट्यावर धुरा म्यां दुर्वहा टाकिली ।
भारी कष्टद एकट्यास सहणें ती राज्यभारावली ! ॥ १ ॥

( विचार करून ) असंच आहे हें झालं ! तर मग आतां ह्या अशा प्रकारच्या शोकाचा परिहार करण्यासाठीं,–ह्या अशा अवस्थेंत देखील गृहिणीधर्मानं वागणाऱ्या–मैथिलीकडे जावं. बरं, पण यावेळीं वैदेही कुठं बरं गेली असेल ! ( इकडे तिकडे फिरून, पाहून) अरे ! ह्या झाडाच्या मुळांना नुकतंच पाणी घातलेलं दिसत आहे; यावरून मैथिली जवळपासच कुठं तरी असेल असं वाटतं. तसंच इकडे–

श्लोक. [ वृत्त–स्रग्धरा. ]

फेंसाळूनी पहा हें तरुतालिं फिरतें तोय साऱ्यां अळ्यांत ।
तान्हेले पाक्षि येती परि गढळ जला पाहुनी ते न पीत;
येती–जैं कीटकांच्या जळ शिरत बिळीं,–कोरड्या भूवरी ते
वृक्षांच्या आलवालीं निपजति वलयें तोय जों जों अटे तें ॥ २ ॥

( पाहून ) अरे ! ही वैदेही ! हाय, हाय ! काय स्थिति ही इची !—

श्लोक [ वृत्त–इं. व. ]

जीचा कर श्रमत दर्पण तोहि घेतां ।
तो ना दमे कलश वाहुनि आज नेतां ! ॥
स्त्री–सौकुमार्यहि वनीं लतिकां समान ।
होतें पहा कठिण ! त्या विधिला दया न ! ॥ ३ ॥

(जवळ जाऊन) मैथिलि ! तुझं तपाचरण यथास्थित चाललं आहे ना ?

सीताः—( आपल्याशीं ) आर्यपुत्रच्च आले कीं ! ( उघड ) आर्यपुत्रांचा विजय असो.

रामः—मैथिलि ! तुझ्या धर्मकृत्यांत अडथळा येत नसेल तर ये, बैस पाहूं जरा.

सीताः—जशी आर्यपुत्रांची आज्ञा. ( बसते. )

रामः—मैथिलि ! तुझ्या मनांतून कांहीं तरी विचारायचं आहे असं दिसतं. काय–काय बरं तें ?

सीताः—आर्यपुत्रांच्या मुद्रेवरून आर्यपुत्रांचं हृदय शोकामुळें शून्य झाल्यासारखं दिसतंय, कां बरं असं ?

रामः—मैथिलि ! बरोबर ताडलंस. तुझी चिंता अस्थानीं नाहीं.

श्लोक–[ वृत उपजाति. ]

कृतांत–शल्यें वपु विद्ध झालें ।
मदंतरींचे व्रण ना बुजाले ॥
नानापरी शोकशराभिघात ।
पुनः पुन्हा त्या व्रण–मर्मिं होत ! ॥ ४ ॥

सीताः—आर्यपुत्रांना आतां कशामुळं बरं दुःख होत आहे ?

रामः—उद्यां तातांचा प्रतिसांवत्सरिक श्राद्धदिन आहे. विशिष्ट विधींनें पिंडदानक्रिया व्हावी अशी पितरांची इच्छा असते. हें कसं पार पाडायचं या विचारांत आहे मी सध्यां. अथवा—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

केलें कसेंहि, तरि होइल तृप्ति त्यांची ।
आहे दशा सकल ठाउक त्यांस याची ॥




**रावणः**—( आत्मगत ) ह्याच्या ह्या रूपाला ह्याच्या (सुंदर) आवाजाची चांगली जोड आहे म्हणायची ही !

[ प्रति० पृ. ६७

इच्छा मनांत परि, पूजिन आज त्यांसी ।
साजे जसें नृपतिशीं, मज ही सुताशीं ॥ ५ ॥

**सीताः**—आर्यपुत्र भरत मोठ्या संपन्नपणानं श्राद्ध करील; आर्यपुत्रांनीं आपल्या स्थितीला अनुरूप अशा फलोदकानींच करावं. हेंच मातांना पुष्कळ वाटेल !

**रामः**—मैथिलि ! तात स्वर्गात असले तरीहिः—

श्लोक. [ वृत्त—अनुष्टुप. ]

स्वहस्तें ठेविलेलीं म्यां ।
फळें दर्भा बघूनियां ॥
ढाळितील तिथें अश्रू ।
वनवास स्मरूनिया ! ॥ ६ ॥

[ नंतर संन्यास—वेषांत **रावण** विमानांतून प्रवेश करितो. ]

**रावणः**—हा मी—

श्लोक [ वृत्त—अश्वधाटी. ]

चित्तावरी नाहिं सत्ता असा येत मी घेउनी रूप हें निश्चित ।
जो त्या खरा मर्दि त्या राघवीं वैर—निर्यातना चित्त हें चिंतित ॥
रामाप्रती वंचुनी, चोरुनी जानकी न्यावया पातलों सप्रात ।
नोच्चारितां त्या स्वरां, त्या पदां,—योग्य मार्गें, जशी दैत्य ने
आहुती ! ॥७॥

( इकडे तिकडे फिरून, खालीं पाहून ) हें रामाच्या आश्रमाचें दार. तर आतां उतरावं इथं. ( खालीं उतरतो. ) अतिथीला शोभेल अशा प्रकारेंच आतां इथं वागलं पाहिजे. ( मोठ्यानें ) कोण आहे तिकडं ? हा मी एक अतिथी आलों आहे !

**रामः**—( ऐकून ) अतिथीचं स्वागत असो.

**रावणः**—(आत्मगत) ह्याच्या ह्या रूपाला ह्याच्या (सुंदर) आवाजाची चांगलीच जोड आहे म्हणायची ही !

**रामः**—( त्यास नीट पाहून ) अरे ! हे तर संन्यासी आहेत ! भगवन् ! मी आपल्याला अभिवादन करितों.

रावणः—तुझं कल्याण असो.

रामः—भगवन्! हे आसन, बसावं इथं.

रावणः—[ आत्मगत ] हा जसा कांहीं मला आज्ञाच करित आहे! [ उघड ] ठीक आहे बसतों.

राम—मैथिलि! भगवानांच्या करितां पाद्य घेऊन ये.

सीता—जशी आर्यपुत्रांची आज्ञा. [ जाऊन येते. ] हें पाणी.

राम—हें पाणी घेऊन भगवानांचं पादप्रक्षालन कर.

सीता—जशी आर्यपुत्रांची आज्ञा.

रावण—[ आपलें कपट उघडकीला येईल म्हणून घाबरून ] राहूं दे. नको, नको!

श्लोक ( वृत्त–अनुष्टुप. )

हीच पृथ्वीवरी एक । मानुषींत अरुंधती ! ।
इतुकी पूज्य कीं,–लोकीं । नारी सर्वत्र सन्मती ॥
"हिचा भर्ता!" अशा भावें । सत्कारिति तुम्हांप्रती ॥८॥

रामः—तर मग इकडं आण तें पाणी, मी स्वत: यांचे पादप्रक्षालन करितों.

रावणः—अरे, जो मी छायेचाहि परिहार करूं इच्छितों, तो मी काय शरीराचें उल्लंघन करूं? मी हिच्याकडूनहि जो सेवा घेत नाहीं तो मी काय तुझ्या कडून आपले पाय धुवून घेऊं? हें पहा,–तुमच्या या गोड बोलण्यानंच माझा सर्व सत्कार झाला. बैस–तूंही बैस.

रामः—ठीक आहे. ( बसतो. ).

रावणः—( आत्मगत ) आतां आपण ब्राह्मणाच्या शिष्टाचाराचा अवलंब करावा. ( उघड ) अहो! मी कश्यपगोत्री आहे. सांगोपांग वेदाध्ययन केलं आहे. तसंच मानवीय धर्मशास्त्र, महेश्वराचं योगशास्त्र, बृहस्पतींचं अर्थशास्त्र, मेधातिथीचं न्यायशास्त्र, प्राचेतसाचा श्राद्धकल्प, हीं सर्व मी जाणतों.

रामः—काय–काय? श्राद्धकल्पहि आपण जाणतां म्हटलंत?

रावणः—सर्व श्रुति सोडून देऊन आपण श्राद्धकल्पासंबंधानंच आवड दर्शवितां हें काय म्हणून बरं?

**रामः**—भगवन् ! माझी पितृमत्ता नष्ट झाल्यामुळें सध्यां हा श्राद्धकल्पच माझा वेद होऊन बसला आहे.

**रावणः**—मग संकोच कां ? विचारा तुम्हांला काय विचारायचं असेल तें.

**रामः**—भगवन् ! श्राद्धकाली पितरांचें तर्पण मी कशानें बरें करूं ?

**रावणः**—श्रद्धेनें दिलेलें सर्व कांहीं श्राद्धच.

**रामः**—भगवन् ! अनादरानें दिलेलं दान फुकट जातं, हें उघड आहे. पण श्रद्धेनं द्यावयाच्या दानांत देखील विशेष काय द्यावं हें जाणण्याची माझी इच्छा आहे.

**रावणः**—ऐका. उगवणाऱ्या वनस्पतींत दर्भ, औषधिद्रव्यांत तिल, भाजीपाल्यांत वाटाणा, मत्स्यांत मोठा शफर मासा, पक्ष्यांत वार्ध्राणस म्हणजे पांढरा बोकड ( ? ) पशूंत गाय, बैल,–अथवाऽऽऽ गेंडा; हीं सारी मनुष्यांना विहित म्हणून सांगितलीं आहेत.

**रामः**—भगवन् ! आपल्या 'अथवा' शब्दावरून–आणखीहि कांहीं–विकल्पाची--वस्तु असावी असं दिसतं.

**रावणः**—होय, आहे. पण ती पराक्रमानंच प्राप्त होणारी आहे.

**रामः**—भगवन् ! असं असेल तर पराक्रमानं जें मिळण्यासारखं असेल त्यानंच पितरांना संतुष्ट करावं असा माझा निश्चय आहे.

**श्लोक** [ वृत्त–अनुष्टुप. ]

**हें साध्य हो जरी यत्नें । दोहींनीं सज्ज मी असें ।**
**तपस्या,–थकतां चाप; । तपोभावी धनू असे ! ॥ ९ ॥**

**रावणः**—दुसऱ्या वस्तू आहेत, पण त्या हिमालयावर आहेत.

**रामः**—काय,–हिमालयावर ? बरं पुढें तर सांगा.–

**रावणः**—हिमालयाच्या सातव्या शृंगावर, प्रत्यक्ष शंकराच्या शीर्षावरून पडणाऱ्या गंगाजलाचें पान करणारे, वैडूर्याप्रमाणें निळ्या पाठी असलेले, वाऱ्यासारखे वेगवान्, असे कांचनपार्श्व नांवाचे मृग आहेत. वैखानस, वालखिल्य, नैमिशीय इत्यादि महर्षी ह्यानांच आपल्या इच्छामात्रेंकरून जवळ करून त्यांचा वध करून श्राद्ध संपादन करीत असतात.

श्लोक. [ वृत्त व. ति. ]

श्राद्धें अशा पितर मानसिं तोषतात ।
सत्पुत्र–पुण्यजनुचें फल लाभतात ॥
ते टाकुनी निज जरा, वरुनि द्युतीतें ।
जातात दिव्य भुवना, चढुनी नभातें ॥
देवांपरी मिळति त्यांस विमानवास ।
फेरे भवीं न घडतात पुन्हा तयांस ॥ १० ॥

रामः––मैथिलि !

श्लोक. [ वृत्त–व. ति. ]

घेई निरोप सखि ! वृक्षमृगादिकांचा ।
केला सुतांसम तुवां प्रतिपाळ ज्यांचा ॥
तैसेच या,–सुतनु ! विंध्य–वना विचारी ।
याही तुझ्या प्रिय सख्या लतिका निवारी ॥
जो दीप्त ओषधिवनें बहु राजताहे ।
हेमाद्रि, तद्दिपेनिं मी अजि जाउं पाहें ११ ॥

सीताः––जशी आर्यपुत्रांची आज्ञा.

रावणः––हे कौसल्यानंदना ! भलतेच मोठे मनोरथ करूं नकोस. ते प्राणी मनुष्यांना दिसत नाहींत.

रामः––भगवन् ! पण ते हिमालयावर राहतात ना ?

रावणः––होय.

रामः––तर मग हें पहा आपण––

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

दावो हेम–मृगा मातें । हिमवान् अद्रि, नातरी ।
तो मद्बाणजवें छिन्न–। होई क्रौंच–गिरी परी ॥ १२ ॥

रावणः––( आत्मगत ) ही ह्याची दर्पोक्ति मला असह्य होते.

रामः––( चारी दिशेनें पाहून ) अरे, हें वीज चमकल्या सारखं काय बरं वाटतं ?

रावण:—हे कौसल्यानंदना ! हिमवान् तुझ्या शब्दाचा आदर इथंच करीत आहे. हा पहा कांचनपार्श्व ! तुला पाहिजे होतं तें हिमालयानं इथंच पाठिवलं आहे.

राम:—भगवानांचीच कृपा ही ?

सीता:—खरोखरच, आर्यपुत्रांचं भाग्यच हें.

राम:—छेः छेः मैथिलि ?

श्लोक. [ वृत्त–अनुष्टुप. ]

स्वयेंचि जारे हा येई । तात–भाग्यचि हें गणा ॥
धरूनी हेम–मृग हा । आणाया सांग लक्ष्मणा ॥ १३ ॥

सीता:—आर्यपुत्र ! तीर्थयात्रेहून परत येणाऱ्या कुलपतीनां सामोरें जाण्या करितां सौमित्रीनां आपणच धाडलं आहे ना ?

राम:—हो. तर मग मीच जातों.

सीता:—आर्यपुत्र ! मग मी काय करूं ?

राम:—भगवानांची शुश्रूषा कर.

सीता:—जशी आर्यपुत्रांची आज्ञा. ( रामचंद्र जातात. )

रावण:—अरे ! हा राम इतक्यांत अर्घ्यपाद्य देण्याकरितां माझ्या जवळ येतो, आणि आतां एकदम पूजेचा विचारहि न करितां, धांवणाऱ्या मृगाला पाहून आपल्या धनुष्यावर बाण चढवूं लागतो !

श्लोक– [ वृत्त–अनुष्टुप. ]

अहो ! बल ! अहो वीर्य ! । केवढें थोर सत्व हें ! ॥
राम हीं अक्षरें दोन । व्यापितीं जग, युक्त हें ! ॥ १४ ॥

( पाहून ) अरे, हा मृग तर एकाच उडीनं बाणाच्या टप्प्या पलीकडे जाऊन, निबिड अशा अरण्यांत शिरला !

सीता:—( आत्मगत ) आर्यपुत्र इथं नाहींत, मी इथं एकटी; यामुळं मला भय वाटतं इथं !

रावण:—( आत्मगत )

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

छद्में रामा दूर केलें । सीता ही येथ एकटी ! ॥
हरितों हिजला आतां । अमंत्रा आहुती परी ! ॥ १५ ॥

सीताः—तर आतां इथून आश्रमांतच जावं. ( जाऊं लागते. )

रावणः—( आपलें खरें स्वरूप धारण करून ) सीते! थांब, थांब.

सीताः—( भयाकुल होऊन ) हा कोण इथं इतक्यांत ?

रावणः—कां ? ओळखलं नाहींस मला ?

श्लोक [ वृत्त- शा. वि. ]

ज्यानें युद्धिं सुरां, सदानवगणां, इंद्रादिकां जिंकिलें ।
ज्यानें शूर्पणखा विरूपकरणा नेत्रद्वयें पाहिलें ॥
होई त्या खरदूषणादिक वधा सतप्त जो ऐकुन ।
तो हा त्वद् हरणार्थ, दीर्घनयने ! येई पहा रावण ! ॥
दर्पें दुष्ट मती असे धरित जो, ज्याचें बला तुल्य न ।
त्या रामास विलोभनें पळविता, हा मी असे रावण ! ॥१६॥

सीताः—काय ? हा रावण तर ! ( जाऊं लागते. )

रावणः—आः ! रावणाच्या दृष्टीस पडल्यावर—जाशील कुठें ?

सीताः—आर्यपुत्र ! आर्यपुत्र ! रक्षण करा ! रक्षण करा ! लक्ष्मणा ! रक्षण कर ! रक्षण कर !

रावणः—सीते ! माझा पराक्रम ऐकः—

श्लोक—[वृत्त—व. ति. ]

जिंकून इंद्र, थरकांपविला धनेश ।
खेंचूनि चंद्र मग मर्दियलें यमास ॥
धिक् स्वर्ग तो ! सुर जिथें दडती भयेंची ।
सीता जिथें वसत ती क्षिति धन्य साची ! ॥१७॥

सीताः—आर्यपुत्र ! रक्षण करा ! रक्षण करा ! लक्ष्मणा ! रक्षण कर ! रक्षण कर !

रावणः— श्लोक [ वृत्त—मंदाक्रांता. ]

जा रामातें शरण, अथवा लक्ष्मणा मारि हांका ।
कीं बाही त्या दशरथ—नृपा ! येत कामास हा का ? ॥
आव्हानें हीं विफल समजे सर्व या मानवांचीं ।
व्याघ्रातें कां वधितिल कधीं शावकें त्या मृगांचीं ? ॥१८॥

सीताः—आर्यपुत्र ! रक्षण करा ! रक्षण करा ! लक्ष्मणा ! रक्षण कर ! रक्षण कर !

रावणः—हे विशालनेत्रे !

श्लोक [ वृत्त–पुष्पिताग्रा. ]

विलपशि अशि कां वृथा वनांत ? ।
गणि मज रामसमान तूं मनांत ! ॥
सकल सुरचमू समेत येई ।
तरि रणिं राम यशस्वि तो न होई ! ॥१९॥

सीताः—( रागानें ) शापून टाकतें तर !

रावणः—हः हः हः हः ! अहो ! काय पतिव्रतेचें तेज हें !–

श्लोक. [ वृत्त–अनुष्टुप. ]

नभीं उड्डाण करितां । सूर्यांशूनीं न भाजलों ! ।
' शापितें ! ' ह्या हिच्या शद्बें । तो मी दग्धचि जाहलों ! ॥२०॥

सीताः—आर्यपुत्र ! रक्षण करा ! रक्षण करा !

रावणः—( सीतेला घेऊन ) अहो ! जनस्थानांत राहणारे तपस्विजन हो ! ऐका, ऐका तुम्हीः—

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

बलात्कारेंचि सीतेला । नेतसे हा दशाशन ।
क्षात्रप्रेम जरी रामा । दाखवो तो पराक्रमा ! ॥२१॥

सीताः—आर्यपुत्र ! रक्षण करा ! रक्षण करा !

रावणः—( इकडे तिकडे हिंडून पाहून ) अरे, हा आपल्या पंखांच्या वाऱ्याच्या झोतानें सारीं अरण्यें क्षुब्ध करून टाकणारा, प्रचण्ड चंचूचा–हा जटायूच माझ्यावर धांवून येत आहे ! आः थांब, थांब !

आर्या–( गीति. )

मत्करधृत खड्गानें छेदुनि तव पक्ष रक्त वाहवुनी ।
करुनि रुधिरार्द्र तूतें पाठवितों पाहि आज यमसदनीं ! ॥२२॥

[ सीतेस घेऊन जातो. ]

अंक पांचवा समाप्त.

---

# अंक ६ वा.

[ नंतर दोन तापस प्रवेश करितात. ]

दोघेः--अहो ! तपस्विजनहो ! रक्षण करा ! रक्षण करा !

दिंडी.

पद्ममाला करि नील कांति ज्याची ।
असे दंष्ट्रा बिसंततुतुल्य ज्याची ॥
शुक्र ताऱ्यासम दीप्त हास्य ज्याचें ।
रूप ऐसें त्या दिसत रावणाचें ! ।
निशाचरपति हा असा अंतराळीं ।
हरुनि नेतो मैथिली राजबाळी ! ॥
व्याघ्र नेई हरिणीस बलात्कारें ।
तेंवि रावण सीतेस नेत हा रे ! ॥१॥

दुसराः—ही देवी वैदेही,-

श्लोक [ वृत्त–मालिनी. ]

धडपड करिते जी नागिणीच्या परी हे ! ।
कुसुमित लतिकेच्या तुल्य जी कांपताहे ॥
दशमुख शठ तीतें नेतसे हा धरून ! ।
मुनिजनवनसिद्धी जेंवि न्यावी हरून ॥२॥

दोघेः—अहो ! तपस्विजन हो ! रक्षण करा हो, रक्षण करा.

पहिलाः—( वर पाहून ) अरे, आम्हीं हें बोलत आहों, तोंच हा जटायू–दशरथ*महाराजांच्या उपकारांची फेड करण्याकरितां "मी असतांना हिला घेऊन तूं कुठं चाललास ?" असं रावणाला आव्हान करीत, अंतरिक्षांत उड्डाण करून येत आहे !

दुसराः—हा पहा रावण रागानें त्याच्यावर गरगर डोळे फिरवीत परत फिरला !

पहिलाः—हो ! खरच, हा फिरलाच परत रावण !

**दुसराः**—आणि हा जटायूहि पण याच्यावर झडप घालायला आला !

**दोघेः**—अरेच्या ! या दोघांचं आकाशांत युद्धहि सुरूं झालं कीं !

**पहिलाः**—काश्यपा ! काश्यपा ! ह्या गृध्रपतीचं सामर्थ्य तर पहा.

**श्लोक** [ वृत्त–शा. वि. ]

पक्षांनीं झडपूनि त्या बहु बळें होई रणा उद्यत ।
द्वंद्वामाजिंच वीर्य तें प्रकटतें, जें वीर्य बाहुस्थित ॥
ज्याच्या चंचु सुतीक्ष्ण, उज्वल बहू, तो घेरुनी रावणा ।
लोहाच्या खर कंटका परि नखें योजीत तद्वारणा ॥
तीं वक्षस्थलिं त्याचिया खुपसुनी, हा आंतडीं तोडितो ।
जैसा इंद्र शिलातला स्वकुलिशें शैलांतुनी फोडितो ! ॥३॥

**दुसराः**—हाय ! हाय ! ह्या क्रोधाला पेटलेल्या रावणानं जटायूला उजव्या खांद्यावर प्रहार केला !

**पहिलाः**—अरे ! अरे ! जटायू पडला.

**दुसराः**—मोठी दुःखाची गोष्ट ! हा जटायूः—

**श्लोक** [ वृत्त–शिखरिणी. ]

स्ववीर्या साजेसा बहुत जरि हा यत्न करितो ।
दशास्यातें क्रीडा–शिखिपरि जरी तुच्छ गणितो ॥
रिपूच्या तेजातें अवगणि जरी दावुनि बला ।
तरी हा ! हा अंतीं करिहततरूतुल्य पडला ! ॥ ४ ॥

**दोघेः**—ह्याला–उत्तम अशा–स्वर्गलोकाची प्राप्ती होवो.

**पहिलाः**—काश्यपा ! चल ये. हें वृत्त आपण राघवाला कळवूं या.

**दुसराः**—ठीक आहे, चल तर. हेंच आतां पहिलं काम.

( दोघेहि जातात. )

**विष्कंभक समाप्त.**

[ नंतर कांचुकीय प्रवेश करितो. ]

**कांचुकीयः**—कोण आहे तिकडं ? त्या कांचनतोरणद्वारांत कोण आहे उभं ?

( प्रतिहारी प्रवेश करिते. )

**प्रतिहारीः**—आर्य ! मी विजया आहे इथं; काय काम आहे ?

**कांचुकीयः**—विजये ! जा जा, तूं कुमार भरतानां जाऊन कळीव कीं, रामचंद्राच्या भेटीकरितां जनस्थानाला गेलेले आर्य सुमंत्र परत आले आहेत.

**प्रतिहारीः**—आर्य ! तात सुमंत्र आपलं काम यशस्वी रीतीनं करून आले का ?

**कांचुकीयः**—बाई ! तें मला माहीत नाहीं.

आर्या [ गीति. ]

**गेलें वदन सुकोनी हृदयस्थित शोक--वन्हिनें ज्याचें ।**
**देखूनि त्या सुमंत्रा मन्मन अजुनीहि आकुलची साचें ! ॥५॥**

**प्रतिहारीः**—आर्य ! हें ऐकून माझं हृदय सुद्धां कसं दुःखाकुल होत आहे.

**कांचुकीयः**—विजये ! अशी उभी कां तूं ? जा लौकर जाऊन कळीव जा—कुमारांना.

**प्रतिहारीः**—आर्य ! ही कळिवते मीं जाऊन. [ जाते.

**कांचुकीयः**—( पाहून ) अरे, हे कुमार भरत इकडेच आले कीं. सुमंत्रांच्या परत येण्यामुळं यांचं हृदय कुतूहलपूर्ण झाल्याचं दिसतं; वस्त्रांच्या ऐवजीं यांनीं वल्कलं धारण केलीं आहेत, आणि या विचित्र जटाकलापामुळें यांचं मस्तक कसं पिंगटवर्ण झालेलं दिसतं आहे. हे उदार कुमार—

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

**प्रख्यात सद्गुण-गणें, यम शत्रुनाशीं ।**
**जे सूर्यवंश--माणि, तुल्य सुरेश्वरासीं ॥**
**आज्ञावशें अखिल भूप्रति रक्षितात ।**
**श्रीयुक्त हे, कलभसे इकडेच येत ॥ ६ ॥**

[ नंतर भरत व प्रतिहारी प्रवेश करितात. ]

**भरतः**—विजये ! असं काय ? तर मग सुमंत्र परत आले ?

श्लोक—[ वृत्त—शा. वि. ]

**गेलों मी बघ यांसवें वनिं पुरा रामास भेटावया ।**
**लाभोनी रघु—पादुकांस, शपथें मी बद्ध होऊनियां ॥**
**आलों मी नगरा; सुमंत्र आजि हे आले पुन्हा भेटुनी— ॥**
**रामा—जो प्रिय बुद्धिलोचनमना स्वीय प्रजेलागुनी ॥ ७ ॥**

**कांचुकीयः**—( जवळ जाऊन ) कुमारांचा विजय असो.

**भरतः**—तात सुमंत्र कुठेसे आहेत ?

**कांचुकीयः**—ते कांचनतोरण द्वारांत आहेत.

**भरतः**—तर त्यांना लौकर घेऊन या.

**कांचु०ः**—जशी कुमारांची आज्ञा.

( कांचुकीय व प्रतिहारी दोघेहि जातात. )

[ नंतर सुमंत्र व प्रतिहारी प्रवेश करितात. ]

**सुमंत्रः**—( शोकपूर्वक ) हाय ! हाय !

श्लोक. [ वृत्त–पुष्पिताग्रा. ]

**नरपति–निधनास साहिलें मी ।**
**नृपति–सुतव्यसनास देखिलें मी ॥**
**अजि वधु–हरणास ऐकिलें मी ।**
**परि अजुनी जगता न टाकिलें मी ! ॥**
**बहु दिन मम आयु वाढुनी हें ।**
**अति अपराधिच मात्र होत आहे ! ॥ ८ ॥**

**प्रतिहारीः**—(सुमंत्रास) इकडं–इकडं यावं आर्यांनीं. हे कुमार, जवळ जावं आर्यांनीं.

**सुमंत्रः**—( जवळ जाऊन ) कुमारांचा विजय असो.

**भरतः**—तात ! ज्यांनीं लोकांमध्यें आपली पितृभक्ति प्रकट केली आहे अशा रामचंद्रानां तुम्हीं पाहिलंत कां ? अरुंधतीचं तें द्विधा झालेलं शील तुम्हीं पाहिलंत कां ? तसंच कांहीं कारण नसतानांहि ज्यांनीं तें वनवासाचं दुःख स्वयमेव अंगीकृत केलें आहे, त्यांचं तें बंधुप्रेम तुम्हीं पाहिलंत कां ?

**सुमंत्रः**—( सचिंत उभे राहतात. )

**प्रतिहारीः**—कुमार भरत आर्यांनांच विचारताहेत हें.

**सुमंत्रः**—बाई, मला कां ?

**भरतः**—( स्वगत ) ह्यांच्या मनाला फारच आयास होताहेतसं दिसतं. दुःखामुळं ह्यांचं चित्त कांहीं ठिकाणावर नाहीं. ( उघड ) तातांचं अर्ध्या वाटेंतूनच परत येणं झालं कीं काय ?

सुमंत्रः—कुमार ! तुमच्या आज्ञेनं रामदर्शनासाठीं मी जनस्थानाला जायला निघालों तों अर्ध्याच वाटेंतून कसा बरं परत येईन ?

भरतः—तर मग क्रोधामुळं अथवा लज्जेमुळं आर्यांनीं आपल्याला दर्शन दिलं नाहीं,-असं तर नाहीं कांहीं झालं ?

सुमंत्रः—कुमार !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

विनीतां क्रोध कोठोनी । लज्जा वा स्थिर–बुद्धिनां ? ॥
तपोवना देखिलें म्यां । जें होतें शून्य त्यां विणें ! ॥ ९ ॥

भरतः—तर मग तिथून तें कुठं गेल्याचं समजलं ?

सुमंत्रः—किष्किंधा म्हणून वनौकसांचं–वानरांचं–एक स्थान आहे, तिथं ते गेले असं मी ऐकलं.

भरतः—अरेरे ! माणसांतील चांगले वाईट गुण ज्यांना समजत नाहींत, असले ते वानर! त्यांच्यामध्यें राहून रामचंद्राना खरोखर दुःखच होत असेल!

सुमंत्रः—असं कां म्हणतां ? कुमार ! हे वानर तिर्यक् योनींतील असले तरी त्यांना उपकाराची जाणिव आहे.

भरतः—तात ! हें कसं काय ?

आर्या ( गीति. )

सुग्रीवाच्या राज्या हरिलें तज्ज्येष्ठ–बंधु वालीनं ।
. हृतदार त्या वनस्था समदुःखी आर्य सोडविति यत्नें ॥ १० ॥

भरतः—तात ! काय ? समदुःखी आर्यांनीं सोडिवलं म्हटलंत ? समदुःखी कां म्हटलंत ?

सुमंत्रः—( आपल्याशीं ) अरे ! सगळं माझ्या तोंडून हें बाहेर पडलंच कीं. (उघड) कुमार ! कांहीं नाहीं, दोघेहि राज्यभ्रष्ट–म्हणून समदुःखी, एवढाच माझा आशय.

भरतः—तात ! लपवतां कां उगीच ! तुम्हांला स्वर्गस्थ महाराजांच्या पायांची शपथ आहे, काय खरं असेल ते सांगा.

सुमंत्रः—( आत्मगत ) आतां इथं काय उपायच नाहीं ! ( उघड ) ऐका तर—

आर्या [ गीति. ]

मुनिजनरक्षण करितां वैर जडे चंड रावणाशीं तें ।
तेणें तो रावण हरि सीतेप्रति ठगुनी स्व-मायेतें ! ॥ ११ ॥

**भरतः**—काय ? हरण केलं ? [ मूर्च्छित होतो. ]

**सुमंत्रः**—सावध व्हा ! सावध व्हा !

**भरतः**—( सावध होऊन ) हाय ! हाय !

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

आधीं वियोग घडला पितृबांधवांचा ।
तो साहिला वननिवासहि संकटाचा ! ॥
भार्या-वियोगहि तशांत घडे तयाला ।
चंद्रा प्रभा-विरह कीं घन-वेष्टिताला ! ॥ १२ ॥

अरे ! तर आतां पुढं काय करायचं ? ( विचार करून ) ठरलं, असंच ! ( उघड ) तातांनीं माझ्या मागून यावं.

**सुमंत्रः**—जशी कुमारांची आज्ञा. ( दोघे इकडे तिकडे फिरतात. ) कुमार ! नका नका, तिकडं नका जाऊ. हा देवींचा चौक आहे.

**भरतः**—इथंच तर माझं काम आहे. अरे, इथं दरवाजावर कोण आहे प्रतिहारी ?

[ प्रतिहारी प्रवेश करिते. ]

**प्रतिहारीः**—कुमारांचा विजय असो; ही मी विजया आहे.

**भरतः**—विजये ! मी आल्याची वर्दी दे देवींना.

**विजयाः**—कोणच्या देवींनां वर्दी देऊं ?

**भरतः**—जिची—मी राजा व्हावं अशी इच्छा आहे,—तिला.

**प्रतिहारीः**—( आत्मगत ) म्हणजे ! हें काय असावं बरं ! ( उघड ) कुमार ! तसंच करितें. [ जाते. ]

( नंतर कैकेयी व प्रतिहारी प्रवेश करितात. )

**कैकेयीः**—विजये ! काय—मला भेटायला भरत आला आहे ?

**प्रतिहारीः**—होय, देवि ! आर्य रामाकडून तात सुमंत्र आले आहेत, त्यांच्यासहच कुमार देवींना भेटूं इच्छितात.

**कैकेयीः**—( स्वगत ) आतां आणखी कशासंबंधानं बरं मला हा लावून बोलणार असेल ?

**प्रतिहारीः**—देवी ! येऊं देत कां कुमार ?

**कैके:०**—जा, घेऊन ये जा त्याला.

**प्रति०**—बरं तर, देवी. (फिरून, जवळ जाऊन भरतास.) कुमारांचा विजय असो. यावं आंत.

**भरतः**—विजये ! कळविलंस कां पण ?

**विजयाः**—होय.

**भरतः**—तर मग जाऊंयाच आपण आंत. [ तीं दोघे आंत जातात. ]

**कैके०**—बाळा ! विजया सांगत होती कीं रामाकडे जाऊन सुमंत्र आले आहेत म्हणून !

**भरतः**—होः ! पण ह्याहिपेक्षां अधिक आनंदाची बातमी मी देवींच्या करितां आणली आहे !

**कैकेयीः**—बाळा ! तर मग कौसल्या आणि सुमित्रा ह्यांनाहि बोलावूं कां इथंच ?

**भरतः**—त्या दोघींनीं ऐकण्याजोगी नाहीं ती !

**कैकेयीः**—( आत्मगत ) म्हणजे ! काय असावं बरं हें ? (उघड) सांग, सांग काय ती बाळा !

**भरतः**—ऐक तरः—

आर्या. [ गीति. ]

**गेला स्वराज्य सोडुनि आज्ञेनें जो तुझ्याच वनवासा ।**
**हरिलें तद्भार्येतें ! सुफलित हो आज सकल तव आशा ! ॥१३॥**

**कैकेयीः**—हं !

**भरतः**— आर्या–[ गीति. ]

**हा ! हा ! इक्ष्वाकु–कुलीं मानी, तेजस्वि, मान्य कुलजांचें– ।**
**दैवीं वधू–हरण तें यावें त्वत्सम वधूमुळें साचें ! ॥१४॥**

**कैकेयीः**—( आत्मगत ) ठीक आहे ! आतां–उघड करून सांगायची वेळ आली आहे. ( उघड ) बाळ ! महाराजांना शाप झाला होता,–ही गोष्ट तुला माहित नाहीं.

भरतः--काय ? महाराजांना शाप झाला होता ?

कैकेयीः--सुमंत्र ! ती सगळी हकीगत सांगा पाहूं याला साद्यंत.

सुमंत्रः—जशी देवींची आज्ञा. ऐकावं कुमारांनीः—महाराज पूर्वी एकदां मृगयेला गेले होते. तेव्हां एका सरोवरामध्यें एका अंध महर्षीचा कुमार,–हा त्यांना त्यांच्या नेत्रांच्या ठिकाणीं होता,–तो त्यांतल्या पाण्यानं आपला कलश भरून घेत होता; कलशांत पाणी भरीत असतांना जो आवाज होत होता तो थेट अगदीं हत्तीच्या आवाजासारखा होता. तो ऐकून तेथें कोणी तरी वनगजच आलेला आहे अशा भ्रांतीनें महाराजांनीं केवळ शब्दवेधानेंच त्याच्यावर बाण टाकला त्यायोगानें तो कुमार बाण लागून मरण पावला !

भरतः—काय ? मरण पावला ? शांतं पापं, शांतं पापं ? मग पुढें !

सुमंत्रः—आपल्या मुलाची अशी दशा झाल्याचें पाहून—

श्लोक– [ वृत्त–अनुष्टुप. ]

सत्य–भाषी मुनीनीं त्या । रोदना पडतां खळ ॥
दुःखोद्गारी वचांनींच । शापिलें नृप–सत्तमा ! ॥

त्या मुनींचे शब्द असे होते:--

" पुत्र–शोकें मला आला–। मृत्यू, येवो तसा तुला !"

भरतः—खरोखर, हें अत्यंत खेदजनक आणि क्लेशकर आहे.

कैकेयीः—बाळा ! आणि याच कारणासाठीं मी आपल्या डोक्यावर पाप ओढवून घेऊन, कुमार रामाला वनांत पाठविलं. खरोखर राज्यलोभानं नव्हे. महर्षीचा शाप टाळतां येणं शक्य नव्हतं; आणि तो जर खरा व्हायचा तर निदान पुत्रांना दूर वनांत तरी पाठवायला पाहिजे होतं. या पुत्रवियोगाशिवाय गत्यंतरच नव्हतं !

भरतः—पुत्राचाच वियोग जर पाहिजे होता, तर मग मलाच कां नाहीं वनवासाला पाठविलं ?

कैकेयीः—बाळ ! तूं लहानपणापासूनच मातुलगृहीं रहात असल्यामुळें तुझ्या संबंधाचा वियोग अंगवळणीं पडला होता.

**भरतः**—बरं, मग हीं चौदा वर्षे काय म्हणून ठरविलींस ?

**कैकेयीः**—बाळ, मला म्हणायचे होते चौदाच दिवस, पण माझं हृदय दुःखानं विव्हल झालं असल्यामुळं चुकून ' चौदा वर्षे ' असं मी बोलून गेलें !

**भरतः**—( स्वगत ) अरे वाः ! ही सगळी हकीकत जुळवून आणण्यांत हिनं फारच कौशल्य दाखविलं आहे ! ( उघड ) बरं, ही गोष्ट गुरुजनांना माहित होती कां ?

**सुमंत्रः**—कुमार ! वसिष्ठ वामदेवादिकांना हें ठाऊक होतं एवढंच नव्हे पण त्यांची अनुमतिहि होती याला.

**भरतः**—अहाहा ! हे तर त्रैलोक्यसाक्षी आहेत, तर मग भाग्याची गोष्ट कीं देवीकडे कांहींच अपराध नाहीं ! आई ! बंधुप्रेमानं उत्पन्न झालेल्या क्रोधामुळें मी तुला दूषणं दिलीं,–त्या सर्वाबद्दल मला क्षमा कर. आई ! हा मी तुला अभिवादन करितों.

**कैकेयीः**—बाळा ! कोणती आई आपल्या पुत्राचे अपराध पोटांत घालणार नाहीं बरं ? ऊठ, ऊठ. यांत तुझा काय दोष आहे ?

**भरतः**—हा अनुग्रह आहे माझ्यावर. आईची अनुज्ञा असावी मला. मी आजच्या आज आर्यांच्या साहाय्यार्थ सगळ्या राजमंडळाला उठवतों.

**श्लोक** [ वृत्त–उपजाति. ]

**समुद्रतीरावरि मत्त हस्ती ।**
**नेतां तया येइल कृष्णकांति ॥**
**अपार सैन्यासह जाउनीया ।**
**टाकीन रत्नाकर वेष्टुनीया ॥**
**नेईन सैन्या उदधी तरून ।**
**त्या रावणा जर्जर मी करीन ।**
**त्याच्या सवें त्या तटिनीपतीला ।**
**देऊनि वीर्यें पद–ताडनाला ॥ १६ ॥**

[ प्रतिहारी प्रवेश करितो. ]

( ऐकून ) हा शब्द कसला बरं ? जा, लवकर जाऊन पाहून ये बरं काय गडबड आहे ती.

प्रतिहारीः—(जाऊन परत येऊन) कुमारांचा विजय असो. ही हकीकत ऐकून ज्येष्ठ देवींना मूर्च्छा आली आहे.

कैयेयीः—हं ?

भरतः—काय ? आईनां मूर्च्छा आली आहे ?

कैयेयीः—बाळ ! चल, चल. आपण जाऊन त्यांना सावध करूं.

भरतः—जशी देवींची आज्ञा.

[ सर्व जातात. ]

अंक ६ वा समाप्त

# अंक ७ वा.

स्थळः—जनस्थान.

[ नंतर तापस प्रवेश करितो. ]

तापसः—नंदिलका ! नंदिलका !

( नंदिलक प्रवेश करितो. )

**नंदिलकः**—आर्य ! हा आलों मी.

**तापसः**—नंदिलका ! कुलपतींचं अस सांगणं आहे कीं,—ज्यानं आपल्या पत्नीचं हरण करणाऱ्या अखिल त्रैलोक्याला सळो कां पळो करून सोडणाऱ्या रावणाचा नाश करून त्याच्या सिंहासनावर राक्षसवृत्ताहून भिन्नवृत्त आणि अनेक गुणांनीं अलंकृत अशा बिभीषणाला बसविलें आहे, तो शरदृतूंतल्या निर्मल आकाशांतील चंद्राप्रमाणें लोकांना आल्हाद देणारा रामचंद्र—जिचं शील विमल असल्याचं देव देवर्षी यांनीं सिद्ध केलें आहे अशा सीतादेवीला आणि तसंच आपल्या परिवारांतील आस्वलें, राक्षस, आणि वानर यांच्यापैकीं प्रमुख वीरांना घेऊन,—आज इथं आला आहे; तर आपल्या आश्रमामध्यें—आपल्याकडे असलेल्या साधनसंपत्तीच्या द्वारें जें जें म्हणून शक्य असेल तें तें सारं सज्ज करून ठेवा.

**नंदिलकः**—आर्य ! तें सर्व सज्ज आहे. पण—

**तापसीः**—'पण' ! पण काय ?

**नंदिलकः**—अहो ! इथं बिभीषणाच्या बरोबर त्याचे राक्षसहि आलेले आहेत ! तेव्हां त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था तिकडे त्या कुलपतीकडेच असूं द्या !

**तापसः**—तें कां बरं ?

**नंदिलकः**—अहो ! ते माणसांना खाऊन टाकतात ना !

**तापसः**—अरे ! असा घाबरूं नकोस. ते राक्षस असले, तरी ते बिभीषणाच्या आज्ञेंत वागणारे आहेत. समजलास ?

**नंदिलकः**—तर मग त्या सज्जन राक्षसाला माझा नमस्कार असो !

[ जातो.

तापसः--( पाहून ) अरे ! हा रामचंद्र इथंच आला कीं. हा-

श्लोक [ वृत्त-मालिनी. ]

" जय ! नरवर ! तूतें अन्य शत्रू न होवो ।
तव करिं वसुधा ही एकछत्रत्व पावो " ॥
मुनि-नुतिरव ऐसे चालतां, हा प्रसन्न ।
क्षितितलिं पद ठेवी राम सोडूनि यान ॥ १ ॥

विजय असो ! आपला विजय असो !

मिश्र विष्कंभक.

---

[ नंतर रामचंद्र प्रवेश करितात. ]

रामः--अहो !

श्लोक-[ वृत्त-मालिनी. ]

अतिशयित असे तें वीर्य सामर्थ्य ज्याचें ।
हनन सहज केलें मी तया रावणाचें ॥
गुणगण-परिपूर्णा जी जगीं हो प्रकीर्ता ।
विमल-चरित ऐशी लाभलों शुद्ध सीता ॥
गुरुवचन तसें तें शब्दशः पाळुनीया ।
पुनरपि वनभागीं पातलों या मुनींच्या ! ॥ २ ॥

तापसीनां अभिवंदन करण्याकरितां म्हणून मैथिली आंत गेली आहे, तिला इतका वेळ कां बरं लागला ? ( पाहून ) अरे, पण आलीच कीं ही वैदेही-

श्लोक-[ वृत्त-उपजाति ]

' सीता,' ' सखी,' ' जानकि, ' या परीनीं ।
प्रेमाधिकें कोणि " मुली" म्हणोनी ॥
यथा वयें ज्या अधिकार आला ।
त्या चालवीतात सुखें तयाला ॥
पत्नीसवें बोलत तीं मुनींच्या ।
ये मंदशा टाकित पावलां या ॥ ३ ॥

[ नंतर सीता व तापसी प्रवेश करितात. ]

तापसीः—अग, हे तुझे पति. जा त्यांच्याजवळ. तुला एकटी असलेलं मला पाहवत नाहीं.

सीताः—हंः ! अजूनदेखील हें सारं जसं कांहीं खरं नाहीं असंच वाटतं मला ! ( जवळ जाऊन ) आर्यपुत्रांचा विजय असो.

रामः—मैथिलि ! पूर्वीं—एकदां—आपण ह्या जनस्थानांत रहात होतों, हें आठवतं कां तुला ? तसंच पुत्राप्रमाणें मानलेल्या इथल्या वृक्षांची तुला ओळख पटते का ?

सीताः—आठवतं, आठवतं. ज्यांच्या पानांकडे पूर्वीं खालीं डोळे करून पहावं लागे, त्यांच्याचकडे आतां वर मान करून पहावं लागत आहे; इतके हे उंच वाढले आहेत.

रामः—जगांत हें असंच आहे. (कारण लहानाचं मोठं करणं हें कालाचं कामच आहे.) मैथिलि ! याच सप्तपर्णाच्या खालीं शुभ्र वस्त्र परिधान करून येणाऱ्या भरताला पाहून हरिणांचा कळप घाबरून गेला होता—हें आठवतं कां तुला ?

सीताः—होय आर्यपुत्र, अगदीं चांगलं—पुरं—आठवतं.

रामः—तसंच आपल्या तपाचा साक्षी असलेला हा नांदुरकीचा विस्तीर्ण वृक्ष पाहिलास कां ? इथं बसून, तातांना पिंडदान करण्याचा विचार करीत असतांनाच नाहीं का तो कांचनपार्श्व नांवाचा हरिण आपल्या दृष्टीस पडला ?

सीताः—हं—हं—आर्यपुत्र, नका, नका, ती गोष्ट नका काढूं ! ( भीतीनें कांपते. )

रामः—छेः छेः असं घाबरण्याचं कारण नाहीं. तो काल केव्हांच निघून गेला आहे. ( चोहोंकडे पाहून ) अरे ! पण हें असं कशानं बरं होत आहे ?

श्लोक—[ वृत्त—व. ति. ]

हे रेणु लोध्र—सुमना परि गौरवर्ण ।<br>
वायू तयांस उधळीत जवें करून ॥<br>
चारी दिशांप्रतिहि टाकिति ते भरून ।<br>
तैसेच शंख—रव उज्वल हे उठून ॥

गंभीर दुंदुभि-निनाद सवें मिळून ।
टाकीत आज वन हें नगरी करून ! ॥ ४ ॥

[ लक्ष्मण येतो. ]

लक्ष्मणः—आर्यांचा विजय असो. आर्य !—

आर्या [ गीति. ]

सकलहि जननीसह तो उत्सुक होऊनि दर्शना तुझिया ।
भरत भ्रातृप्रेमी आला मोठ्या चमूस घेउनियां ॥ ५ ॥

रामः—वत्सा, लक्ष्मणा ! काय ? तर मग भरत आला आहे ?

लक्ष्मणः—होय, आर्य !

रामः—मैथिलि ! मातांसह येत असणाऱ्या भरताला पाहण्यासाठीं आपले नेत्र विशाल कर.

सीताः—आर्यपुत्र ! तर भरत अगदीं योग्य वेळींच आले, तर !

( नंतर भरत मातांसह प्रवेश करितो. )

भरतः— श्लोक [ वृत्त—व. ति. ]

मेघोपसर्ग-अवसानिं शशी जसा तो ।
होवोनि मोचित शरद्द्युतितें वरी तो ॥
तेंवीच आर्य वरिती द्युति उज्वला ती ।
साहूनि उग्र परिच्या विविधा विपत्ती ॥
सानंद हे स्वजन संगातिं घेउनीया ।
मी पातलों गुरुजनांप्रति या नमाया ॥ ६ ॥

रामः—( सर्व मातांस ) मातोश्री ! मी तुम्हांला प्रणाम करितों.

सगळ्याजणी—बाळा ! चिरंजीव हो. तूं आपली प्रतिज्ञा पुरी करून मुलीसह कुशल परत आलास हें पाहून आमचं भाग्यच आज उदयाला आलं असं आम्ही समजतों !

रामः—अनुग्रह आहे हा माझ्यावर.

लक्ष्मणः—मातोश्री ! मीहि तुम्हांला नमस्कार करितों.

सर्वजणीः—बाळ ! चिरंजीव हो.

लक्ष्मणः—मोठाच अनुग्रह.

सीताः—मी आर्यांना वंदन करितें.

सर्वजणीः—वत्से ! सौभाग्यवती हो !

सीताः—अनुग्रह झाला हा माझ्यावर.

भरतः—( रामास ) आर्य ! मी हा भरत, अभिवादन करितों.

रामः—ये, ये वत्सा ! इक्ष्वाकु-नंदना; ये ! तुझं कल्याण असो. दीर्घायु हो.

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

त्वद्वक्ष आयतकपाट–पुटा समान–।
विस्तारुनी, निज भुजांस पुढें करून ॥
आलिंगनास मज दे, शरदिंदुकांत !॥
स्वीयानना उचलुनी, करि पूर्ण हेत ॥
आल्हादवी मम तनुप्रति दुःखदग्धा ।
आलिंगनें सुखवि गा मज मोहमुग्धा ॥ ७ ॥

भरतः—मोठाच अनुग्रह. ( सीतेला ) आर्ये ! हा मी भरत नमस्कार करितों.

सीताः—आर्यपुत्रांच्या बरोबर चिरसंचारी हो !

भरतः—हा अनुग्रहच आहे माझ्यावर. ( लक्ष्मणास ) आर्य ! मी आपल्याला वंदन करीत आहे.

लक्ष्मणः—ये, ये वत्सा ! दीर्घायू हो. ये, मला गाढ आलिंगन दे पाहूं. ( भेटतो. )

भरतः—अनुग्रह आहे माझ्यावर हा ! ( रामास ) आतां आपण ह्या राज्यभाराचा स्वीकार करावा.

रामः—वत्सा ! काय म्हटलंस ?

कैकेयीः—बाळा ! फार दिवसापासूनची ही इच्छा आहे आमची.

[ इतक्यांत शत्रुघ्न प्रवेश करितो. ]

शत्रुघ्नः—(स्वगत)

श्लोक. [वृत्त–वसं. ति. ]

साहून दुःख विविधा विपदां मधून ।
झाले यदीय गुण तेज न तें मलीन ॥
जोडी यशा वधुनि जो रिपु रावणातें ।
झालों उताविळ अशा गुरु–दर्शनातें ॥ ८ ॥

( जवळ जाऊन ) आर्य ! आर्य ! हा मी शत्रुघ्न वंदन करीत आहें.

रामः—ये, ये वत्सा, कल्याण असो तुझं, दीर्घायु हो.

शत्रुघ्नः —अनुग्रह आहे हा माझ्यावर. ( सीतेस ) आर्ये ! मी नमस्कार करितों.

सीताः—वत्सा ! चिरंजीव हो.

शत्रुघ्नः—अनुग्रहच हा. (लक्ष्मणास) आर्य ! मी प्रणाम करितों.

लक्ष्मणः—कल्याण असो ! दीर्घायु हो.

शत्रुघ्नः—अनुग्रह आहे हा माझ्यावर. (रामास) आर्य ! हे वसिष्ठ वामदेव प्रजाजनांसह अभिषेक-सामुग्री पुढें करून, आपल्या दर्शनाची इच्छा करीत आहेत.

श्लोक. [ वृत्त-वसंत ति० ]

नाना महानद नद्यांतुन जीं करांनीं !
तीर्थोदकें तव कृपें अणिलीं मुनीनीं ॥
पुण्यें जलेंचि असल्या अभिषेकुनीया ॥
ते इच्छिती प्रथम त्वद्वदना पहाया ॥
जें घेत साम्य जलसिक्त नवांबुजाशीं ।
ऐशा मुखास मुनि उत्सुक पाहण्यासी ॥ ९ ॥

कैकेयीः—जा बाळ, अभिषेक करून घे.

रामः—जशी मातोश्रींची आज्ञा. [ जातो.

( पडद्यांत. ) *

" आपला विजय असो ! स्वामींचा विजय असो ! महाराजांचा विजय असो ! भद्रमुखांचा विजय असो ! आर्यांचा विजय असो ! रावणांतकाचा विजय असो ! "

कैकेयीः—हे पुरोहित आणि कंचुकी माझ्या पुत्राचा विजयघोष करून आशीर्वचनांनीं त्याचा हा सन्मान करीत आहेत !

सुमित्राः—प्रजाजन, सेवकगण, आणि सज्जन हे सारे माझ्या पुत्राचा जयजयकार करीत आहेत !

[ पडद्यांत. ]

" हे जनस्थानवासी तपस्वी जनहो ! ऐका, ऐका ! हे पहा रामचंद्र—

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

नाशी जसा रवि तमाप्रति, तेंवि हाही—
शौर्यांशुनीं अतुल शत्रु–तमास पाही—
नाशूनि, येत सकलाशुभवर्ज्य ऐशा ।
सीते सवें, करुनि सिद्ध पहा जयाशा ॥
हा पातला सकललोकमनोभिराम ।
पृथ्वी वरी विजयि होउनि पूर्ण–काम ! ॥ १० ॥

कैकेयी:—अहो ! माझ्या पुत्राचा हा जयजयकार चालला आहे !

[ तदनंतर अभिषेक केलेले राम परिवारासह येतात. ]

रामः—( आकाशाकडे पाहून ) अहो ! तात हो !

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

टाका सर्वहि शोक आजि अपुला, स्वर्गीहि संतुष्ट व्हा :
होतां जो अभिषेक वांच्छित तुम्हीं तो सिद्ध झाला पहा ॥
घेऊनी करिं राज्यभार, करण्या मी वांछितों सत्कृती ॥
लोकांच्या परिरक्षणा करिन मी धर्माश्रयें संप्रती ॥ ११ ॥

भरतः— श्लोक [ वृत्त–मालिनी. ]

नृपति–पद जयातें तें असे प्राप्त झालें ।
शुचि नदि–नद–तोयें ज्या असे सिंचियेलें ॥
रुचिर मुकुट ज्याच्या शीर्षभागास साजे ॥
शिरकमल तयाचें राजछत्रें विराजे ॥
अधिक रुचिर शोभे वंदिता तो प्रजांहीं ।
नवशशिसम आर्या पाहतां तृप्ति नाहीं ! ॥ १२ ॥

शत्रुघ्नः— श्लोक ( वृत्त–अनुष्टुप. )

आर्यांच्यां अभिषेकें या । कुल–कल्मष नाशलें ।
चंद्रोदयें जगत् जैसें । तैसें हेंहि प्रकाशलें ॥ १३ ॥

रामः—वत्सा, लक्ष्मणा ! मी आतां राज्यारूढ झालों आहे.

लक्ष्मणः—अहाहा ! किती आनंदाची गोष्ट !

( कांचुकीय येतो. )

कांचुकीयः—महाराजांचा विजय असो. हे बिभीषण,–आणि तसेच हे

सुग्रीव, नील, मैंद, जांबवान्, हनुमान्, आदिकरून सर्वजण-" ही केवढी आनंदाची गोष्ट ! " असं म्हणून महाराजांचं अभिनंदन करीत आहेत.

**रामः**—त्यांना कळवा कीं, आपल्या सारख्या साहाय्य करणाऱ्यांच्याच प्रसादानें मी हे दिवस पाहिले !

**कांचुकीयः**—जशी महाराजांची आज्ञा.

**कैकेयीः**—आज मी धन्य झालें. ह्याच उत्सव अयोध्येंत पहावा अशी माझी इच्छा आहे.

**रामः**—पहाशील, पहाशील तूं. (पाहून) अरे, या तेजामुळें हें सर्व वन सूर्यप्रकाशाप्रमाणेंच प्रकाशित झालं आहे! (विचार करून) हां, समजलों ! इथं आकाशांत रावणाचं पुष्पक विमान आलं आहे. ठरल्याप्रमाणं स्मरण करितांच हें इथं आलेलं आहे. तर आतां सर्वांनींच या आकाश-रथावर आरोहण करावं.

[ सर्व आरोहण करितात. ]

**रामः**— श्लोक, [ वृत्त-भु. प्र. ]

अयोध्या पुरीं आजच्या आज जाऊं ॥
सवें आप्त-मित्रां-प्रती सर्व घेऊं ॥
प्रजाही तुम्हां आजच्या आज पाहो ।
सनक्षत्र चंद्रोदयाचाच लाहो ! ॥ १४ ॥

( भरत वाक्य. )

श्लोक [ वृत्त-अनुष्टुप. ]

जानकी, बंधु, यां संगें । मिनले जेंवि राम ते ।
लक्ष्मीनें युक्त हा तैसा । शासो भूपति भूमितें ॥ १५ ॥

[ सर्व जातात. ]

—अंक ७ वा समाप्त.—

**प्रतिमा नाटक समाप्त.**

# प्रतिमा नाटकांतील पात्रें

व

## त्यांचीं कोणकोणत्या अंकांत कामें आहेत ते ते अंक

ज्या त्या पात्रापुढें दिले आहेत.

### —प्रतिमा—

| पात्रांची नांवें. | अंक. १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ दशरथ ... ... | ० | २ | ० | ० | ० | ० | ० |
| २ राम ... ... | १ | ० | ० | ४ | ५ | ० | ७ |
| ३ लक्ष्मण ... ... | १ | ० | ० | ४ | ० | ० | ७ |
| ४ भरत ... ... | ० | ० | ३ | ४ | ० | ६ | ७ |
| ५ शत्रुघ्न ... ... | ० | ० | ० | ० | ० | ० | ७ |
| ६ सुमंत्र ... ... | ० | २ | ३ | ४ | ० | ६ | ० |
| ७ कांचुकीय ( बालाकी ) | १ | २ | ० | ० | ० | ६ | ७ |
| ८ सूत—भरताचा ... | ० | ० | ३ | ४ | ० | ० | ० |
| ९ सुधाकार ... ... | ० | ० | ३प्र. | ० | ० | ० | ० |
| १० भट ... ... | ० | ० | ३प्र. | ० | ० | ० | ० |
| ११-१२ दोन तापस (नंदिलक) | ० | ० | ० | ० | ० | ६ | ७ |
| १३ देवकुलिक... (गुरव)... | ० | ० | ३ | ० | ० | ० | ० |
| १४ प्रतिहारी ( विजया )... | १ | २ | ० | ४ | ० | ६ | ० |
| १५ रावण ... ... | ० | ० | ० | ० | ५ | ० | ० |
| १६ कौसल्या ... ... | ० | २ | ३ | ० | ० | ० | ७ |
| १७ सुमित्रा ... ... | ० | २ | ३ | ० | ० | ० | ७ |
| १८ कैकेयी ... ... | ० | ० | ३ | ० | ० | ६ | ७ |
| १९ सीता ... ... | १ | ० | ० | ४ | ५ | ० | ७ |
| २० अवदातिका ... | १ | ० | ० | ० | ० | ० | ० |
| २१ तापसी ... ... | ० | ० | ० | ० | ५ | ० | ७ |
| २२ २३ दोन चेटी. (नंदिनिका) | १ | ० | ० | ४ | ० | ० | ० |

प्र=प्रवेशक.

सूचनाः—ज्या अंकाखालीं ज्या पात्रापुढें शून्य ( ० ) दाखविलें आहे त्याला त्या अंकांत काम नाहीं असें समजावें.

# "बालचरित" नाटकाचें कथासूत्र.

हरिवंशाचे कथाधारानें लिहिलेलें हें बालचरित नाटक आहे, म्हणून याला आम्हीं "भासाचा हरिवंश" असें म्हटलें आहे. या नाटकांत श्रीकृष्णाचे जन्मापासूनच्या कथाभागाला आरंभ करून नाटकाचा शेवट कंसवधांत केला आहे आणि नाटकाची परिसमाप्ति कंसाचें राज्यावर त्याच्या उग्रसेन नामक पित्याची पुनःश्च स्थापना करून केली आहे. या नाटकाचे पांच अंक आहेत. याचें कथासूत्र पुढें दिल्याप्रमाणें आहे.

मंगलाचरण करून सूत्रधार जो सभाजनांना कांहीं विनंति करणार तोंच कलहप्रिय गगनसंचारी नारदमुनींची स्वारी—" हा मी गगनसंचारी " असें म्हणतच तेथें अंतरिक्षांतून खालीं उतरली. ह्यासमयीं आकाशांतून पुष्पवृष्टी होत होती व देवदुंदुभींचे नाद सुरूं झाले होते. भगवान् विष्णु वृष्णिकुलामध्यें नवा अवतार घेत असल्याचें त्रिकालज्ञ नारदमुनींनां ठाऊक असल्यामुळेंच ते श्रीकृष्णजन्माच्या या मंगलप्रसंगीं श्रीहरिदर्शनानिमित्त ब्रह्मलोक सोडून तेथें आले होते. सुरासुरांचें युद्ध थांबलें म्हणजे अंतरिक्षांतील संचारानें त्यांची करमणूक होत नसे. व ज्या दिवशीं वेदाध्ययन वगैरे करावयाचें नसें, अर्थात् अनध्यायामुळें—त्या दिवशीं तर त्यांचा वेळ जातां जात नसे. याकरितां अशावेळीं त्यांना करमणुकीचीं साधनें काय तीं दोनच असत. एक वीणा घेऊन त्याच्या तारा तरी छेडित बसावें नाहींतर कोठें विब्बा घालून वैर माजविण्याजोगें असेल तर तेथें जाऊन कलहाचें बीजारोपण करावें ! या प्रसंगीं ते कंसवधाचे कार्याचा उपक्रम करावा या हेतूनें येथें आले होते. याच समयीं वसुदेव-पत्नी देवकी ही आपल्या नवप्रसूत पुत्ररत्नाला आपल्या हातीं उचलून घेऊन मंदमंद पावलें टाकीत वसुदेवाकडे जात असल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें नारदांनीं त्या देवकीनंदनास पाहतांच " हेच ते पुराण पुरुष ! हें कलहाचं मूर्तिमंत मूळच उत्पन्न झालं आहे ! " असे उद्गार काढून भगवंताना अनेकवार प्रणाम करून ते अंतर्धान पावले ! कंसानें यापूर्वी देवकीचे सहा पुत्र मारले असल्यामुळें ती तो दुरात्मा कंस सातव्याचें काय करितो काय नाहीं अशा भीतीनें मनांत अत्यंत भयभीत होऊन गेली होती. वसुदेवानें तिला पाहतांच त्याला

वाटलें कीं ही आपल्या हातीं बालकाला घेऊन येत नसून प्रत्यक्ष कंसाच्या मृत्यूलाच घेऊन येत आहे! वसुदेवाला पाहतांच तिनें तें पुत्ररत्न त्याच्या स्वाधीन केलें व कसेंहि करून दुरात्म्या कंसाच्या हातून त्याचें रक्षण करण्याविषयीं त्याला विनंति केली. तिनें त्याला डोळाभर पाहून घेतलें आणि मग वसुदेवाचे हातीं दिलें. वसुदेवानें बाळकाला हातीं घेतलें खरें, पण त्याला कोठें नेऊन ठेवल्यानें तो सुरक्षित राहील हें त्याचें त्यालाच निश्चित करवेना. देवकीनें विचारिलें "याला कोठें नेऊन ठेवणार?" वसुदेव कांहीं वेळ घुटमळून म्हणाला:—"दैवानं जें स्थळ योजलं असेल तिकडे जातो मी या बालकाला घेऊन"! असें म्हणून तो निघाला. त्यानें देवकीला घरांत जाण्यास सांगितलें. तिचें शरीर गृहाकडे वळलें पण तिचें मन त्या बालकाभोंवती घिरट्या घालीत जात होतें!

ती वेळ मध्यरात्रीची होती. घनदाट काळोख पडला होता. सारी मथुरा गाढ निद्रेत होती. अशावेळीं वसुदेव जो निघाला तो थेट मथुरेच्या वेशींत आला. वेशींतून बाहेर पडला तों त्याला प्रळयरूपी वृष्टीमुळें यमुनानदी दुथडी भरून चालल्याचें दिसलें. त्या गडद अंधेरांत कांहीं दिसणें शक्य नव्हतें. पण त्या कुमाराच्या दिव्य प्रभेमुळें वसुदेवाला त्याचा मार्ग दिसत होता. हा चमत्कार पाहून त्याचा तोच आश्चर्यचकित झाला! त्यानें आपल्या मनाशीं कसेंहि करून यमुनानदी उतरून पलीकडे जाण्याचें ठरविलें. आपल्या बाहूंची वल्हीं करून त्याच्या सामर्थ्यावर आपण यमुना पार होऊं असा त्याचा हिय्या होता. तशा तयारीनें तो यमुनेंत उतरलाहि:— तोंच—अत्यंत आश्चर्याची गोष्ट—यमुनेचें पाणी दुभंग झालें! भगवती यमुनेनें आपल्यास वाट दिली हें पाहून वसुदेव अत्यंत हर्षित झाला आणि त्यापुढें एक निमिषहि न घालवितां यमुना पार होऊन तो परतीराला पोंचला आणि तेथें एका वटवृक्षाच्या आश्रयानें उभा राहिला. याच समयीं तेथील गौळवाड्याचा स्वामी नंदगोप आपल्या नूतनप्रसव मृत कन्येला घेऊन तेथें येऊन शोक करीत असल्याचें वसुदेवाचे दृष्टीस पडलें. वसुदेवानें नंदगोपाचें नांव घेऊन त्याला हांक मारिली! नंदगोपाला वाटलें,—ह्या अशा अपरात्रीं हा पिशाच्चाचा तर खेळ नसेल! पण ती हांक वसुदेवाची असावी असें त्याला वाटलें; म्हणून तो धीर करून वसुदेव उभा होता तेथें आला. एकमेकांनीं एकमेकांस कुशल विचारिलें. पण नंदगोपाचे

हातीं मृत कन्या असतां तो काय उत्तर देणार ? वसुदेवानें वस्तुस्थिति जाणली आणि ते एकमेकांशीं मोकळें मन करून बोलले:—आणि शेवटीं वसुदेवानें मोठ्या कष्टानें नंदगोपाला त्या मृत कन्येला खालीं ठेवण्यास सांगून, त्याच्या हातीं आपल्या पुत्राला सोंपवावयास तो सिद्ध झाला. वसुदेव म्हणाला:—"पुत्र लाभण्या इतकं माझं भाग्य नाहीं; तुझ्या भाग्यानं तरी हा जगो ! " या गोष्टीला नंदगोप प्रथम तयार होईना. पण त्याचेवर केलेल्या उपकारांचें त्याला स्मरण देतांच तो त्या गोष्टीला उद्युक्त झाला. पण मृत कन्येच्या अशौचामुळें मृत्तिकास्नान करून मग त्या कुमारास घ्यावें या विचारानें तो मृत्तिका उकरूं लागला तों तेथें एकदम जलधारा उसळून त्याला जलस्नानच घडलें ! हा चमत्कार पाहून नंदगोप आश्चर्यानें थक्क होऊन गेला ! नंदगोप शुचिर्भूत होतांच वसुदेवानें कुमाराला त्याचे हातीं देण्याकरितां आपले बाहू पुढें केले, पण नंदगोप साऱ्या गोपवृंदांत मोठा सामर्थ्यसंपन्न म्हणून गाजलेला होता तरी त्या कुमाराला उचलून घेण्याचें सामर्थ्य आपल्यांत नाहीं असें त्या मुलाला घेत असतां त्याच्या निदर्शनास आलें. वसुदेवाजवळ त्यानें तसें बोलूनहि दाखविलें. तेव्हां वसुदेव म्हणाला:—" हा देवांश आहे, याला प्रणाम करून, हलका होण्याविषयीं प्रार्थना कर, म्हणजे ह्याला तूं उचलूं शकशील. " नंदगोपानें तसें करितांच त्या कुमाराला त्यास घेतां आलें व त्या कुमाराचा अद्भूत प्रभाव त्याला दिसून आला. "कुमाराची यापुढें तुम्हांला यत्किंतहि काळजी करण्याचें कारण नाहीं," असे वसुदेवाला सांगून तो नंदगोप अपत्य–प्रसवानंतर लगेच बेशुद्ध होऊन पडलेल्या यशोदेकडे त्या कुमाराला घेऊन तडक चालता झाला. इकडे वसुदेवहि आल्या मार्गानेंच परत मथुरेला जावयास निघणार तोंच नंदगोपाच्या मृत कन्येंत त्याला कांहीं हालचाल दिसूं लागली. त्यानें तिला उचलून वर घेतलें आणि पाहिलें तों ती जिवंत असल्याचें त्याला दिसून आलें. तिला घेऊन तो परत मथुरेंत गेला आणि त्यानें देवकीच्या हातीं ती कन्या देऊन दुरात्म्या कंसाला पूर्णपणें चकवावयाचें असें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. येथें प्रथमांक समाप्त झाला.

मथुरेंत धरणीकंपाचे धक्के बसून त्यायोगें राजवाड्यांची शिखरें कोसळून खालीं पडलीं. ह्या अशुभ चिन्हांमुळें राजा कंस अगदीं गडबडून गेला. याच वेळीं कांहीं चांडाल-कन्या त्याच्या जवळ आल्या आणि त्याला

म्हणाल्याः—" ये, आम्हां चांडाल-कन्यकांशीं तुझं लग्न होऊं दे!" हे शब्द ऐकून कंस दचकला! कांहीं वेळानें त्या अदृश्य झाल्या तेव्हां कंसाला थोडा धीर आला. पण तो गृहांत जाऊं लागला, तों चांडाळ वेषधारी शापानें त्याला आंत जाण्यास मज्जाव केला. 'तूं कोण!' म्हणून कंसानें त्याला विचारितां तो म्हणालाः—" मी मधूक ऋषीचा वज्रबाहू नामक शाप आहे!" कंसाला अशा प्रकारें दरडावून तो तेथून अदृश्य झाला. तेव्हां राजा कंस विश्रांति घेण्याकरितां म्हणून आपल्या शयनमंदिरांत जाऊन मंचकावर आडवा झाला.

शापाला राज्यश्रीनें राजमंदिरांत शिरण्यास प्रतिबंध केला. पण शापानें जेव्हां भगवान् विष्णूची आज्ञा तिला सांगितली तेव्हां तिला तें स्थळ सोडून जाण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. राज्यश्री निघून जातांच शापानें त्या चाण्डाळ-कन्यांना हांक मारून त्यांना तेथें यथेच्छ क्रीडा करण्यास सांगितलें. आणि स्वतः शाप राजाला कडकडून गाढ आलिंगन देण्याला सरसावला आणि लगेच अंतर्धान पावला! राजा घाबरून उठला व जवळ असणाऱ्या यशोधरा नांवाच्या द्वारपालिकेला बोलावून बालाकी कंचुकी-कडून दैवज्ञांस विचारून—घडून येणाऱ्या दुश्चिन्हांचा अर्थ काय तो समजून घेऊन येण्यास सांगितलें. कांचुकीयानें निरोप आणला कीः—" ज्या वेळीं नभस्तल-निवासी एकादी अमानुष शक्ति अवतार घेऊन पृथ्वीवर येते तेव्हां आकाशदुंदुभी वाजून धरणीकंपासारखे अद्भुत चमत्कार घडून येतात!" हें ऐकून कंस सचिंत झाला. तोंच देवकी प्रसूत होऊन तिला कन्या झाल्याचें त्याला समजलें. त्याला वाटलें हीच तर ती अद्भुत शक्ति जन्माला आली नसेल! त्यानें तावडतोब वसुदेवाला तेथें बोलावून घेतलें. आणि नूतन जन्मलेल्या देवकीच्या मुलीला घेऊन येण्याविषयीं त्यानें यशोधरेला आज्ञा केली. धात्री मुलीला घेऊन तेथें आली. व तिनें " ही कन्या आहे हिला प्राणदान द्यावें "—म्हणून देवकी याचना करीत असल्याचें त्याला सांगितलें. त्या मुलीचें तें राजबिंडे स्वरूप पाहून कंस क्षणैक मोहांत पडला पण लगेच देवकीच्या सातव्या गर्भापासून आपला नाश होणार ह्या मुनि-शापाची त्याला स्मृति झाली व त्या मुलीच्या नाशार्थ तो उद्युक्त झाला. त्यानें त्या मुलीला कंस--शिळेवर हांपटलें. त्याबरोबर एक अर्ध भूमीवर पडला व दुसरा अर्ध आकाशांत उडाला! ह्या द्वितीयार्धांतून रुद्रस्वरूपिणी

देवी कात्यायनी हातांत तीक्ष्ण शूल घेऊन कंसाच्या पुढें येऊन उभी राहिली व तिनें–' मी कंसाचा कुलक्षय करण्याकरितां अवतरलें आहें, ' म्हणून त्याला सांगितलें आणि ती अंतर्धान पावली. हे सारे स्वप्नमय भास पाहून राजा कंस त्यांची शान्ती करण्याकरितां तेथून उठून चालता झाला. येथें दुसरा अंक समाप्त होतो.

इकडे नंदगोपाच्या गौळवाड्यामध्यें देवकीनंदन श्रीकृष्ण जसजसा मोठा होऊं लागला तसतशा त्याच्या बाललीला अधिकाधिक होऊं लागल्या. कृष्ण तेथें आल्या दिवसापासून गोधनाची समृद्धि व दुधदुभत्याची मोठी चंगळ उडाली. त्याच्या नाशाकरितां कंसानें अनेक दानवांना भिन्नभिन्न रूपानें वेळोवेळीं पाठविलें. पण श्रीकृष्णानें त्या सर्वांचा वध करून साऱ्या गोपवृंदानां आश्चर्यचकित करून सोडिलें. पूतना राक्षसीला तर तिचें दुग्धशोषण करूनच त्यानें ठार केलें ! तेथें गोप गापींसह तो नानाप्रकारचे खेळ खेळत असे. एके दिवशीं गोपकन्यां बरोबर *हल्लीसक नांवाचें नृत्य करण्याकरितां इतर गोपांसह श्रीकृष्ण गेले. त्या नृत्यांत ते दंग असतां वृद्ध गोपालक त्या नृत्याची मोठी वाहवा करीत होता. अशा वेळीं अरिष्टर्षभ नांवाचा एक दानव वृषभरूपानें डुरकण्या फोडीतच तेथें आला. तेव्हां दामोदर कृष्णानें साऱ्या गोपकन्यांना आणि कुमारांना पर्वतशिखरावर घेऊन जाण्यास सांगितलें आणि त्याचा दर्प दमन करावयास तो स्वतः सिद्ध झाला. त्या दोघांचें मोठेंच द्वंद्व झालें. त्यांत शेवटीं श्रीकृष्णानें अरिष्टर्षभाला आपल्या बाहूंच्या सामर्थ्यानें पृथ्वीतलावर पाडून त्याला कायमचा मोक्ष दिला. याच वेळीं यमुनेच्या डोहांत कालिया नांवाचा मोटा सर्प उठल्याची व त्याचेवर संकर्षण–अर्थात् बलराम–धांवून जात असल्याची बातमी आली. ही बातमी ऐकतांच श्रीकृष्ण त्याला शासन करण्याकरितां कालीय डोहाकडेच–एकदम निघून गेले. येथें तिसरा अंक समाप्त झाला.

धनी दामोदर कालिय सर्पाच्या नाशार्थ कालीय डोहावर जाऊन थडकले. हें पाहून साऱ्या गोपकन्या भयभीत झाल्या आणि त्याचें निवारण

*हल्लीसक नृत्य—हा रासक्रीडेचा एक प्रकार आहे. ह्या नृत्यांत एक पुरुष व एक स्त्री अशी माळ लावून चक्राकार फेर धरून नृत्य करितात. अथवा ह्या नृत्यांत एकच पुरुष असून स्त्रिया मात्र अनेक असतात.

करण्याविषयीं त्या बळरामदादाला विनवूं लागल्या. पण कृष्णानें त्यांना ' भिऊं नका, ' असें सांगून त्या डोहांत एकदम उडी टाकिली आणि त्या डोहाचें पाणी खळबळून सोडिलें. त्या महाभुजंगाच्या फणेवर— आपला एक पाय ठेवून व आपला एक हात जणूं काय विजय-ध्वजच असा आकाशांत उभारून दामोदरानें सहज लीलेनें त्याजवर सुंदर हल्लीसक नृत्य करण्यास सुरवात केली. दामोदराचें हें नृत्य पाहून वृद्ध गोपालकानें त्याची एकसारखी वाहवा चालविली. अशा प्रकारें नृत्य करीत असतां श्रीकृष्ण एका हातानें त्या डोहांत उगवलेलीं सुगंधित फुलें गोळा करीत होता. बराच वेळ अशा प्रकारें नाचनाचून त्याला जर्जर करून टाकल्यामुळें शेवटीं कालियासर्प दामोदराला शरण आला. कृष्णानें त्याला—"कालीय डोहांत पसरलेलें विष शोषून घेऊन येथून निघून जा," म्हणून आज्ञा केली आणि बजाविलें कीं—"कोणत्याहि प्राणिमात्राला यापुढें तुझ्याकडून उपसर्ग होतां कामा नये." कालियानें कृष्णाज्ञा शिरसावंद्य मानून त्या डोहांतील आपलें सारें विष शोषून घेऊन तेथून प्रयाण केलें. तो गेलासें पाहून दामोदरहि यमुनेच्या डोहांतून निघून तीरा-वर आले आणि त्यांनीं तीं सुंदर फुलें त्या गोपकन्यांना मोठ्या प्रेमभावानें अर्पण केलीं. इतक्यांत नंदगोपाच्या पुत्राचा शोध करीत कंसाचा एक दूत तेथें आला आणि त्यानें मथुरेस ' धनुर्मह ' नांवाच्या महोत्सवाकरितां दामोदराला आणि संकर्षणाला परिवारासह येण्याची राजाज्ञा झाली अस-ल्याचें सांगितलें. हा निरोप ऐकतांच ते दोघेहि—देवांचे गुप्त मनोरथ पार-पाडण्याचा हा योग्य समय आला आहे असें जाणून—मथुरेस जाण्याकरितां एकदम निघाले. येथें नाटकाचा चवथा अंक समाप्त होतो.

इकडे मथुरेंत राजा कंस कृष्णाच्या व बलरामाच्या येण्याचीच मार्ग-प्रतीक्षा करीत बसला होता. त्या दोघांच्या पराक्रमाच्या अनेक गोष्टी ऐकून तो भिऊन गेला होता. आणि कोणत्याहि प्रकारें त्यांचा नाश करावा अशा विचारानें तो अनेक उपाय योजीत होता. चाणूर आणि मुष्टिक या नांवाचे दोन मोठे समर्थ मल्ल त्याच्या पदरीं होते. त्यांच्याशीं कुस्त्या करवून त्या दोघांना ठार करावें हा कंसाचा डाव होता. 'ते आले कां ?' म्हणून राजा कंस आपल्या भ्रुवसेन नामक सेवकाला वारंवार विचारी, व तो इत्थंभूत बातमी काढून त्याला निवेदन करी. भ्रुवसेनानें मथुरा-

नगरींत बलराम आणि गोप यांच्यासह प्रवेश करितांच दामोदरानें रजकाचे हातांतून वस्त्रें हिसकून घेतल्याचें, त्याच्यावर मत्त उत्पलापीड हत्तीला घातले असतां त्याचा दंत उपटून त्या दंतप्रहारानेंच त्याचा वध केल्याचें, राजवाड्यापुढें सुगंधि द्रव्यें घेऊन उभी राहिलेल्या मदनिका नांवाच्या एका कुब्जा दासीच्या हातांतून उटणीं घेऊन तीं आपल्या अंगास फासल्याचें, व त्याच हातानें तिला सरळ केल्याचें, वृत्त सांगितलें. ही हकीकत ऐकून घेतल्यावर कंसानें त्याला पुढील बातमी घेऊन येण्यास पाठविलें. त्याप्रमाणें तो जाऊन पुन्हा परत आला व म्हणाला:-"फुलमाळ्यांच्या दुकानांतून पुष्पहार मागवून ते धारण करून ते 'धनुःशाले' कडे गेले असतां त्यांना तेथील सिंहबल नांवाच्या रक्षकानें अटकाव केला. त्याबरोबर त्यांनीं त्याच्या कानशिलांत भडकावून त्याला तिथल्या तिथेंच ठार केलं. त्याचें धनुष्य मोडून टाकून त्याचे तुकडे तुकडे केले आणि नंतर ते रंगगृहाकडे वळले." हें वृत्त ऐकून कंस अगदीं गडबडून गेला, आणि त्यानें चाणूर मुष्टिकांशीं त्या वृष्णि-कुमारांचें मल्लयुद्ध लौकर सुरू करण्यास सांगून कंस तें पाहण्याकरितां आपल्या वाड्याच्या गच्चीवर निघून गेला. यानंतर त्या चाणूर मुष्टिकाशीं अनुक्रमें कृष्ण बलरामाचें मोठें तुमुल मल्लयुद्ध झालें आणि त्या दोघां मल्लांना त्यांनीं हतवीर्य करून अखेर ठार केलें! यानंतर श्रीकृष्ण एकदम तडका फडकीं कंस जेथें बसला होता तेथें गेला आणि त्या कंसाला त्याचें मुंडकें धरून खालीं ओढून त्याला एकदम कंठस्नान घातलें! हें भयंकर कृत्य पाहतांच कंसाचें सैन्यांत मोठी खळबळ उडाली. त्यावर श्रीकृष्णानें बलरामाची योजना केली. इतक्यांत वसुदेव तेथें आला व त्यानें ते दोघे कुमार आपले पुत्र असल्याचे त्यांना सांगितलें आणि लगेच कंसाचा पिता जो उग्रसेन त्याची कैदेतून एकदम सुटका करून, त्याला पुन्हां मथुरेच्या राज्यासनावर बसवून त्याच्या नांवाची द्वाही फिरविली. इतक्यांत देवर्षि नारद तेथें प्रकट झाले. दामोदरानें त्यांना अर्घ्यपाद्य देऊन त्यांचें पूजन केलें. तेव्हां नारदानींहि कंसवध करून सर्व जगाचें रक्षण केल्याबद्दल दामोदराचें अभिनंदन करून त्याला प्रणिपात केला. नारदांच्या बरोबर येणाऱ्या गंधर्वांनीं व देव देवांगनांनींहि दामोदर स्वरूपी श्रीविष्णूला प्रेमभरानें प्रणाम केले. अशाप्रकारें या बालचरित नाटकाचें सरस व नवोनव उत्साह देणारें रमणीय आणि मनोहर कथासूत्र आहे.

# " बालचरित " नाटकांतील पात्रें.

## पुरुष पात्रें.

वसुदेव.........कंसाचा मेहुणा.

संकर्षण.........बलराम } वसुदेवाचे

दामोदर........श्रीकृष्ण } पुत्र.

नंदगोप.........गोकुळाचा स्वामी.

नारद..........देवर्षि.

उग्रसेन.........कंसाचा पिता.

राजा कंस......मथुरेचा राजा.

चाणूर....... } कंसाचे मल्ल.

मुष्टिक...... }

ध्रुवसेन.........कंसाचा एक सेवक.

बालाकी.......कंसाचा कंचुकी.

वृद्ध गोपालक...एक गवळी.

गोपालक.......एक तरुण गवळी.

दामक......... ,, ,, ,,

अरिष्टर्षभ......एक असुर.

कालीय........यमुनेच्या डोहांतील महासर्प.

गरुड, सुदर्शनचक्र, शार्ङ्ग धनुष्य, शंख, नंदकखड्ग, शापदेवता, इतर रक्षक पुरुष.

कुंडोदर..... }

शूल........ }

नील........ } कात्यायनीचे सेवक.

मनोजव..... }

## स्त्री पात्रें.

देवकी.........वसुदेव—पत्नी, व कंसाची बहीण.

प्रतिहारी.......देवकीची द्वाररक्षिका

मधुकरिका } ...कंसाच्या दोन प्रति-

यशोधरा } ...हारी–द्वारपालिका.

धात्री..........कुमारी मायेची उपमाता.

चंडाल युवति...चंडाल स्त्रिया.

गोपस्त्रिया.......गोपसुंदरी आदि करुन गौळणी.

कात्यायनी......कंसाच्या हातांतून निसटून गेलेली आकाशस्थ देवी.

राज्यश्री........कंसराज्याची अधिदेवता.

कौमोदकी.......देवता.

॥ श्रीरामचंद्र प्रसन्न. ॥

महाकवि श्रीभास–प्रणीत.

# बालचरित.

[ नांदी झाल्यानंतर सूत्रधार प्रवेश करितो. ]

सूत्रधारः— श्लोक [ वृत्त– शां. वि. ]

शंखाच्या सम गौर कांति धरि जो, दुग्धापरी शुभ्र ती ।
जो नारायण नाम घे कलियुगीं, रक्षो तुम्हां श्रीपती ॥
त्रेतीं टाकुनिया पदत्रयचि जो व्यापी त्रिलोकाप्रती ।
तो विष्णू कनक–द्युती वरतनू रक्षो तुम्हां श्रीपती ॥
दूर्वांच्या सम श्यामवर्ण धरि जो, जो रावणा दे मृती ।
द्वापारीं अभिधान राम धरि, तो रक्षो तुम्हां श्रीपती ॥
ज्याची कज्जल कांति या कलियुगीं लोकीं सदा वर्णिती ।
रक्षो तो सकलां तुम्हांप्रति सदा दामोदर श्रीपती ॥१॥

आर्यमिश्रांना माझी अशी विनंति आहे कीः—(कांहीं ऐकलेसें करून) अरे, पण मी विनंति करण्यांत गर्क असतां हा कोणाचा बरं शब्द ऐकू येत आहे ! हं–पाहूंच तर !

( पडद्यांत )

" हा मी गगन–संचारी "

सूत्रधारः—ठीक आहे, समजलों !

श्लोक–[ वृत्त इं. व. ]

ही होतसे पुष्पमयी सुवृष्टी ।
त्या देवता तूर्य–रवा करीती ॥
वृष्णीकुलीं घे जनु त्या हरीतें ।
येती त्वरें नारद देखण्यातें ॥ २ ॥

[ जातो. ]

[ नंतर नारद प्रवेश करितात. ]

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

हा मी गगनसंचारी । त्रैलोक्या श्रुत मत्पद ।
ब्रह्मलोकाहुनी आलों । कलहप्रिय नारद ! ॥ ३ ॥

अहो !

श्लोक [ वृत्त—पंचचामर. ]

सुरासुरांमधील वैर शांत होत जेधवां ।
प्रशांत अंबरीं पहा रमे न चित्त तेधवां ॥
जधीं न वेद—पाठ ते तधीं सुखें सुघट्टितो ।
स्ववल्लकी—गुणांस, तींवि वैरदोर तीव्र तो ! ॥ ४ ॥

आणखी—

श्लोक [ वृत्त—पृथ्वी. ]

पितामह—वचावरी असत भक्ति माझी महा ।
तशी मज तपोवनें प्रियचि सर्व होतीं पहा ॥
खरेंचि कथितों परी अधिक रंगतें मन्मन—
जरी मजशिं साधुं ये कलह, वैर, वीणास्वन ! ॥ ५ ॥

आणि म्हणूनच मी इथं—लोकहितार्थ कंसाचा वध करण्याकरितां वृष्णि-कुलांत जन्माला येणाऱ्या अव्यय, अमर, आणि अनादि अशा नारायणाला पाहण्याकरितां आलों आहे. ( पाहून ) अरे ! ही इथं भगवती देवकी ! ही मायेनं बालरूप धारण करणाऱ्या ह्या त्रिलोकेश्वराला घेऊन, वसुदेवासह आपलं घर सोडून हळूहळू पावलं टाकीत कुठं तरी बाहेर जाते आहे. ही अशा रात्रीं—

श्लोक [ वृत्त—मंदाक्रांता. ]

जो लोकांचें भय हरितसे, जो गुरू त्या सुरांतें ।
जो दैत्यांचें हनन करितो चक्रपाणी तयांतें ॥
ही शोकार्ता शशिमुखि जणूं मंदरा भू—धरातें ।
बाहूमध्यें धरुनि निशि या शांत चित्तेंचि जाते ! ॥ ६ ॥

है—हे भगवान् नारायण—

श्लोक [ वृत्त–इं. वं. ]

वीर्यास ह्याच्या मुळिं अंत नाहीं ।
पद्मापरी नेत्र विशाल पाही ॥
हा नाथ प्रत्यक्ष सुराधिपाचा ।
हा वीर्यहन्ता जगिं दानवांचा ॥
श्रेष्ठ त्रिलोकीं, जग निर्मिता हा ।
सर्वा जनांचा प्रतिपाळिता हा ॥ ७ ॥

हेच ते पुराणपुरुष. अहाहा ! एकुण हें कलहाचं मूळच उत्पन्न झालं म्हणायचं तर ! तर आतां मीहि या भगवान् नारायणाला प्रदक्षिणा घालून ब्रम्हलोकाला जातो. त्रैलोक्याचें आदिकारण अशा भगवंतांना माझे प्रणाम असोत.

श्लोक. [ वृत्त व. ति ]

नारायणा ! नमन लोकपरायणातें ।
लोकानना ! तुजशिं पंकज–लोचनातें ॥
रामा दशाननविरोचन–मर्दनातें ।
वीर्यालया नमित वीरवरा वरातें ॥ ८ ॥

( नारद जातात. )

[ नंतर हातांत बालक घेतलें आहे अशी देवकी प्रवेश करिते. ]

देवकी:—हाय ! हाय ! माझ्या बाळाचा अलौकिक प्रभाव सुचविणारीं याच्या जन्मकाळीं दिसून येणारीं मोठमोठीं सुचिन्हं मी प्रत्यक्ष पहात असतांह–त्या दुष्ट कंसाच्या दुष्टपणाचा विचार मनांत घोळत असल्यामुळं, मला मंदभागिनीला तीं चिन्हं पटावीं तशी पटत नाहींत ! हो, पण आर्यपुत्र कुठं गेले बरं ? ( इकडे तिकडे फिरून समोर पाहून ) अगबाई ! हे आर्यपुत्र तर इकडंच येत आहेत ! हर्ष आणि विस्मय यांच्यामुळें यांचे डोळे कसे प्रफुल्ल दिसत आहेत !

[ नंतर वसुदेव प्रवेश करितो. ]

वसुदेव:—( विचारांत निमग्न असलेला ). अहो ! हें काय बरं ?—

श्लोक [ वृत्त--मंदाक्रांता. ]

आकाशीं या फिरति चपला, वात घोंगावती हे ।
मेघांच्या या भयद निनदें मेदिनी कांपताहे ॥

ऐशा कालीं अवतरति हे विष्णु दैत्यांतकारी,—
गुप्तस्थानीं अवन करण्या या प्रजा, चक्रधारी ! ॥ ९ ॥

( पाहून ) ही देवकी,—

साकी

शोका सीमा नसे जियेच्या निधनें षट्पुत्रांच्या ।
त्या शमवाया, तैसें करण्या अवना नव तनयाच्या ॥
प्रसव-समयिंच्या शुभ चिन्हांनीं प्रेमा अधिक जयाचा ।
सुत कल्पुनि त्या, ती ने वाहुनि; मूर्त मृत्यु कंसाचा! ॥१०॥

देवकी:—( जवळ जाऊन ) आर्यपुत्रांचा विजय असो.

वसुदेव:—देवाकि! मध्यरात्र झाली आहे. यावेळीं मथुरेंतले सगळे लोक निद्रित आहेत. तेव्हं जोंपर्यंत कुणी पाहणार नाहीं तोंपर्यंत मी या बालकाला घेऊन निघून जातो.

देवकी:—पण आर्यपुत्र याला नेणार कुठं ?

वसुदेव:—देवकि ! बरोबर विचारलंस ! पण तें माझं मलाहि ठाऊक नाहीं ! परंतु हा दुरात्मा कंस या साऱ्या पृथ्वीवर एकछत्री राज्य करितो आहे तेव्हां ह्या आयुष्मानाला, खरंच-कुठं वरं घेऊन जावं ? अथवा दैवानं जें स्थल योजलं असेल तिकडंच मी या बालकाला घेऊन जातों.

देवकी:—आर्यपुत्र ! याला एकदां डोळाभर पाहून घ्यावसं वाटतं मला.

वसुदेव:—अग, हे अनिवार पुत्रवत्सले !

[ आर्या—गीति. ]

हा चंद्र राहु-वदनीं पडतां या काय गे बघायाचें ? ।
निरखिशि जरि चिर या तूं, कंस न सोडील या वधायाचें ॥११॥

देवकी:—सर्वथा तसं होणार नाहीं.

वसुदेव:—जं तूं आतां म्हटलंस तसंच सर्व देवताहि म्हणोत ! आण त्याला इकडं.

देवकी:—घ्यावं आर्यपुत्रानीं.

वसुदेव:—( त्यास घेऊन ) ओ हो: हा बालक असून कितीतरी पण जड आहे हा ! योग्यच आहे—

आर्या ( गीति. )

हा बाल कमललोचन बल याचें विंध्यमंदरासम तें ! ।
गर्भी धारण करि या जी स्त्री तीचें न धैर्य अजमवतें ॥ १२ ॥

देवकि ! तूं आतां आंत जा.

देवकी:—ही चाललें मीं मंदभागी!　　　　　　　　[ ती जाते. ]

वसुदेव:—ही देवकी—

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

चंद्रकोर द्विधा होई । अंबरीं भू–जलांतरीं ।
तेंवी हीहि द्विधा होई । येथें मन, तिथें तनु ॥ १३ ॥

हाय ! हाय ! गेलीच ही आंत. तर आतां आपणहि जाऊन नगराची वेश गांठावी. अहो, हा मी—

श्लोक [ वृत्त—मालिनी. ]

प्रथमसुतवधानें पेटला क्रोधवन्ही ।
नृपतिभय करी हें मन्मना क्षुब्ध पाही ! ॥
त्वरित वहु असे मी या पथांतूनि जात ।
धरुनि जणुं गिरींद्रा मंदरा मद्भुजांत ॥ १४ ॥

( इकडे तिकडे फिरून ) ही नगरवेश. आतां हिच्यांत प्रवेश करावा. ( आंत शिरून ) अरे ! या मथुरेंतले सगळे लोक गाढ निद्रेंत आहेत. तेव्हां आतां इथून पाय काढावा ! ( इकडे तिकडे फिरून ) मथुरेंतून तर मी बाहेर पडलों. अरे ! पण इथं कितीतरी गडद काळोख आहे हा ! सध्यां तर—

आर्या [ गीति. ]

तम जणुं अंगा माखत, कीं वर्षत कज्जलास नभ पाही ! ।
सेवा जशि कुजनाची तशि दृष्टी निष्फला इथें होई ! ॥ १५ ॥

अहो, काय हा काळोखाचा प्रभाव !

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

ज्या ह्या दिशा दाविति मार्ग लोकां ।
त्या जाहल्या अप्रभ कीं विलोका ॥
द्रुमांतरें लोपुनि सर्व गेलीं ।
एकत्र ही वृक्षतती जहाली ! ॥

भू–भागिं या सुंदर मांडणी जी ।
रूपीं तिच्या पालट होत आजी ! ॥ १६ ॥

इथून जाणंच दुष्कर ! अरे, पण हा दिव्याचा प्रकाश दिसतो आहे ! तो दुरात्मा कंस मी असा निघून आल्याचं कळल्यामुळं मला पकडण्याकरितां दिवट्या पाजळून तर येत नसेल ! तरी असलं तरी काय झालं ? मी त्याच्या दर्पाचं दमन करीन. ( खड्ग उपसून वळून पाहून ) अरे ! इथं तर कोणीच दिसत नाहीं ! अहा हा !

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

तमें हा व्यापिला प्रांत । न दिसे मज मार्गही ।
कराया यांतुनी पार । प्रभा निर्मी कुमार ही ! ॥ १७ ॥

हा मार्ग दिसत आहे. तेव्हां याच मार्गानं जावं झालं. अरे ! पण ही भगवती यमुना नदी–हीं ह्या प्रळयरूपी वृष्टीमुळं भरून चालली आहे ! तेव्हां माझा हा खटाटोप व्यर्थच तर ! आतां काय करावं ? ( विचार करून ) ठीक ! आलं लक्षांत !

श्लोक [ वृत्त–शिखरिणी. ]

भुजंगा नक्रांनीं असत बहु ही व्याप्त सरिता ।
न ये या कल्लोलां द्रुतगति मनातेंहि तरतां ॥
वल्हीं बाहूंचीं मी करुनि झणिं जाईन तरुनी ।
जरी देवांशाची असत वसती या शिशुजनीं ॥१८॥

( नदी तरून जाण्यास सिद्ध होऊन विस्मयानें ) ओ होः ! हे यमुनेचं पाणी दुभंग झालं ! हें इकडं निश्चल आहे, आणि इकडं वेगानं वहात आहे ! भगवतीनंच मला ही वाट दिली ! तेव्हां आतां आपण हिच्यांतून निघून जावं. ( नदीतून उतरून जाऊन ) मी यमुना पार तर झालों ! इथं हा हुंकारासारखा कसलों बरं ध्वनि ? मी हा अभागी गौळवाड्याजवळ येऊन पोंचलों आहे हें तर स्पष्टच दिसतं ! वाहवा ! वाहवा ! याच गौळवाड्याजवळ माझा स्नेही नंदगोप राहतो ! पण त्याला मी कंसाच्या आज्ञेवरून एकदां जखडून टाकून चाबकानं सडकला होता ! कांहीं असो, मी गौळवाड्यांत हा शिरतोंच. अथवा या वसुदेवानं इथं रात्रीं प्रवेश केला म्हणून ह्या गोपाळांना शंका येईल, एवढ्याकरितां ह्या वडाच्या झाडाखालीं उजाडण्याची



**वसुदेवः**—ओ होः ! हें यमुनेचं पाणी दुभग झालं !। हें इकडं निश्चल आहे, आां इकडं वेगानं वहात आहे ! भगवतीनंच मला ही वाट दिली ! [बाल० पृ. १४

वाट पहात रात्रभर बसून रहावं. हे वटवृक्षावरील देवतांनो ! ह्या बालकानं लोकहितार्थ कंसवध करण्याकरितां जर ह्या वृष्णिकुलांत जन्म घेतला असेल तर त्या गौळवाड्यांतून कोणी तरी इथं येणो ! छेः छेः दुसरं नको कुणी यायला. माझा जिवलग मित्र नंदगोपच येऊ दे.

[ नंतर मुलीला हातीं घेतली आहे असा नंदगोप प्रवेश करितो. ]

**नंदगोपः**––( शोकानें ) बाळे ! बाळे ! तूं आमच्या गृहलक्ष्मींशीं न रमतां सवरतां, अथवा तिचे भोग भोगून मग तिला दूर करायचं–तेंहि न करितां–इतक्यांतच निघून चाललीस ? सध्यां तर शेकडों महिष एकवटल्यामुळं जसा गडद काळाकुट्ट अंधकार पडावा तसा दाट काळोख पडला आहे ! ही––

आर्या ( गीति, )

**झांकत नभास रजनी, जोत्स्ना जीची ढगामुळें लुप्त ।**
**दिसते गोपी परि ही नीलांशुक गुरफटून जी सुप्त ॥ १९ ॥**

आजच मध्यरात्रीं माझ्या कुटुंबाच्या–यशोदेच्या–पोटीं ही दीन अभागी पोर जन्माला आली ! पण जन्माला आली तोंच ती गतप्राण झाली ! उद्यां आमच्या गौळवाड्यांत गौळवाड्याला उचित असा 'इंद्रयज्ञ' नांवाचा उत्सव होणार आहे; यास्तव या दुःखाचा उपसर्ग इतर गोपजनांना होऊं नये म्हणून ह्या शृंखलांमुळें माझे पाय जड झाले असताना देखील–मी एकटाच ह्या मुलीला घेऊन घराबाहेर पडलों आहे ! तिकडे बिचाऱ्या यशोदेला आपल्याला मुलगा झाला कीं मुलगी झाली हें देखील माहित नाहीं. ती मूर्च्छा येऊन पडली आहे ! बाळे ! बाळे !

**वसुदेवः** —इथं अशा रात्रीचा कोण बरं शोक करितो आहे ? हा बिचारा माझा सहाध्यायीच तर नव्हेना ?

**नंदगोपः**—( त्या बालिकेस अनुलक्षून ) काय, तर मग तूं आमच्या गृहलक्ष्मीशीं न रमतां न सवरतां अथवा तिचे भोग भोगून मग तिला दूर करायचं—तेंहि न करतां–इतक्यांतच निघून चाललीस ?

**वसुदेवः**—याच्या आवाजावरून मी याला ओळखतों. खास, हा माझा मित्र नंदगोपच आहे. तर आतां याला हांक मारतो. मित्रा, नंदगोपा ! इकडे ये, इकडे ये.

नंदगोपः—( भिऊन जाऊन ) अरेच्या! पूर्व परिचित अशा आवाजानं " नंदगोप, नंदगोप ! " म्हणून, यावेळीं इथं कोण बरं मला हांक मारीत आहे ? हा कां कोणी राक्षस आहे, कां पिशाच्च आहे ? आणि हें पुन्हां अशा भयंकर रात्रीं, आणि ही मृत बालिका माझ्या हातांत असतां ! काय बरं करावं आतां ?

वसुदेवः—मित्रा, नंदगोपा ! दुसरी तिसरी शंका नको आणूंस आतां मनांत. ये, इकडे ये.

नंदगोपः—( कान देऊन, लक्षपूर्वक ) अरे, ह्या आवाजावरून हे माझे धनी वसुदेवच आहेत. तर आतां यांच्याजवळच जावं. अथवा यांच्या जवळ जाऊन मला काय करायचं ? यानं कंस राजाच्या आज्ञेवरून मला एकदां चाबकाखालीं सडकून पाशांनीं जखडून टाकलं होतं ! तेव्हां नच जावं हें बरं. अथवा धिःकार असो या माझ्या दुष्ट कल्पनेला ! यानं माझ्यावर हजारों उपकार केले आहेत; मला दुःख झालं असतां तो दुःखी होतो, मला सुख झालेलं पाहून तो सुखी होतो; असं असूनहि त्यानं राजाज्ञेवरून मला एक वेळ बद्ध केलं होतं ह्याची मला स्मृति होते ! तें कांहीं नाहीं, मी जातोंच याच्याजवळ. पण ही बालिका!—काय करावं ? तें कांहीं नाहीं, आतां असंच करितो. ( जवळ जाऊन व सभोंतीं पाहून ) रात्र संपून उजाडलंच आहे. हे धनी वसुदेव बालकाला घेऊन उभे आहेत. ( जवळ जाऊन ) स्वामींचा विजय असो !

वसुदेवः—मित्रा, नंदगोपा ! भगवती धेनूंचं कुशल आहे ना ?

नंदगोपः—होय, स्वामी, कुशल आहे.

वसुदेवः—आपला परिवारहि कुशल आहे ना ?

नंदगोपः—काय—परिवार म्हणतां ? होय, स्वामी ! कुशल आहे.

वसुदेवः—मित्रा ! आतां असं लपवून कां ठेवतोस ?

नंदगोपः—स्वामी ! लपवीत नाहीं कांहीं.

वसुदेवः—हें पहा—खरं न सांगशील तर शपथ आहे तुला माझ्या प्राणांची.

नंदगोपः—निरुपाय आहे; ऐकावं स्वामीनीं. आज मध्यरात्रीं माझी घरधनीण—छेः छेः आपली दासी—यशोदा ही प्रसूत होऊन तिला ही बिचारी

पोर झाली; आणि झाली तीच मरण पावली ! उद्यां आमच्या गौळवाड्याला उचित असा इंद्रयज्ञ नांवाचा उत्सव होणार आहे. यास्तव या दुःखाचा उपसर्ग इतर गोपजनांना होऊं नये म्हणून, ह्या शृंखलांमुळं माझे पाय जड झाले असतांना देखील, मी एकटाच ह्या मुलीला घेऊन घराबाहेर पडलों आहे ! तिकडं बिचाऱ्या यशोदेला आपल्याला मुलगी झाली कीं मुलगा झाला हें देखील माहित नाहीं. ती मूर्च्छा येऊन पडली आहे !

वसुदेवः—हाय ! हाय ! ह्या सर्व लोकांवर आपला अधिकार चालविणाऱ्या त्या कृतांत यमाच्या तावडींतून निसटून जाणं शक्य नाहीं ! मित्रा ! काष्ठवत् झालेलं हें कलेवर आतां टाकून दे.

नंदगोपः—हें टाकवत नाहीं, स्वामी ! माझ्यानं हें टाकवत नाहीं !

वसुदेवः—लोकधर्मच अशा प्रकारचा आहे. टाकून दे तें.

नंदगोपः—जशी स्वामींची आज्ञा. बाळे ! बाळे ! (असें म्हणून रडतो).

वसुदेवः—मित्रा ! पुरे--पुरे कर हे रडणं. ऊट–ऊठ.

नंदगोपः—( तसं करून त्याचेजवळ जाऊन ) स्वामींचा विजय असो. या दासाला काय आज्ञा आहे ?

वसुदेवः—मित्रा ! त्या दुरात्म्या कंसानं माझे सहा पुत्र मारून टाकले आहेत हें तुलाहि ठाऊक आहेच !

नंदगोपः—आहे ठाऊक, स्वामी ! ठाऊक आहे मला तें.

वसुदेवः—तर हा सातवा दीर्घायु आहे ! पण पुत्र लाभण्याइतकं माझं भाग्य नाहीं. तुझ्या भाग्यानं तरी हा जगो; म्हणून तूं याला घे.

नंदगोपः—भीती वाटते, स्वामी ! मला भीती वाटते ! राजा कंसाच्या जर हें कानावर गेलं कीं–वसुदेवाचा कुमार नंदगोपाकडे ठेव म्हणून ठेवला आहे, तर–फार काय सांगूं–माझं डोकंच गेलं असं समजा !

वसुदेवः—( आपल्याशीं ) हाय ! हाय ! एकूण कार्य फिसकटलंच म्हणायचं ! दुष्ट लोकांना–केलेल्या उपकारांची जाणीव–त्यांचा उच्चार करूनच करून द्यावी लागते. तर याला त्यांची स्मृती देतो. ( उघड ) मित्रा, नंदगोपा ! अरे !

साकी–वृत्त

असेल घडलें किंचित् प्रिय तव मजकडुनी पूर्वी या ।
अथवा कांहीं असेल घडली उपकृति हस्तें माझ्या ।
त्यातें स्मरण्याचा । आला अवसर अजि साचा ! ॥ २० ॥

नंदगोपः—काय–काय ? उपकृति स्मरायचा अवसर म्हणतां ? तो कंस असो, नाहीं तर त्या कंसाचा बाप–तो उग्रसेन–असो, कोणीहि असो! द्या,–द्या स्वामी त्या बालकाला.

वसुदेवः—मित्रा ! घे ह्याला.

नंदगोपः—स्वामी ! मला अशौच आहे. मृत मुलीला मी घेतली होती ! स्वामींनीं एक क्षणभर वाट पहावी. मी यमुनेच्या डोहांतून–शुचिर्भुत होऊन येतो.

वसुदेवः—मित्रा ! गौळवाड्यांत रहात असल्यामुळें तुम्हीं स्वभावतःच शुद्ध आहांत.

नंदगोपः—तर मग आमच्या गौळवाड्याला साजेशी शुद्धी या धुळीनेंच उरकून घेतो.

वसुदेवः—यांत काय दोष आहे ? हो, शुद्ध हो.

नंदगोप—जशी स्वामींची आज्ञा. ( तसें करून विस्मयानें ) स्वामी ! आश्चर्य ! आश्चर्य ! अंगाला फांसण्याकरितां मृत्तिका शोधून घेत असतां, पृथ्वी दुभंगून चार हात उंचीची पाण्याची धार वर उसळली !

वसुदेवः—हा या बालकाचाच प्रभाव ! हो आतां शुचिर्भुत.

नंदगोपः—स्वामी ! तसंच करतो. ( तसें करून, जवळ येऊन ) स्वामी ! हा मीं आलों.

वसुदेवः—घे तर याला.

नंदगोपः—स्वामी ! ह्या मंदर पर्वतासमान जड बालकाला घ्यायला मी समर्थ नाहीं. माझे बाहू अत्यंत दुर्बल आहेत याला उचलून घ्यायला.

वसुदेवः—मित्रा ! तूं तर सामर्थ्यानं आणि पराक्रमानं फार मोठा आहेस.

नंदगोपः—स्वामींनीं माझ्या सामर्थ्याचा प्रभाव ऐकावा. बैल मस्तीला येऊन शिंगानें माती उकरून डोक्यावर घेत असतां त्याला शिंगानें धरून

त्यापासून परावृत्त करीन, तसेंच दुधानें भरलेले हांड्यांचे गाडे चिखलांत रुतलं असतां ते ओढून वर काढीन, असं माझं सामर्थ्य आहे तरी पण या वेळीं या मुलाला उचलून घेण्याचं सामर्थ्य माझ्यांत नाहीं.

[ नंतर भगवानांची पांच आयुधें आणि गरुड हे प्रवेश करितात. ]

गरुडः—   श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

माझें पंख विशाल, हा गरुड मी, माझा महा वेग तो ।
त्याचा स्यंदन, तेंवि तो ध्वजहि मी,—जो शार्ङ्ग तें वाहतो ॥
जेव्हां दानव दैत्य यांत रण तें होतें महा माजलें ।
तेव्हां विष्णु—कृपाबलेंचि रणिं म्या विष्णुप्रती वाहिलें ॥ २१ ॥

चक्रः—   श्लोक [ वृत्त—इ. व. ]

मी चक्र, शोभा मज दिव्य येते ।
श्रीकृष्ण जेव्हां करि घेत मातें ॥
मध्यान्हिची भास्कर—दीप्ति जैशी ।
माझी प्रभाही अति उग्र तैशी ॥
त्रिलोक जेव्हां हरि आक्रमी ते ।
केलें जधीं सागर—मंथनातें ॥
त्या साधुनी मी उभय प्रसंगा ।
म्यां मारिलें दानव—दैत्य—संघा ॥ २२ ॥

शार्ङ्गः—   आर्या [ गीति. ]

शारंग मी वधू, मम वर्तुल—कटि—मध्य लग्न विष्णु—करीं ।
खेंचुनि मज करिं धरितां नर—बलवीर्यास मी सदर्प हरी ॥
युद्ध—मुखीं मी ठाकुनि, मारुनि रथ, हय, करी, तशी सेना ।
विष्णु—प्रिय म्यां केलें, करुनी समरीं प्रभग्न शत्रूंनां ॥ २३ ॥

कौमोदकीः—   श्लोक [ वृत्त—व. ति. ]

' कौमोदकी'—हरिचिया करिची गदा मी ।
आज्ञेवरूनि सरयूप्रति मंथिलें मी ॥
युद्धामधें वधुनिया बहु दानवां मी ।
त्यांच्याच रक्त—सरिदंतरिं डुंबल्यें मी ॥ २४ ॥

शंखः— आर्या–[ गीति. ]

मी शंख, विष्णुचा कर क्षीरांबुधिच्या मधूनि काढि मला ।
ये माझ्या निर्घोषें मरण रणामाजिं अमर–शत्रु–कुला ॥ २५ ॥

नंदकः— आर्या [ गीति. ]

‘ नंदक ’ खड्ग असे मी, न ठरे समरांत मजपुढें कोणी ।
सत्ताधीश, हरी मज स्मरतां मी जाय तडक धांवोनी ॥ २६॥

चक्रः— श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

शंख, शार्ङ्ग, गदा, चक्र । पातलों सहनंदक ॥
कार्यार्थ वासुदेवाच्या । दैत्यमर्दक सेवक ॥ २७ ॥

तर चला या. आपणहि मनुष्यलोकाच्या ठिकाणीं अवतीर्ण झालेल्या भगवान् विष्णूच्या बालक्रीडेला अनुसरून क्रीडा करण्यासाठीं बालगोपालांचा वेष धारण करून या गौळवाड्यांतच अवतार घेऊं या.

सर्वजणः—ठीक आहे. [ विष्णूचे जवळ जाऊन उभे राहतात. ]

वसुदेवः—मित्रा ! तर या बालकालाच नमस्कार कर. त्यालाच शरण जा.

नंदगोपः—स्वामी ! तसंच करितो. हे राजपुत्रा ! मी तुला नमस्कार-प्रणाम-करितों ! हं आतां अगदीं हलका हो. वाळलेल्या गवताप्रमाणं हलका हो ! तुला उचलून घेण्याइतकं प्रभावी सामर्थ्य गोपजनांच्या ठिकाणीं कोठून असणार ?

चक्रः—भगवान् नारायणांना प्रणाम असोत. हे भगवन् ! हे महा विष्णो !

श्लोक. [ वृत्त–शा. वि. ]

कार्यें दुर्घट जीं करूं न शकती स्वर्गीय ते देवही ।
तीं सारी घडुनी तुझ्याच कडुनी येणार त्यां सिद्धिही–॥
या लोकींच; तरी सलील हलका तूं होउनी सत्वर ।
हे देवा ! यदुनायका ! करि कृपा तूं या जनाचे वर ॥ २८ ॥

वसुदेवः—घे आतां याला.

नंदगोपः—जशी स्वामींची आज्ञा. ( मुलास घेतो. )

वसुदेवः—मित्रा ! रात्र उलटून पहांट झाली. तूं परत जा आतां.

नंदगोपः—आश्चर्य ! आश्चर्य ! स्वामी ! हीं दोन्ही बंधनें गळून पडलीं!

वसुदेवः—हा सर्व या कुमाराचाच प्रभाव ! जा तूं आतां परत.

नंदगोपः—जशी स्वामींची आज्ञा.

वसुदेवः—अथवा थांब, जरा इकडे ये.

नंदगोपः—हा आलों, स्वामी !

वसुदेवः— श्लोक ( वृत्त–पृथ्वी. )

स्वभावचि तुझा असे सहज बा ! सदा प्रेमळ ।
तदर्थ तुज याचितों; धरुनि भाव तो निर्मल– ॥
करी अचल प्रेम तूं यदुकुलावतंसावर ।
कुलांत उरला असे, अहह ! एक जो अंकुर ॥
तुझ्या जवळ ठेवितो गणुनि ठेव माझी महा ।
असीम कुलदग्ध हो, यदुकुलीं उरे बीज हा ! ॥ २९ ॥

कुमाराची तूं कशी काय व्यवस्था ठेवणार ?

नंदगोपः—ऐकावं, स्वामी ! एका घरीं जाऊन हा दूध पिईल, दुसऱ्या घरीं जाऊन हा दही खाईल, तिसऱ्या घरीं जाऊन हा लोणी गट्ट करील, चौथीकडे हा खीर भक्षण करील, इतरत्र ताकाचे डेरे पाहून घेईल, फार काय सांगूं, हा आमच्या साऱ्या गौळवाड्याचा स्वामी होऊन राहील !

वसुदेवः—ठीक, तूं म्हणतोस असंच होवो ! जा, परत जा तूं आतां !

नंदगोपः—जशी स्वामींची आज्ञा. [जातो.]

वसुदेवः—हा नंदगोप तर गेलाच ! तर आता मीहि पण मथुरेलाच जातों. ( इकडे तिकडे फिरून कांहीं ऐकल्यासारखें करून ) कोणी तरी रडत असल्यासारखा आवाज ऐकूं येत आहे हा ! काय,–कंसाचं भय वाटून नंदगोप तर परत आला नाहीं ना ? (पुन्हा इकडे तिकडे फिरून) अरे ! ह्या बालिकेंत पुन्हा चैतन्य आल्याचं दिसतं ! तर आतां हिला घेऊन, देवकीच्या हातीं देऊन त्या दुरात्म्या कंसाला मी चकवितों. (मुलीस उचलून) अहो ! किती तरी जड आहे ही ! हिचं वजन कुमारापेक्षां किंचित् कमी असेल, तरी पण ही बरीच जड आहे. तर जावंच आतां आपण. ( पाहून ) अरे, ही भगवती यमुना पूर्वीप्रमाणेंच अजून दुभंगलेली आहे ! तर पार व्हावं आतां आपण. ( तिच्यांतून पार जाऊन ) या यमुनेंतून

तर पार झालोंच. ही नगरवेश ! मथुरेंतले सर्व लोक मघाप्रमाणेंच अजून गाढ झोंपीं गेले आहेत. तर आतां आपण आंत शिरावं. ( आंत प्रवेश करून ) हें त्या दुरात्म्या कंसाचें घर, लक्ष्मीच्या वडील बहिणीनें—त्या अवदसेनं—ह्याचा आश्रय केल्यासारखं हें दिसतं; आणि हें आमचं घर, इथं लक्ष्मी आरूढ झाल्यासारखी दिसते ! तर आतां आपणहि अंतःपुरांत जाऊन देवकीचं सांत्वन करावं. देव कल्याण करोत !

[ जातो. ]

अंक १ ला समाप्त.

# अंक २ रा.

[ तदनंतर चांडाल स्त्रिया प्रवेश करितात. ]

सर्वजणीः—ये, राजा ये ! आम्हां कन्यांचं तुझ्याशीं लग्न लागूं दे !

[ नंतर राजा प्रवेश करितो. ]

राजाः—अरे ! हें काय आहे बरं ?

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा. ]

पृथ्वी ही कंप पावे दरदरुनि अशी, जेंवि ती सिंधु—नौका— ।
लाटांनीं युक्त ऐशी डळमळत असे जी करी पार लोकां ॥
प्रासादांची पडूनी सुरुचिर शिखरें भूतलीं चूर्ण होतीं ।
हीं चिन्हें संकटांतें सुचविति अथवा वैभवा दर्शवीती ? ॥
ज्या चिन्हांमाजि होतीं प्रकट गुणफलें तेंवि कर्में तशी तीं ।
त्या सर्वां पारखूनी जगिं अनुसरणें ही असे मान्य रीती ॥ १ ॥

सर्वजणीः—ये, राजा ये ! आम्हां कन्यकांचं तुझ्याशीं लग्न लागूं दे !

राजाः— श्लोक. [ वृत्त—शा. वि. ]

ज्या अर्थी नृपहर्म्य रक्षक कुणी येथें न संचारिती ।
किंवा त्या प्रमदा न दीपक करीं घेऊनिया हिंडती ॥
त्या अर्थी शिरल्या मदीय सदनीं चांडाल—कन्याच या !
वर्णें कज्जलतुल्य, कृष्ण, भयदा, नीलोत्पला सारख्या ! ॥२॥

सर्वजणीः—ये, राजा ये ! आम्हां कन्यकांचं तुझ्याशीं लग्न होऊं दे !

राजाः—अहो ! ह्या चांडाल युवतींना काय पण निर्माण केल्या आहेत!

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

क्रोधेंचि होत हत तो मम शत्रु—पक्ष ॥
सेवेंत अग्नि, रवि, चंद्र मदीय दक्ष ॥
मी काल—कालचि, असे, भय मी भयायें ! ।
त्या ह्या मलाहि उपमर्दिति धीटवाचें ! ॥ ३ ॥

सर्वजणीः—ये राजा, ये !

राजाः—अग ए अवदसांनो ! काय,—ह्या एकदम नाहींशा झाल्या ? तर मग आतां आपण आंतच जावं झालं.

[ नंतर शाप प्रवेश करितो. ]

शापः—हं ! आंत कुठं चाललास आतां ! हें आतां माझं घर झालं आहे !

राजाः— श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

वर्णे कज्जल—पुंजसा, करिं धरी उल्का असा कोण हा ? ।
माझ्या गर्भगृहामधें घुसुनिया ठाके कुठूनी अहा ! ॥
दाढा भीषण, तोंड उग्र, नयनें आरक्त राहूपरी ।
वाटे काय शिवाननांतुनि पडे हा क्रोध पृथ्वीवरी ! ॥ ४ ॥

कोण तुम्हीं ?

शापः—काय ? तूं मला ओळखत नाहींस ? मी मधूक ऋषींचा वज्रबाहू नांवाचा शाप आहे ! मी—

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

श्मशान—मध्यांतुनि येथ आलों !
चंडाल—वेषें बहु उग्र झालों ॥
म्यां घेतला वेष विचित्र पाही ।
त्याहींच ही येत कुरूपताही ॥
कंठांत घालूनि कपालमाला ।
कंसांतरीं येत शिरावयाला ! ॥ ५ ॥

कंस—अशक्य गोष्टीच्या प्राप्त्यर्थ ही तुझी धडपड आहे !

श्लोक. [वृत्त—स्रग्धरा. ]

सौवर्णे युक्त मेरू नटवि दरि, गुहा, रम्य शृंगें, तयातें— ।
काकांचे पक्ष—वायू करितिल चल कां देउना कंपनातें ? ॥
लाटांनीं युक्त, नक्रें खचित, जलनिधी जो असे क्षुब्ध झाला ।
त्या जो हस्तांजलीनें वधत नर पिऊं, पात्र हो हास्यतेला ! ॥ ६ ॥

शापः—वेळ आली म्हणजे हें तुला समजेल !

कंसः—हंः हा एकदम कसा नाहींसा झाला ? तर आतां मीहि शय्येवर पडून माझ्या नेत्रांना जरा विसावा देतों. ( निजतो. )

शापः—अरे ! हा तर गाढ झोंपी गेला ! तर हे अवदसे ! हे टकल्ये !

हे कालरात्रि ! हे महानिद्रे ! हे पिंगट नेत्रे ! तुम्ही–सान्याजणी–या आतां. आपण आंत प्रवेश करूं या !

सर्वजणीः—ठीक आहे, तसंच होऊं दे !

[ राजश्री प्रवेश करिते. ]

राजश्रीः—आंत येऊं नका.

शापः—आपण कोण ?

राजश्रीः—काय ? तूं मला ओळखत नाहींस ? मी तर याची लक्ष्मी !

शापः—अस्सं ? हे राजलक्ष्मि ! आपण निघून जा आतां इथून. हें आतां माझं घर झालं आहे !

राजश्रीः—हं:

श्लोक [ वृत्त–व. ति. ]

लंकोपमीं मम गृहीं अविचार–मूर्ते ! ।
मूढा ! कसा शिरसि तूं न गणूनि मातें– ॥
रात्रीं असा; असत आश्रयभूत कोण ? ।
तें सांग,–छेः अधिक भाषण फोल जाण ! ॥
माझा निवास गृहिं ज्या, गृह तें पहाया– ।
कोणास शक्य न; अशक्य तरी घुसाया ! ॥ ७ ॥

शापः—हे देवि ! कमलनिवासिनि ! राजा कंपाचं शरीर सोडून आपण जावं आतां. भगवान् विष्णूची अशी आज्ञा आहे.

राजश्रीः—काय ? विष्णूची आज्ञा आहे म्हणतोस ? फार खेदाची गोष्ट !

दिंडी–छंद.

दीर्घ मातें सहवास या नृपाचा ।
शक्य नाहीं तो त्याग मला याचा ॥
बली तैसा गुण–संग्रही नृपाल ।
करी माझें तप कठिण दीर्घकाळ ॥ ८ ॥

असो ! विष्णूच्या आज्ञेचं उल्लंघन करितांच येत नाहीं ! तेव्हां मीहि आतां विष्णुसंन्निधच जाते. [जाते.

शापः —राजलक्ष्मि तर गेलीच ! आतां हें आमचंच घर झालेलं आहे ! अवदसे ! खल्वाटे ! काळरात्रि ! महानिद्रे ! पिङ्गलाक्षि ! आंत शिरून आपल्या स्वभावाला अनुरूप अशी क्रीडा करा.

सर्वजणीं:—( राजास ) आजपासून तुझं धर्माचरण नाहींसं होवो !

शापः—( राजास )

आर्या ( गीति. )

गाढालिंगन देतों तुजला जो तूं सदा अधर्मरत ।
मुनिशाप पातलों मी ! आतां तूं नाश पावशी त्वरित ! ॥ ९ ॥

[ अदृश्य होतो.

( प्रतिहारी प्रवेश करिते. )

प्रतिहारीः—महाराजांचा विजय असो.

कंसः—हंः कोण ?

प्रतिहारीः—महाराज ! मी यशोधरा आहे.

कंसः—यशोधरे ! चंडाल स्त्रियांनीं आंत प्रवेश केल्याचं तूं पाहिलं नाहींस कां ?

प्रतिहारीः—काय ? चंडाल स्त्रिया म्हणतां ? नेहेमीं महाराजांच्या पायाशीं राहणाऱ्यांचाही इथं प्रवेश होणं कठिण; मग चंडाल स्त्रियांच्या प्रवेशाची गोष्ट तर दूरच !

कंसः—काय—तर मग मी हें सगळं स्वप्नांतच पाहिलं कीं काय ? यशोधरे ! तूं जा, आणि बालाकी कांचुकीला इकडं पाठवून दे.

प्रतिहारी—जशी महाराजांची आज्ञा ! [ जाते.

[ नंतर कांचुकीय प्रवेश करितो. ]

कांचुकीयः—महाराजांचा विजय असो.

कंसः—आर्य बालाके ! जोशीबुवा आणि पुरोहित यांना विचार कीं आजच्या रात्रीं जें वातचक्र उठलं, जे भूमिकंप आणि उल्कापात झाले, आणि ज्या दैवी प्रभा दृष्टीस पडल्या, त्यांचा काय अर्थ समजायचा ?

कांचुकीयः—महाराज ! जोशी आणि पुरोहित यांचं म्हणणं असं आहे कीं—

**कंसः**—काय म्हणणं आहे त्यांचं ?

**कांचुकीयः**—ऐकावं महाराजांनीं:—

श्लोक. [ वृत्त—वसंत ति० ]

जें तत्व वास करि नित्य नभीं नृपाला !।
कार्यार्थ थोर इहलोकिंच घे जनूला ॥
आकाशदुंदुभि-रवें धरणी प्रकंपे ।
तें जन्मतां विकृत होउनि सृष्टि कांपे ! ॥ १० ॥

आर्या [ गीति. ]

**राजाः**— कवणाचे जन्मानें कांपे वसुधा महीधरांसह ही ।
झाला पुत्र कुणातें, कोणा कार्यार्थ? शोधुनी येई ॥११॥

समजलास ?

**कांचुकीयः**—जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन पुन्हा परत येऊन ) महाराजांचा विजय असो. राजभगिनी देवकीला कन्या झाली आहे.

**कंसः**—खरं कां हें ?

**कांचुकीयः**—महाराज ! यापूर्वी मी केव्हांहि खोटं बोललों नाहीं. सेवक जनांनीं परिवेष्टित अशा धात्रीच्या हातीं मी ती कन्या पाहिली.

**कंसः**—अथवा ब्राह्मणाचं भाषण खोटं असलं तरी मला तें खरंच वाटतं. जा तर, वसुदेवाला बोलावून घेऊन ये इथं.

**कांचुकीयः**—जशी महाराजांची आज्ञा ! [जातो.]

**राजाः**—वसुदेव धर्मशील आणि सत्यवादी आहे. तो माझ्याजवळ खोटं बोलत नाहीं. ठीक, ऐकू याच तर तो काय म्हणतो तें.

[ नंतर वसुदेव प्रवेश करितो. ]

**वसुदेवः**—मी— श्लोक, [ वृत्त—भु. प्र. ]

बघूनी सहाही सुतांचा विनाश ।
वहातो अशा शोक-सूक्ष्मा तनूस ॥
मला निर्दयी भूप पाचारिताहे ।
पराधीन मी भृत्यसा जात आहे ! ॥ १२ ॥

अहो ! या जगांतला व्यवहारच असा आहे,:—

श्लोक- [ वृत्त–अनुष्टुप. ]

राजा स्मरे तरी भीति । न स्मरे तरि ही भय ! ।
असो भीति नसो वा ती । लागे दोहींत जावया ॥१३॥

( जवळ जाऊन ) हे शौरसेनीपुत्रा !

कंसः—हे यादवीपुत्रा ! बैस इथं.

वसुदेवः—ठीक आहे. ( जवळ बसून ) हे शौरसेनीनंदना ! आम्हांला कशा करितां बोलावलंत ?

कंसः—हे यादवीपुत्रा ! देवकी खरोखर प्रसूत झाली आहे काय ?

वसुदेवः—हो, झाली आहे. मग ?

कंसः—काय झालं आहे तिला ?

वसुदेवः—( आत्मगत ) मला सुद्धां आतां खोटंच बोलावं लागणार ! अथवा कुमाराचं रक्षण करण्याकरितां खोटं बोलणं हें देखील सत्यच, असं मला वाटतं. तर आतां काय वरं करावं ? ठीक ! आलं लक्षांत ! ( उघड ) तिला कन्या झाली.

कंसः— श्लोक [ वृत्त–इं. व. ]

कन्या असो कीं असु दे कुमार, ।
मी निश्चयें त्याप्रति मारणार ॥
दैवाप्रती टाकिन वंचुनीया ।
मी पौरुषा निश्चित योजुनीया ! ॥ १४ ॥

[ प्रतिहारी प्रवेश करिते. ]

प्रतिहारीः—महाराजांचा विजय असो. राजभगिनीची विनंति आहे कीं:—झालेलं मूल,—बालिका-कन्या आहे, म्हणून महाराजांनीं दया करावी.

वसुदेवः—हे शौरसेनीनंदना ! बिचाऱ्या देवकीचें म्हणणं मान्य कर. कन्यांच्या ठिकाणीं स्त्रियांचें प्रेम अधिक असतं.

कंसः—तुम्हांला माझ्या प्रतिज्ञेचें स्मरण आहे कां ?

श्लोक–[ वृत्त–इं. व. ]

देतां मला शाप मधूक ते मुनी । ।
केली प्रतिज्ञा, विसरेन कोठुनी ॥




**कंसः**—अहो ही मुलगी राजबिंडी, सुंदर आणि तेजस्वी आहे ! मला सुद्धां त्रिविध करणं प्राप्त झालं आहे !

[ बाल० पृ. २९

कीं देवकी गर्भ धरील त्याप्रत ।
देईन मी तूर्ण बळी सुनिश्चित ॥ १५ ॥

वसुदेवः—प्रतिज्ञा म्हणतां ? तर मग कांहीं बोलायचं नाहीं.

प्रतिहारीः—महाराज ! तर मी आमच्या देवीला काय सांगूं ?

कंस—यशोधरे ! देवीला असं सांग कीं—या वेळीं अशा प्रकारचा आग्रह करणं युक्त नव्हे. या पेक्षांहि तुझं कांहीं अधिक प्रिय असेल तर तें मी करीन.

प्रतिहारीः—जशी महाराजांची आज्ञा !

कंसः—यशोधरे ! जा, मी सांगितल्याप्रमाणें कर.

प्रतिहारीः—तर आतां आपण सुखानं आंत जावं.

वसुदेवः—अरे ! शुद्ध हेतू धरणाऱ्या मला देखील दुसऱ्याचं मूल मृत्यु-मुखीं पडूं द्यावं लागत आहे ! अथवा त्या कुमारालाच आणून देऊं कां याच्याकडे ?

श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

एकदां मृत झालेली । पुन्हा चैतन्य पावत ।
प्रभावें या कुमाराच्या । न पावेल वधाप्रत ! ॥ १६ ॥

तर आतां आपण जाऊन देवकीचं सांत्वन करावं. [जातो.

कंसः—यशोधरे ! जा, जा त्या मुलीला इकडे घेऊन ये.

यशोधराः—जशी महाराजांची आज्ञा ! [ जाते.

[ नंतर मुलीला घेऊन धात्री व रक्षक—पुरुष प्रवेश करितात.]

सर्वः—( धात्रीला ) हळू हळू ये आर्ये. हा मधला दरवाजा. आर्येनं आंत यावं.

धात्रीः—महाराजांचा विजय असो. ही मुलगी—हिचं आम्हीं आज फार दिवस रक्षण केलं आहे.

कंसः—अहो ही मुलगी राजबिंडी, सुंदर आणि तेजस्वी आहे ! मला सुद्धां स्त्रीवध करणं प्राप्त झालं आहे !

धात्रीः—महाराज ! हळू—हळू—अंमळ बेतानं धरावी हिला.

कंसः—ही कंसशिला ! तर आतां हें भयंकर काम उरकून टाकतों.

श्लोक [ वृत्त–अनुष्टुप. ]

ऋषिशापबळें झाला । हाच तो गर्भ सातवा ।
गर्भाचा नाश या होतां । लाभेल मज शांतता ॥ १७ ॥

( मुलीस घेऊन हांपटून ) अरे ! हिचा—

आर्या [ गीति. ]

एकार्ध पडे भूवरि, एकांश पुन्हा जाइ चढुनि स्वर्भुवनीं ।
परते वधार्थ माझ्या, उज्वल शस्त्रें करांमधें धरुनी ! ॥ १८ ॥

अरे, ही आतां:—

आर्या [ गीति. ]

येतां विनाश–कालचि प्रकटतसे कालरात्र ती जैशी ।
तीक्ष्णाग्र शूल घेउनि भीषण वेषेंचि येत ही तैशी ! ॥ १९ ॥

[ नंतर कात्यायनी सहपरिवार प्रवेश करिते. ]

कात्यायनी:— श्लोक [ इं. वंशा. ]

शुंभा, निशुंभा, महिषास मर्दुनी ।
नाशाप्रती देव–रिपूंस नेउनी ॥
कात्यायनी कंसकुलक्षयार्थची ।
जन्मास घेई वसुदेव–वंशिं ही ! ॥ २० ॥

कुंडोदर:— आर्या [ गीति. ]

देवीचा कुंडोदर मी समरीं चंड कर्म करणारा–।
अजित, प्रसूति–समयीं उग्र निनादा महा उठविणारा ॥
अति वीर्याच्या दर्पे फुगलेल्या दानवां वधायातें ।
गगना त्यजूनि जातों शीघ्रचि मी त्या विशाल वसुधेतें ॥२१॥

शूल:— साकी वृत्त.

शूल असे मी त्या देवीचा, भूमितलीं अवतरलों ।
भूत असुनि मी, तिच्या प्रसादें सुंदर रूपें झालों ॥
वधुनी युद्धीं कंसाला मी, करीन कर्षण त्याचें ।
जेंवि तारका वधितां केलें स्कंदें त्या सिंधूचें ! ॥ २२ ॥

नीलः— श्लोक [ वृत्त—व. ति. ]

मी नील, कारण असे कल्हा त्रिलोकीं ।
संग्रामशूर, रणिं पाठ न दाविर्तो कीं ॥
कंसा प्रमत्त वधितों करुनी रणातें ।
क्रौंचास छिन्न करि स्कंद जसा स्वहस्तें ! ॥२३॥

मनोजवः— श्लोक [ वृत्त—पृथ्वी. ]

मनोजवचि मी असे, गति मदीय वायूपरी ।
इथें प्रकट जाहलों धरुनि देविकार्या करीं ॥
जसें अनल टाकितो विपिन बोरुचें जाळुन ।
तसें रणमुखीं अजीं करिन दैत्य—संमर्दन ! ॥ २४ ॥

कात्यायनीः—कुंडोदरा ! शंकुकर्णा ! महानीला ! मनोजवा ! या तर आतां. आपण भगवान् विष्णूच्या बाललीलांचा आस्वाद घेण्याकरितां ह्या गौळवाड्यांतच गोपालांच्या वेषाचा आश्रय करून अवतार घेऊं.

सर्वजण—जशी देवींची आज्ञा. [ कात्यायनी सहपरिवार निघून जाते. ]

कंसः—अरे, रात्र उलटून उजाडलं कीं, तर मग आतांः—

आर्या ( गीति. )

शान्त्यर्थ शिरुनि सदनीं आहे जें उचित शांतिकर्मातें ।
विपुला शांति करुनी मन्मन पावेल पूर्ण शांतीतें ॥ २५ ॥

( सर्वजण जातात. )

दुसरा अंक समाप्त.

# अंक ३ रा.

[ नंतर वृद्ध गोपालक प्रवेश करितो. ]

वृद्ध गोपालकः—अरे, ए मेघदत्ता ! ए वृषभदत्ता ! ए कुंभदत्ता ! ए घोषदत्ता ! अरे, हांका–हांका गाईना. ह्या वृंदावनांत पोटभर पाणी पिऊन गाई हंबरत येत आहेत. हा बैल गाईबैलांच्या कळपांतून निघून वारुळाच्या बुडाशीं शिंगें मार–मारून धक्के देत आहे; त्यामुळं ह्याच्या शिंगांना मृत्तिकेच्या वर्णाचे आणि निळ्या कमळांच्या रंगाचे साप जसे कांहीं वेष्टिले आहेत असा हा दिसत असून त्यामुळें तो फार शोभत आहे. हा दुसरा एक बैल कांतीनें चंद्रासारखा शुभ्र असून, आपली शेपटी ताठ उभारून, पुढील गुडघे थोडे वांकवून, शिंगांच्या अग्रभागांनीं पृथ्वी जशी कांहीं उलथूनच टाकीत आहे, अशा प्रकारें शोभायमान दिसत आहे. तर आतां मी दामकाला हांक मारितों. अरे, दामका ! ह्या गोदेवतांना आणि त्यांच्या वासरांना चांगल्या जागीं उभें करून तूं इकडे ये.

[ नंतर दामक प्रवेश करितो. ]

दामकः—अहो ! स्वामी नंदगोपाचं हें कुरण किती तरी मोठं आहे ! त्यांना पुत्र झाल्या दिवसापासून तर इथं अधिकच आनंद आणि आश्चर्य वाटण्याजोग्या गोष्टी घडत आहेत ! हें गो–कुल इथंच उभं राहूं दे. मी आतां मामांच्याकडे जातों. ( वृद्धगोपालकाचे जवळ जाऊन ) मामा ! मी तुम्हांला नमस्कार करितों.

वृद्धगोपालकः—आमचं आणि गोधनाचं कल्याण असो !

दामकः—मामा ! नंदगोपांना मुलगा झाला त्या दिवसापासून आमच्या गोधनाला रोगराई कशी तो शिवली देखील नाहीं. सगळ्या गोपाळांचं परस्परांमधील प्रेम वाढत आहे. जिथं खणतों तिथं कंदमुळं लागतात, आणि झाडाला फळंच फळं येतात !

वृद्धगोपालकः— हेंहि आणखी दुसरं एक आश्चर्य आहे. नंदगोपाला पुत्र होऊन त्याच्या जन्माचा दहावा दिवस होता, त्या दिवशीं पूतना नांवाची एक राक्षसी नंदगोपी यशोदेचं रूप धारण करून आली, आणि तिनं या मुलाला घेऊन आपला स्तन त्याच्या तोंडांत दिला. त्यानं तिला ओळखून, शोषून

शोषून तिथं पाडली आणि मग ती राक्षसी होऊन तिथंच मरून पडली ! तो एक महिन्याचा झाला तेव्हां शकट नांवाचा एक दानव शकट (गाडा) रूपानं नंदगोपाच्या मुलाकडे आला. त्यानं त्याला ओळखून एकाच लत्ताप्रहारानं त्याचं चूर्ण करून टाकिलं. तेव्हां तो दानवरूप पावून तेव्हांचे तेव्हांच तिथं मरून पडला ! ह्या नंतर एका महिन्यानं नंदगोपाच्या ह्या कुमारानं एकाच्या घरीं जाऊन दूध प्यायचं, दुसऱ्याच्या घरीं जाऊन दहीं खायचं, तिसऱ्याच्या घरीं जाऊन लोणी गट्ट करायचं, चवथ्याच्या घरीं जाऊन खीर खायची, आणखी दुसऱ्या कोणाच्या तरी घरीं जाऊन ताकाचे डेरे धुंडाळायचे असा क्रम सुरू केला. ह्यामुळं गौळणींनीं सताऊन जाऊन यशोदेकडे गाऱ्हाणीं सांगितलीं. तेव्हां नंदगोपी यशोदेला राग येऊन तिनं एक दोरी घेऊन ती कुमाराच्या कंबरेला बांधून, उरलेली दोरी तिनं उखळीला बांधून टाकली. पण कुमाराच्या दांडगाईनं ती उखळी हालत असल्याचं पाहून तिनं ती उखळी यमला आणि अर्जुन अशा दोन झाडांच्या मध्यें ठेविली;—ही दोन झाडं म्हणजे झाडांच्या रूपांत असलेले दोन दानव होते !— तेव्हां हीं दोन झाडं एक झालीं ! त्या दोन्ही झाडांच्या बेळक्यांत असलेल्या नंदगोपाच्या कुमारानं—त्या उखळाच्या दणक्यांनीं त्या एकवटलेल्या झाडांचं समूळ चूर्ण करून टाकलं. तेव्हां त्या झाडांचे दोन दानव होऊन ते तिथल्या तिथं मरून पडले ! यावेळीं सगळे गवळी म्हणाले:— "ह्याच्या सामर्थ्याचा प्रभाव फार मोठा आहे, तेव्हां आजपासून याचं नांव ( भर्तृ ) धनी दामोदर असं ठेवूं या !" यानंतर हा नंदगोप—कुमार चोहोकडे बागडत खेळत आणि धांवत असतां, नंदगोपाच्या वेषानं प्रलंब नांवाचा दानव तिथं आला आणि बळरामाला खांद्यावर टाकून तो राक्षस जाऊं लागला. तेव्हां बळरामानं त्याला ओळखून, त्याच्या डोक्यावर मुष्टिप्रहार केला. त्याबरोबर त्याचे डोळेच बाहेर पडले; आणि मग तोहि दानव होऊन तिथल्या तिथं मरण पावला ! तसंच हा नंदकुमार गोपाळांचा परिवार बरोबर घेऊन ताडफळें आणण्यासाठीं एकदां तालवनांत गेला होता. त्या तालवनांत धेनुक नांवाचा एक राक्षस गर्दभाचा वेष घेऊन आला. तेव्हां दामोदरानं यालाहि ओळखून, त्याच्या डाव्या पायाला धरून त्याला वर फेकून त्यानं ताडफळं पाडिलीं ! तेव्हां तोहि राक्षस होऊन तिथल्या तिथं मरण पावला ! ह्यानंतर केशी नांवाचा एक

दानव घोड्याचं रूप घेऊन आला. पण धनी दामोदरानं त्याला ओळखून त्याच्या तोंडांत आपलं कोंपर खुपसलं, त्या बरोबर त्याच्या दोन चिरफळ्या झाल्या आणि तो दानव होऊन तिथल्या तिथं मरून पडला! हे,–आणखी अशा प्रकारचेच दुसरे अनेक चमत्कार या धनी दामोदरानें केले!

दामकः—मामा! राहूं दे तें सगळं. आज हा धनी दामोदर या वृंदावनामध्यें गोपकन्यांबरोबर ‘ हल्लीसक ’ नांवाचा नाच करायला येणार आहे.

वृद्धगोपालकः—तर मग सर्व गोपजनांसह आपण या धनी दामोदराचा हा हल्लीसक नाच पाहूं या.

दामकः—जशी मामांची आज्ञा.

[ दोघेहि जातात. ]

प्रवेशक समाप्त.

[ वृद्ध गोपालक प्रवेश करितो. ]

वृद्धगोपालकः— श्लोक [ वृत्त–व. ति. ]

धेनू सदा अमृत–पूर्णचि विश्वमाता।
वंदा तयां परम सादर नम्र माथां॥
आला न जो गिरिवरी उदयास भानू।
तों त्यां करा प्रणति, वंद्यचि माय धेनू॥ १॥

अहो! हीं आमचीं खोपटं अगदीं समृद्ध आहेत. नगाऱ्यासारखं रूप आणि वेष घेणारे आम्हीं दोंदिलपोटे तिकडेच दंगल करायला जातों आहों. अगं ए आमच्या गोपकन्यकांनों! अग ए घोषसुंदरि! ए वनमाले! ए चंद्ररेखे! मृगाक्षि! या, या लौकर.

[ नंतर सर्वजणीं येतात. ]

सर्वजणींः—मामा! नमस्कार करितों.

वृद्धगोपालकः—मुलींनों! हा गाईच्या दुधासारखा गौरवर्ण धनी दामोदर बळरामदादासह, इकडंच येतो आहे. हे पाहिलंत कां ह्यांच्या भोंवतीं गोपाळांचा मेळा आहे, त्यामुळं हा गुहेंत राहणारा जसा कांहीं सिंहच आहे असा दिसतो आहे.

[ नंतर गोपालांनीं वेष्टित असा दामोदर बलरामासह येतो. ]

दामोदरः—( विस्मयपूर्वक ) अहो! जात्याच सुंदर असणाऱ्या ह्या गोपकन्यकांनीं हा काय विलक्षण वेष धारण केला आहे ?

श्लोक [ वृत्त—व. ति. ]

यांचीं प्रफुल्ल कमलासम आननें हीं ।
नेत्रें सुनील कमलासम फुल्ल पाहीं ॥
अंगें तशीं कनकचंपक—पुष्प—गौर ।
गोपांगना दिसति खेळत येथ स्वैर ॥
सेवूनि रम्य वसनांप्रति चित्रवर्ण ।
संल्लापिती वदुनि मंजुल मंजु वर्ण ॥
घेती करीं विपिनिचीं सुमनें अपार ।
त्यांहींच भूषविति या निज केशभार ॥ २ ॥

संकर्षणः—हे गोपकुमारहि जमले आहेत.

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

रंगी 'वेसुक' ढोलकीं बघुनिया चित्तीं बहू हर्षुनी ।
कांहीं गोप तिथें उभे,—निनद ते काढीत त्यांच्यांतुनी ॥
ज्यांची पद्मदलासमान रुचिरें नेत्राननें शोभतीं ।
ऐसे गोप कुणी अनेक परिच्या खेळांमधें रंगती ॥
गाई हंबरुनी निनाद घुमतां त्या गौळवाड्यामध्यें ।
तेथें राहुनि दक्ष गोप वरिती आनंद जैसा मुदें ॥
येतां गोप व्रजांत त्याच परिचा आनंद मोठा तयां
लाभे येथ, इथेंच राहति कुणी गानांत रंगूनिया ! ॥ ३ ॥

वृद्धगोपालकः—होय, धनी ! सर्वजण जय्यत तयारी करून आले आहेत.

दामकः—धन्यांचा विजय असो.

संकर्षणः—दामका ! सगळे बालगोपाल जमले काय ?

दामकः—होय, धनी ! सगळेजण जय्यत तयारीनें आले आहेत.

दामोदरः—ए घोषसुंदरि ! वनमाले ! चंद्ररेखे ! मृगाक्षि ! गौळवाड्यांतल्या राहणीला अनुरूप असा हा फेराचा हल्लीसक नाच सुरू करा.

**सर्वजणीः**—जशी धन्याची आज्ञा.

**संकर्षणः**—दामका ! मेघनादा ! वाद्यं वाजवा.

**दोघेः**—ठीक आहे, धनी !

**वृद्धगोपालकः**—धनी ! तुम्हीं हल्लीसक नाच—ही रासक्रीडा—करीत आहां, मी काय करूं इथं ?

**दामोदरः**—तुम्हीं प्रेक्षक आहांतच !

**वृद्धगोपालकः**—ठीक, ठीक धनी !

[ सर्व—चक्राकार—नाचूं लागतात. ]

**वृद्धगोपालकः**—हीः हीः हीः हीः छान गायलं ! छान वजावलं ! आणि नर्तनहि पण सुंदर केलं ! तर आतां मीहि नाचतों थोडा ! ( नाचून ) आपण तर नाचून अगदीं थकून गेलों बुवा !

[ एक गोपालक प्रवेश करितो. ]

**गोपालकः**—हां ! हां ! धन्यानीं इथून निघून जावं.

**दामोदरः**—दामका ! तूं असा गडबडून कां गेला आहेस ?

**गोपालकः**—हा अरिष्ट-वृषभ नांवाचा दानव-तुफान वाऱ्याचं रूप घेऊन—आपल्या खुरांनीं जमीन उकरून, मेघाच्या गडगडाटा सारख्या भीतिप्रद डुरकण्या फोडीत आहे !

**दामोदरः**—अस्सं ? एकून अरिष्ठ—वृषभ आला तर इथं ? ठीक आहे. तर मग आर्यांनीं या आमच्या गोपकन्यांना आणि कुमारांना घेऊन या पर्वताच्या शिखरावर चढून जावं आणि तेथून ह्या दुरात्म्याचा आणि आमचा जंगी युद्धसंग्राम पहावा ! मी त्याचा दर्प नाहींसा करून टाकतों !

[ त्यांच्यासह संकर्षण जातो. ]

**दामोदरः**—हा—हा दुरात्मा अरिष्टर्षभ—

श्लोक—[ वृत्त—उपजाति. ]

विदारूनि भूमी स्वतःच्या खुरांनीं ।
रची मातिच्या राशि शृंगांकुरांनीं ॥
भयें व्याप्त ते गोप ज्या प्रेक्षितात ।
जवें गर्जुनी पोळ तो धांव घेत ! ॥ ४

( नंतर अरिष्टर्षभ प्रवेश करितो. )

अरिष्टर्षभः— आर्या ( गीति. )

शृंगाग्रांच्या किरणीं ओरखडाया नभास जणुं सजलों ।
तो मी शत्रुवधार्थ स्वीकारुनि वृषभरूप हें आलों ॥
वृंदावनांत रिपु मम तो करि प्रतिगर्जनेस, त्या आज ।
लीलेनें निवटुनिया येथेंची मी फिरेन कृत–काज ! ॥ ५ ॥

माझ्या— श्लोक–[ वृत्त इं. व. ]

हुंकार शब्दा परिसूनि थोर ।
गोपी पहा टाकिति गर्भ–भार ! ॥
खुराग्रपातें सहवृक्ष भद्रा– ।
भू कांपते होउनि अर्धचंद्रा ! ॥ ६ ॥

कुठं–कुठं गेला तो नंदगोपाचा कुमार ? अरे, ए नंदगोपाच्या पोरा ! कुठं आहेस तूं ?

दामोदरः—अरे, वृषभाधमा ! इकडं–इकडं पहा, हा मी इथं उभा आहे.

अरिष्टर्षभः—( पाहून ) अहो—

श्लोक [ वृत्त–उपजाति. ]

बळी महा मी, मम उग्र रूप, ।
हुंकार माझाहि तसा अमूप ॥
यांहीं न हो विस्मित वा न भीत! ।
हा बाल नोहेचि महा समर्थ ! ॥ ७ ॥

दामोदरः— श्लोक [ वृत्त– ]

हें काय रे ! ऐकविशी श्रुतीतें ? ।
हें ' भीत ' किंवा ' भय ' शब्दही ते ॥
म्यां ऐकिले आजचि जाण यांतें ।
मी पातलों भीति हरावयातें ॥
या भूतलीं ज्या भय प्राप्त होतें ।
देण्या तयातें निज आश्रयातें ॥ ८ ॥

अरिष्टर्षभः—अरे ! तूं पोर आहेस ! म्हणूनच तुला भयाची अजून ओळख नाहीं.

दामोदरः—अरे, गोवृषाधमा! मला पोर म्हणून,–माझी हेटाळणी करितोस !

श्लोक ( वृत्त–अनुष्टुप. )

पिलानें कृष्ण–सर्पाच्या ।
दंशितां कोण वांचतो ? ॥
स्कंद होता जरी बाल ।
क्रौंचाही करि चूर्ण तो ! ॥ ९ ॥

अरिष्टर्षभः—असेल तसं !

दामोदरः— आर्या ( गीति. )

ऐके हेंही मूर्खा ! कठिण खडे मिळुनि शैल जो बनला ।
तो तृणदल वज्रेंची तुकडे होऊनि भूवरी पडला ! ॥ १० ॥

अरिष्टर्षभः—अरे, ए नंदगोपाच्या पोरा ! मग काय ठरलं तुझं ?

दामोदरः—तुला मृत्यूच्या हवालीं करण्याचं !

अरिष्टर्षभः—इतकं सामर्थ्य आहे तुझ्यांत ?

दामोदरः—यांत काय संशय ?

अरिष्टर्षभः—तर मग आपल्या गुराख्याच्या जातीला साजेल असं शस्त्र घे पाहूं.

दामोदरः—काय, शस्त्र ? हः अरे !

श्लोक. [ वृत्त–स्रग्धरा. ]

बाहू हे पाहिं माझे ! असति कठिण ज्या स्कंध शैलासमान ।
हे होती दुर्बलातें–तुजसम–वधण्या शस्त्रची अन्य जाण ! ॥
दंडांनीं मद्भुजांच्या सहज रगडण्या पात्र जो सर्वथा तूं ।
त्या तूतें भूमिभागीं रगडिन न जरी व्यर्थ मन्नाम–हेतू ! ॥ ११ ॥

अरिष्टर्षभः—तर मग चल, ये युद्धाला !

दामोदरः—अरे, गोवृषाधमा ! तुझ्या अंगांत सामर्थ्य असेल तर हा पहा मी एका पायावर उभा आहे, नुसतं हालीव पाहूं मला जरा !

अरिष्टर्षभः—याचाहि तुला संशय ? ( तसें करूं लागतो तोंच मूर्च्छित होऊन पडतो. )

दामोदरः—अरे, गोवृषा ! सावध हो, सावध हो. एकून याच सामर्थ्याचा तुला गर्व होता तर !

अरिष्टर्षभः—( सावध होऊन आपल्याशीं ) ह्या बालकाच्या सामर्थ्यापुढं टिकाव लागणं कठिण !

श्लोक. [ वृत्त—इं. व. ]

हा रुद्र, कीं इंद्र, कळे न कांहीं ।
कीं विष्णु प्रत्यक्षचि येथ येई ! ॥
माझा न तो तर्क असत्य झाला ।
मी पाहतों या पुरुषोत्तमाला ! ॥ १२ ॥

श्लोक—[ वृत्त—शालिनी. ]

जेथें जेथें जन्मतों आम्हि दैत्य ।
तेथें तेथें विष्णुही जन्म घेत ॥
त्रैलोक्याचें धारणा-कार्य ज्यातें ।
त्याला लागे जन्म हा घ्यावयातें ॥
निर्दाळाया दानवां दैत्यलोकां ।
रक्षायातें सर्वथा त्या त्रिलोकां ॥ १३ ॥

ठीक आहे, विष्णूकडून जर मी मारला गेलों तर मला अक्षय लोकांची प्राप्ती होईल. तेव्हां याच्याशीं मी युद्धच करणार ! ( उघड ) अरे, नंदगोपाच्या पोरा ! हा पहा, पुन्हां मला गर्व चढला आहे !

दामोदरः—हं ! थांब, थांब तिथं. अरे,—

श्लोक—[ वृत्त— इं. व. ]

कां सांपडूनी मम बाहुपाशीं ।
वर्षाघनाच्या सम गर्जितोसी ? ॥
वर्षर्तुमध्यें घन पुष्ट होती ।
ते कोसळायास्तव भूमि-पृष्ठीं ! ॥
ये, ये ! तुला मी धरणीतलातें ।
फेंकूनि देतों करि आश्रयातें ॥
जैसा कडा अंजन पर्वताचा ।
वज्रें पडे, त्यापरि तूंहि साचा ! ॥ १४ ॥

( तसें करून ) हा, हा दुरात्मा अरिष्टर्षभ !

श्लोक [ वृत्त–हरिणी. ]

गळति रुधिरांच्या ज्या धारा तनूंतुनि याचिया ।
वदन, नयनें, नासा त्यांहीं विलिप्तचि होति ह्या ॥
वृषभ–वपु या दैत्येंद्रा ये जरी मृति भूवरी ।
स्फुरण अजुनी कर्णीं, पायीं, दिसे किति हें तरी ! ॥
धराणि–गत हीं वाशिंडेंही सपुच्छचि हालतीं ।
पडत जणुं हा वज्राघातें महीधर खालतीं ! ॥ १५ ॥

[ दामक प्रवेश करितो. ]

दामकः—धन्यांचा विजय असो ! हे धनी बलरामदादा यमुनेच्या डोहांत कालिया नांवाचा मोठा सर्प उठल्याचं ऐकून, पर्वत सोडून त्याचेकडे जावयाला निघाले आहेत. तर तिकडं जाण्यापासून धनी बलरामदादाचं निवारण करा, निवारण करा !

दामोदरः—मी सुद्धां 'कालिय' नांवाचा एक स्वतःच्या सामर्थ्याची घमेंड बाळगणारा–मोठा पन्नग राजा असल्याचं ऐकलं आहे ! ठीक आहे, मी त्याची घमेंड उतरवितों !

श्लोक. [ वृत्त–अनुष्टुप. ]

गो ब्राह्मण प्रजानां दे । त्रास हा फार, ऐकितों ।
आजपासूनि शांतात्मा । होवो सामर्थ्यहीन तो ! ॥ १६ ॥

[ सर्वजण जातात. ]

—अंक ३ रा समाप्त.—

# अंक ४ वा.

[ नंतर दामोदर प्रवेश करितो. ]

दामोदरः— श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

ज्यांचे नेत्र चकोरशावकगणांच्या सारखे सुंदर. ।
तैसे उन्नत ते स्तनाग्र, हलती ते चारु बिंबाधर ॥
ज्यांच्या केशकलापिंच्या पडाति त्या माळा फुलांच्या पहा ।
ज्यांचीं तीं पडतीं गळूनि सगळीं अंगोत्तरीयें अहा ! ॥
कालेया भुजगाधिपा बघुनि त्या धांवूनि गोपस्त्रिया ।
माझ्या मागुनि येति पीडित—मना टाहोचि फोडोनिया ! ॥१॥

[ नंतर गोपकन्या प्रवेश करितात. ]

सर्वजणीं—नका नका, धनी ! त्या डोहांत नका शिरूं ! हा डोह म्हणजे मोठ मोठ्या दुष्ट सापांचं घर आहे !

दामोदर—छेः छेः तुम्हांला असं भेदरून जाण्याचं मुळींच कारण नाहीं. आतां काय होतं तें तुम्ही पहाः—

श्लोक. [ वृत्त—स्रग्धरा. ]

पक्षी किंवा वनींचे पशुगणहि जिथें जात नाहींत पाही ।
ज्याच्या तोयाकडे ते भयचकित दृशीं लक्षितातो करी ही ॥
ऐशा या खोल डोहीं जलनिधिसमची स्निग्धनीरीं शिरूनी ।
संक्षोभानेंचि त्याच्या भुजगपतिस त्या टाकितो क्षोभवूनी ॥
भीतीनें त्रस्त गोपी प्रिय मधुर वचें वारिताती जरी त्या ।
त्यांच्याही नादरोनी हितकर—वचना, क्षोभवूनी जला ह्या ॥
कालिंदीच्या जलीं जो वसति करुनिया लुब्ध होऊनि राहे ।
त्या कालीया भुजंगा प्रबलविषधरा मर्दितो आजि पाहे ! ॥ २ ॥

सर्वजणीं—अहो, धनी बलरामदादा ! धनी दामोदराचं निवारण करा, निवारण करा !

[ संकर्षण प्रवेश करितो. ]

संकर्षणः—बस्स, बस्स झालं हें भेदरणं आणि हा आक्रोश ! यानं तुमचं प्रेम दिसून आलं. आतां हा काय प्रकार होतो आहे तो पहाः—

श्लोक. [ वृत्त–शा. वि. ]

फूत्कारेंचि मुखांतुनी अशिवसा जो ये विषाग्नी महा ।
ज्वालांनींच तदीय सर्वहि दिशा आरक्त झाल्या पहा ! ॥
वेगें चालुनि कृष्ण येत बघुनी, साशंकची होवुनी ।
घे ओढूनि फणांस आंत, फणि तो सर्वांग वेटाळुनी ॥ ३ ॥

सर्वजणीं—हं ! धनी दामोदर तसेच प्रतापी आहेत.

दामोदरः—सर्व लोकांच्या कल्याणाकरितां ह्या सर्पराजाला मी ताबडतोब–आतांच्या आतां–आपल्या कह्यांत आणितों. ( असें म्हणून डोहांत प्रवेश करितो. )

सर्वजणीं:—हा हा ! हा धूर उठूं लागला !

दामोदरः—अहो ! कितीतरी खोल डोह आहे हा ! इथं:—

[ श्लोक–स्रग्धरा. ]

जैशी ये रम्य कांती पडुनि सुरकत्या रेशमी कृष्णवस्त्रा ।
तैशी कालिंदिच्या या लहरि उसळुनी, ये तिच्या चारुपात्रा ॥
ह्या काळ्या भोर लाटा द्रवुनि मणि जणूं इंद्रनीलांग झाल्या ।
धूमें या कालियाच्या धुरकट बनलें नीर कालिंदिचें या ॥
त्या ह्या कालिंदिचें हें हृदय करिन मी कालकूटाग्निसक्त ।
मर्दूनी चंड नागा सदवन करणें, हें गमें कार्य युक्त ॥ ४ ॥

[ जातो. ]

( तदनंतर वृद्ध गोपालक प्रवेश करितो. )

वृद्ध गोपालकः—हां हां धनी ! गोपकन्या नको नको म्हणत असतां देखील हा यमुनेच्या डोहांत शिरलाच ! नका–नका असं डोहांत शिरण्याचं साहस करूं नका. इथं वाघ, हत्ती, डुकरं–हें पाणी पिऊन तिथल्या तिथं मरून पडतात ! अरे ! हा दिसत नाहींसा कसा झाला ? काय करावं बरं आतां ? ( विचार करून ) अथवा असंच ! मी आतां ह्या कुंभपलाशावर चढतों आणि तिथून निरखून पहातो. ( झाडावर चढून ) हो, हो ! हा तर धूम उठूं लागला !

संकर्षणः—गोपकन्यांनो ! हें पहाः—

[ श्लोक-उपजाति. ]

दामोदरें क्षोभवुनी जलातें ।
समूळ त्या नील भुजंगमातें ॥
धेरूनिया ठेवुनिया पदातें- ।
फणांवरी, तो करि नर्तनातें !
आरूढ मेघावरि इंद्र जैसा ॥
शोभे फणींद्रावरि कृष्ण तैसा ! ॥ ५ ॥

वृद्ध गोपालकः—हः हः फार छान-फार छान, धनी !

( नंतर कालियाला हातांत धरून दामोदर प्रवेश करितो. )

दामोदरः— श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

जो हा कालिय फारसा फुरफुरे त्या तुच्छ लेखूनिया ।
त्याच्या ठेउनिया फणेवरि पदां केली भुजा केतु म्यां ॥
ज्याची होत फणा विषें बलवती त्या चंड सर्पावर ।
लीलेनेंच सुनर्तना करिन मी हल्लीसका सुंदर ! ॥ ६ ॥

सर्वजणीं:—आश्चर्य, धनी ! आश्चर्य ! कालियाच्या पांची फणांवर पाय देऊन हा हल्लीसक नृत्य करीत आहे !

दामोदरः—तर मीहि आतां या यमुना जलांतील फुलें गोळा करितों !

कालियः—आः !

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

सारे लोक, फणेवरी क्षितिसवें जो वासुकी वागवी ।
होई शंकरकार्मुकाप्रति तसा जो रज्जु ती लाघवी ॥
विस्तारें भुवनापरी असत जो-त्या मंदरा पर्वता ! ।
टाकी वेष्टुनि शेष तो-जलधिच्या तोयामधें तत्वता ॥
शुंडा-इंद्रकरी धरी कठिण जी-तैशापरी माझिया ।
पाशांनीं तुज या क्षणीं जखडुनी धाडीन स्वर्गालया ! ॥ ७ ॥

वृद्ध गोपालकः—वाहवा ! वाहवा ! धनी ! हे धनी दामोदर आपल्या फुलांसारख्या हलक्या पायांनीं आघात करून, मूर्तिमंत यमुनेचा जसा कांहीं डोहच अशा या महा सर्पाचं चारी बाजूनीं मर्दन करीत, फुलं वेंचीत

आहेत ! ( झाडावरून खालीं उतरून ) शाबास, धनी ! शाबास ! फाडा, फाडा त्याला ! मीहि येतों तुमच्या मदतीला. पण धनी ! मला भय वाटतं बुवा भय ! तर आतां मी ही हकीगत नंदगोपाला जाऊन कळवितों.

[ जातो.

दामोदरः— श्लोक [ वृत्त--मंदाक्रांता. ]

ज्या डोहाचे मधिल सगळे नक्र, तैसेचि मीन ।
गेले नाशाप्रति ऱ्हद-जलीं कालियाचे कढून ॥
त्या डोहाच्या तळिं बसुनिया टाकि फूत्कार मोठे ।
दर्पानें हा फुगुनि अवघा जाहला पुष्ट वाटे ! ॥
जो वेटाळें करुनि तनुचें सांवरी दीर्घ काया ।
त्या ह्या दुष्टा धरणितलिं मी फेंकितों मर्दुनीया ! ॥ ८ ॥

कालियः—अरे, हा मीः—

[ श्लोक—व. ति. ]

जशा क्रोधें भूही जळुनि सहसा जाइ सगळी ।
तशा क्रोधाचींनीं मजशिं बघ ही लालि चढली ! ॥
तुला ह्या ज्वालांच्या प्रखर तपनें दग्ध करितों ।
तुला रक्षो आतां त्रिभुवन, तसा देवगण तो ! ॥ ९ ॥

दामोदरः—कालिया ! तुझ्यांत जर सामर्थ्य असेल तर हा माझा एक भुजच जाळून खाक करून टाक पाहूं ?

कालियः—हः हः हः हः

श्लोक [ वृत्त—उपजाति. ]

चतुः समुद्रांस भिडे मही जी ।
जीच्यांवरी सप्तकुलाद्रि-राजी ॥
"जाळील जो त्या अखिला महीतें ।
त्या कां नये त्वद्‌भुज जाळण्यातें ? ॥ १० ॥

हः रहा तर आतां नीट उभा ! आतांच्या आतां मी तुझं भस्म करून टाकतों ! ( विषाग्नि सोडतो. )

दामोदरः—वाः केवढं मोठं वीर्य प्रकट केलंस !

कालियः—कृपा करावी, कृपा करावी भगवान् नारायणांनीं !

दामोदरः—एकून ह्यांच वीर्यांचा तुला गर्व झाला होता तर ?

कालियः—भगवानांनीं प्रसन्न व्हावं.

आर्या ( गीति. )

गोवर्धन जो उचली, उपमा नोहेचि यत्प्रभावास ।
खंबीर मंदरासम आधारचि होय जो त्रिलोकास ॥
तो भुज पराक्रमी तव, देवेंद्रा ! त्रिभुवनेश्वरा कृष्णा !
जाळाया शक्ति कुठें आहे मज,–धरिलि जरि तशी तृष्णा ? ११

भगवन् ! अज्ञानामुळें माझ्याकडून मर्यादेचा अतिक्रम झाला. मी माझ्या सर्व परिवारासह आपल्याला शरण आलों आहे.

दामोदरः—कालिया ! तूं आतां या यमुनेच्या डोहांत कां राहिला आहेस ?

कालियः—भगवन् ! आपलं श्रेष्ठ असं वाहन जो गरुड, त्याच्या भीतीमुळें मी इथं राहिलों आहे. तर आपल्या कृपेनं गरुडापासून मला अभय असावं अशी माझी इच्छा आहे.

दामोदरः—ठीक आहे.

श्लोक [ वृत्त– अनुष्टुप. ]

नागेंद्रा ! मस्तकीं तूझ्या । मम पादांक देखुनी ।
देईल अभया तूंतें । तार्क्ष्य आपण होउनी ! ॥ १२ ॥

कालियः—उपकार झाले माझ्यावर !

दामोदरः—जा आतां तूं आंत.

कालियः—जशी भगवान् नारायणांची आज्ञा.

दामोदरः—अथवा–इकडं ये पाहूं जरा,—

कालियः—हा आलों, भगवन् ! काय आज्ञा आहे ?

दामोदरः—गो–ब्राम्हणादि कोणाहि प्राणिमात्रांना तूं पीडा देऊं नकोस.

कालियः—भगवन् ! माझ्या विषाच्या योगानं हें पाणी दूषित झालं आहे. तेव्हां आतांच्या आतां हें विष परत काढून घेऊन मी या यमुनेच्या डोहांतून निघून जातों.

दामोदरः—जा तर तूं आतां परत.

कालियः—जशी भगवान् नारायणांची आज्ञा. ( परिजनांसह निघून जातो. )

दामोदरः—तर आतां मीहि डोहांतून आणलेलीं ही फुलं गोपकन्यकांना देतों.

सर्वजणीः—हे आमचे धनी–आमच्या हृदयांना आनंद देत, शरीराला कांहीं अपाय वगैरे न होतां इकडंच येत आहेत. धन्यांचा विजय असो!

संकर्षणः—शाबास! मोठ्या आनंदाची गोष्ट,–गोब्राम्हणांचं कल्याण केलंस!

दामोदरः—( गोपकन्यकांस ) हीं घ्या फुलें!

सर्वजणीः—धनी! असलीं फुलं या पूर्वी कोणीहि गोळा केलीं नाहींत, यांना चंद्रसूर्यांच्या किरणांचा कधीं स्पर्शही झाला नाहीं, यांच्यापेक्षां अधिक सुंदर फुलं कुठंच नाहींत– अशीं फुलं आहेत हीं! तेव्हां यांना स्पर्श करण्याचं आम्हांला भय वाटतं.

दामोदर—(स्वतःशीं) गरीब बिचाऱ्या! पूर्वीच्या भयामुळं ह्या घाबरून गेल्या आहेत! ( उघड ) भिऊं नका, भिऊं नका. आतां हीं फुलं माझ्या हस्तस्पर्शानं मंगलकारक झालीं आहेत, घ्या हीं.

सर्वजणीः—जशीं धन्यांची आज्ञा.

( इतक्यांत एक भट प्रवेश करितो. )

भटः—अरे, गोपालका! नंदगोपाचा पुत्र कुठं गेला?

गोपालकः—हे पहा धनी– ‘ कालिया ’ नामक महासर्पाला शासन करून ह्या गोपकन्यांच्या मध्यें उभे आहेत.

भटः—( जवळ जाऊन ) अहो, नंदगोपपुत्र! अन्वर्थक असं नांव असणाऱ्या उग्रसेन महाराजांचा पुत्र राजा कंस यांची तुम्हांला अशी आज्ञा आहे कीं—

दामोदरः—काय? आज्ञा आहे म्हणतां?

भटः—मथुरेमध्यें ‘ धनुर्मह ’ नांवाचा मोठा उत्सव होणार आहे; तर त्यांत भाग घेण्यासाठीं आपल्या परिजनांसह आपण दोघांनीं यावं–अशी आज्ञा आहे.

—७८—

**दामोदर**:—आर्या ! तर मग देवांचे गुप्त मनोरथ पार पडण्याचा काल येऊन ठेपला आहे म्हणायचा !

**संकर्षण**:—तर आतां लौकर जाऊं या.

**दामोदर**:—ठीक आहे. हेंच पहिलं काम तर. अरे, हा मीः—

**श्लोक**–[ वृत्त–शा. वि. ]

**ज्याचा रत्नकिरीट खालिं पडला, तो हारही तूटला ;**
**सारा केशकलाप तो विखुरला, यत्न् धीरही सूटला ॥**
**बाहूभूषण तें गळूनि, तुटलें तें सूत्र कंठांतलें ।**
**त्या कंसा आजि ओढुनी क्षितितलीं मर्दीन बाहूबळें ! ॥**
**आधीं फोडुनि गंडभाग करिचा त्यातें मदें मारुनी ।**
**जैसा सिंह वधी तयापरिच मी टाकीन या मर्दुनी ॥ १२ ॥**

( सर्व जातात. )

**चवथा अंक समाप्त.**

# अंक ५ वा.

[ नंतर राजा कंस प्रवेश करितो. ]

राजा:— साकी [ वृत्त—शा. वि. ]

ज्याचें शौर्य, तसा पराक्रम, तसें सामर्थ्य आहे महा ।
तो दामोदर त्या व्रजांत विचरे रामासवें कीं अहा ॥
हें ऐकून, तदर्थ आणवियलें क्रीडांगणीं कार्मुक ।
रंगीं तो शिरतांचि मल्लकर ते होतील तत् घातक ! ॥ १ ॥

ध्रुवसेना ! ध्रुवसेना !

[ ध्रुवसेन भट प्रवेश करितो. ]

भट:—महाराजांचा विजय असो.

राजा:—काय ध्रुवसेना ! नंदगोपाचा पुत्र आला कां ?

भट:—ऐकावं महाराजांनीं:—बळराम आणि इतर गोपजन यांच्यासहवर्तमान दामोदर नगरांत प्रवेश करित असतांच त्यानं परटांच्या कडून वस्त्रं हिसकाऊन घेतलीं. हें ऐकतांच महातानं त्याच्या नाशार्थ उत्पलापीड नांवाच्या मत्त हत्तीला त्याच्या अंगावर घातला. नंतर—

श्लोक [ वृत्त—स्रग्धरा. ]

मेळीं गोपालकांच्या, निज तनुवरती रोंख ठेवूनि येई— ।
एकाएकीं करी तो बघुनि, सकळिकां बाल तो धीर देई ॥
सामर्थ्यें बालकानें उपटुनि मग तो दंत त्या कुंजराचा ।
दंतींद्रा अद्रितुल्या चुरडुनि सहसा घेतला प्राण त्याचा ! ॥२॥

राजा:— काय ठार केलं म्हणतोस ? जा आणखी पुन्हा बातमी घेऊन ये.

भट:— जशी महाराजांची आज्ञा. ( जाऊन व पुन्हां येऊन ) महाराजांचा विजय असो. उत्सवप्रसंगामुळं ज्या मोठ्या राजरस्त्यावर सर्वत्र ध्वज आणि पताका उभारल्या होत्या, पुष्पमाला टांगून जो राजपथ शृंगारला होता आणि जो अगरू चंदनाच्या धूपांनीं व्याप्त झाला होता,—अशा त्या महा राजपथावर मग हा नंदगोपाचा पुत्र आला. तेथें राजवाड्याच्या

द्वारांतच गंध—द्रव्याचा करंडक हातांत घेऊन मदनिका नांवाची कुब्जा दासी उभी होती तिला पहातांच तिच्या हातांतील तीं गंधद्रव्यें घेऊन तीं त्यानें आपल्या अंगाला फांसून तोच हात त्या कुब्जेच्या अंगावरून फिरविला त्याबरोबर तिचं कुबड नाहींसं झालं ! मग त्या नंदगोपाच्या पुत्रानं माळ्यांच्या दुकानांतून फुलं आणवून तीं धारण केलीं. आणि मग तो धनुःशालेकडे निघून गेला.

राजाः— म्हणजे ! काय आरंभलं आहे काय हें त्यानं ? तर मग जा, झटदिशीं जा आणि पुढील सारी हकीगत समजून घेऊन ये.

भटः— जशी महाराजांची आज्ञा. ( जातो व पुन्हां परत येऊन ) महाराजांचा विजय असो. धनुःशालेवरील रक्षक सिंहबल यानं त्याला अटकाव केला. त्याबरोबर त्याच्या कानशिलांत भडकाऊन त्याला त्यानं ठार केलं. तेथील धनुष्य घेऊन त्याचे दोन तुकडे केले आणि आतां तो देवघराकडे गेला आहे. तो पहा—

श्लोक ( वृत्त—अमृतध्वनि. )

माळा, तुरा, यांहिं मोराचिया त्या पिसाऱ्यापरी चित्रवेषी दिसे ।
पीतांबरा घेत तोयान्विता आर्द्र मेघापरी वर्ण ज्याचा असे ॥
क्रोधामुळें लोलशा लोचनें दीर्घ हा येइ रामासवें धांउनी ।
भासे मना काय हा मृत्युची येतसे मूर्त रूपाप्रती घेऊनी ! ॥ ३ ॥

राजाः—माझं हृदय गडबडून गेल्यासारखं झालं आहे ! जा, आणि या पूर्वी ठरल्याप्रमाणें चाणूर मुष्टिकांना इथं येऊं दे. आणि वृष्णि—कुमारांना जय्यत सिद्ध राहण्याविषयीं आज्ञा कर. [ जातो.

भटः—जशी महाराजांची आज्ञा.

राजाः—तर आतां मीहि गच्चीवर चढून तिथून चाणूरमुष्टिकांचं युद्ध पहातों. ( वर चढून ) मधुरिके ! दार उघड.

प्रतिहारीः—जशी महाराजांची आज्ञा.

[ राजा आंत जाऊन बसतो. ]

[ नंतर चाणूर व मुष्टिक प्रवेश करितात. ]

चाणूर— आर्या [ गीति. ]

हा मी सज्जचि युद्धा, मत्त गजापरि चढूनि दर्पानें ।
हें बालक दामोदर, चिरडिन रंगीं अजीं स्वहस्तानें ! ॥ ४ ॥

मुष्टिकः— आर्या [ गीति. ]

लोहमयी मम मुष्टी, मुष्टिक तो मीच, क्रोध–पूर्ण असे ।
बलरामा मर्दिन मी, वज्र जसें क्रौंच–गिरिस चुरडितसे ॥ ५ ॥

भटः—हे इथं महाराज आहेत. दोघेहि त्यांच्याजवळ जा.

दोघेः—( जाऊन ) महाराजांचा विजय असो.

राजाः—अरे चाणूरमुष्टिकांनो ! हर प्रयत्नानं आज तुम्ही माझ्या उपकाराची फेड केली पाहिजे !

दोघेः—ऐकावं महाराजांनीं. ढाला, हावभाव, निकटसंबंध, पकडी, प्रहार, इत्यादि युद्धाच्या निरनिराळ्या प्रकारांचा उपयोग करून आम्ही यांत यश मिळवूं. पहावं महाराजांनीं.

राजाः—ठीक आहे. असंच करा तर. ध्रुवसेना ! घेऊन ये त्या गोपाच्या दोघांहि पोरांना.

भटः—जशी महाराजांची आज्ञा. [ जातो.

[ नंतर ध्रुवसेनाबरोबर दामोदर व संकर्षण प्रवेश करितात. ]

दामोदरः—( बलरामास ) दादा !

श्लोक [ वृत्त–शा. वि. ]

होता जो गत जन्मिचा असुर त्या कंसा दुरात्म्याप्रती ।
नाहीं जोंवरि मी रणीं रगडिलें त्या लोळवूनि क्षितीं ॥
होई जन्म मदीय तोंवरि वृथा या मृत्युलोकांतिल ! ।
केल्या ज्या कृति घोषिं वा नगरिं या तोषा न त्या देतिल ! ॥६॥

संकर्षणः— श्लोक. [ वृत्त–व. ति. ]

जो रुष्ट मुष्टिक उभारुनि लोहमुष्टी ।
क्रीडांगणीं उतरि, त्या अजि आत्म–मुष्टीं ॥
मर्दूनिया करिन खंड अनेक त्याचे ॥
वायु प्रचंड करि जेविं नभीं घनाचे ! ॥ ७ ॥

भटः—(त्या दोघांस) हे महाराज ! आपण दोघांनीं त्यांच्या सन्निध जावें.

दोघेः—आः कोणाचे महाराज !

भटः—सगळ्या जागाचे,–आणि आमचेहि पण.

दोघेः---आजपासून तो तसा राहणार नाहीं !

भटः---महाराजांचा विजय असो, हे ते दोघेजण.

राजाः---( पाहून ) हा तो दामोदर ! अहो,-

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

श्रीनें युक्त असून धीरगति हा चाले विलासें किती ।
जैसा दंति मदांध टाकित असे प्रत्येक पादाप्रती ! ॥
याचा वक्ष विशाल, त्यापरि दिसे काठिन्य तेथें महा ।
बाहू स्कंद तसेच्चि हे दृढ बहू, हा श्याम वर्णें पहा ॥
पूर्वी अ.याकेल्या विचित्र कृति ज्या देती न आश्चर्य त्या ।
त्रैलोक्या उलथावया मज गमे सामर्थ्य आहे तया ॥ ८ ॥

तसाच हा सुंदर आणि गंभीर दिसणारा-याचा वडील भाऊ राम आहे असं मी ऐकतों.

श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

याचें सुंदर दीर्घ लोचन नव्या पद्मापरी भासती ।
वर्णें चंद्रसमान गौर; वरितो हा नीलवस्त्राप्रती ॥
बाहू दीर्घ सुवर्तुलाकृति जसें रोप्याद्रिचें मंडल ।
माला हालति, नीलपंकजदलें ज्या माजिं तीं सोज्ज्वल! ॥ ९ ॥

दामोदरः---दादा ! मला वाटतं, आपल्याबरोबर युद्ध करायला ह्याच दोघांना तयार ठेवलं आहे.

संकर्षणः---असंच असेल !

राजाः---ध्रुवसेना ! युद्ध सुरू होऊं दे.

भटः---जशी महाराजांची आज्ञा. ( माळ फेकती. )

दोघे मल्लः---अहो ! वाजवा, रणदुंदुभी वाजवा.

चाणूरः---चल, ये दामोदरा ! आज माझ्या बाहुबलानं मोक्षसिद्धि मिळीव !

दामोदरः --- श्लोक [ वृत्त-शा. वि. ]

हा आलोंच, उभा रहा ! सहन या वेगा करीं संप्रती ॥

मुष्टिकः---अरे, ए रामा ! आज तूं-माझ्या मुष्टीनं चूर्ण झालेल्या

तुझ्या शरीरांतून गळणाऱ्या रक्तप्रवाहानं पावन होऊन,-आपले प्राण टांकशील !

संकर्षणः—

आजीं अर्पिन मुष्टिका ! तव महा नैवेद्य कालाप्रती ॥

( सर्वांचें द्वंद्वयुद्ध चालतें. )

दामोदरः—( चाणूरास मारून. )

याच्या चूर्ण करुनि अस्थि, वधिलें.........

संकर्षणः—

..................या मर्दिलें मी पहा ! ॥

दामोदरः—

या कंसा असुरास धाडिन अजीं कालालयातें अहा ! ॥१०॥

[प्रासादाच्या गच्चीवर चढून जाऊन, कंसाचें शीर्ष धरून त्याला ठार करून]

हा-हा दुरात्मा कंस,-

श्लोक. [ वृत्त-शा. वि. ]

रक्तें तोंड विलिप्त वांसुनि पडे, डोळे जणूं फाडिले ।
खांदे, कंबर, कंठ, जानुहि तसे हे सर्वही भंगले ॥
जंघा दीर्घ तसेच हस्त चुरले, विच्छिन्न तो हार हो ।
केयूरांसह लंबसूत्र तुटलें ! विध्वंसिलें या अहो ! ॥
वज्राघातभरेंचि जेंवि पडतो पृथ्वीवरी पर्वत ।
तैसा कंस धडाड येथ पडुनी, हा जाहलासे मृत ! ॥ ११ ॥

" ( पडद्यांत. ) "

हा ! हा ! महाराज !

( पुन्हां पडद्यांत. )

" अहो, वृष्णिकुलांतील योध्यांनों ! अहो, अनावृष्टि, शिवक, हृदिक, पृथक, सोमदत्त, अक्रूर आदिकरून योद्धेहो ! धन्याच्या खाल्लेल्या अन्नाला जागण्याची हीच वेळ आहे. तर या,-लौकर या तुम्हीं. "

दामोदरः—दादा ! सैन्याचं निवारण करून टाका.

संकर्षणः—मी-मी करितों त्याचं निवारण.

श्लोक [ वृत्त—मातंग. ]

मातंग, अश्व, रथ, धांवूनिया करिति उग्र स्वना किति अहा ! ।
संभ्रांत वीरजन उच्च स्वरें सहज नादावती चमु पहा ॥
तीं तोमरें, चमकतीं कुंत, शक्ति, सित खड्गें, दुधार करले ।
सैन्या अशा खळबळूनी पहा सहज टाकीन मी निज बळें ॥
ज्याच्यामधें लहरि-माला उठे उसळुनी वायुनें सलिल तें ।
फेनावली धवल, पृष्ठावरी सहज ज्याच्यामधें प्रकटते
जेवीं अशा जलधिला टाकिती क्षुभवुनी ताडुनी करतलें ।
तेवीं पहा चमुस या टाकितों खळबळूनी अजीं भुजबलें ! ॥ १२ ॥

[ नंतर वसुदेव प्रवेश करितो. ]

वसुदेवः—अहो, मथुरावासी जनहो ! छेः छेः, अशा साहसास उद्युक्त होऊं नका.

आर्या ( गीति. )

हा रौहिणेय आहे,-हा माझा ज्येष्ठ पुत्र बलराम ! ।
नाहीं ओळखिला कां देवकिचा तनय कृष्ण अभिराम ॥
सोडा सकलहि भीती, कार्य इथें काय आयुधां आहे ? ।
कंसास्तव श्रीविष्णु प्रभु हा आला स्वयें इथें पाहे ! ॥ १३ ॥

संकर्षणः—( पाहून ) अरे, हे तर तात ! ( उघड ) अहो, तात ! हा मी संकर्षण आपल्याला अभिवादन करितों.

दामोदरः—तात ! मी हा दामोदर आपल्याला अभिवादन करितों.

वसुदेवः—तुम्हां उभयतांचाहि अक्षय विजय असो. सत्पुत्रांना जन्म दिल्याचें फळ आज मी भरून पावलों !

दोघेः—अनुग्रहच आहे हा आमच्यावर.

वसुदेवः—कोण आहे तिथें !

( भट प्रवेश करितो. )

भटः—आर्यपुत्रांचा विजय असो.

वसुदेवः—हीं प्रेतें इथून दूर न्या.

भटः—जशी आर्यपुत्रांची आज्ञा.

सर्व गोपालकः—हः हः हः हः आतां गोपालकांचं राज्य झालं!

वसुदेवः—कोण आहे तिथं ?

भटः—आर्यपुत्रांचा विजय असो.

वसुदेवः—जा, तावडतोब जा आणि अनावृष्टीला म्हणावं कीं, दामोदराची तुला अशी आज्ञा आहे कीं,—उग्रसेन महाराजांना बंधनांतून मुक्त करून, राज्याभिषेक करून इकडं घेऊन ये.

भटः—जशी आर्यपुत्रांची आज्ञा. [ जातो.

वसुदेवः—अरे श्लोक [ वृत्त—अनुष्टुप. ]

देवदुंदुभि वाजूनी । पुष्पांची वृष्टि होतसे ।।
कंसांतकास पूजाया । देवांचा संघ येतसे ।। १४ ।।

[ पडद्यांत. ]

श्लोक [ वृत्त—शा. वि. ]

स्वर्णे चित्रित हर्म्यपंक्ति असती प्रासादही रम्य ते ।।
गवा, गोपुर,—राजि, हट्ट, विपणी विस्तारले हे जिथें ।
ऐशी ही मथुरा करो अवन तो श्रीमान् हरी सर्वदा ।।
जो जिंकी भुवनत्रया, विनटती देवेंद्रही यत्पदा !
ज्याचे त्या कमलासमान असती विस्तीर्णसे लोचन ।।
रक्षो तो मथुरेप्रती सुरपती श्रीयुक्त नारायण ।। १५ ।।

वसुदेवः—अहो, हे मथुरावासी जनहो ! ऐका, ऐका ! दैत्येंद्राच्या नगरीचा अडसर उपटून टाकण्यांत कुशल, सगळे क्षत्रिय रणांतून पराङ्मुख होत असतां त्यांना अवलोकन करणारा, असा जो वसुदेवकुमार वासुदेव त्याच्या कृपेनं पुन्हां राज्यपद प्राप्त झालेल्या उग्रसेनाचं राज्य सुरू झाल्याची आतां ग्वाही दिली जात आहे.

सर्वजणः—वृष्णिराज्याची आतां पुन्हां प्रस्थापना झाली !

वसुदेवः—महाराजांना घेऊन या.

भटः—जशी आर्यपुत्रांची आज्ञा.

[ नंतर उग्रसेन प्रवेश करितो. ]

उग्रसेनः— श्लोक-[ वृत्त—व. ति. ]

जे क्लेश दे मजशि संतत बंदिवास, ।
ते केशिसूदन, सुरेश, जगन्निवास— ॥
वारीतसे अजि पहा अपुल्या बलानें ।
तो इंद्रताप हरि विष्णु जसा करानें ॥ १६ ॥

भगवंतांच्या कृपेनें मी या क्लेशसागरांतून पार झालों आहे.

( नंतर नारद प्रवेश करितात. )

नारदः— साकी—वृत्त.

कंस निवटितां, देवाज्ञेनें पूजाया विष्णूतें ।
सुरलोकाहुनि सुरांगनासह घेऊनि गंधर्वांतें ।
या स्थलिं अवतरलों । सिद्धचि पूजाया झालों ॥ १७ ॥

दामोदरः—( स्वगत ) अहो, हे देवर्षि नारद! ( नारदास ) देवर्षे! मी आपलं स्वागत करितों. हें अर्घ्य आणि पाद्य, याचा स्वीकार करावा.

नारदः—सर्व घेतों मी. हे गंधर्व आणि या अप्सरा गात आहेत.

आर्या—( गीति. )

नारायणा ! नमी मी; तैशा या देवताहि तुज नमिती ।
नाशें या असुराच्या रक्षियली आज सर्व ही जगती ॥ १८ ॥

दामोदरः—देवर्षे ! मी प्रसन्न झालों आहे. तुमचं मी आणखी काय प्रिय करूं तें सांगा.

नारदः— श्लोक-[ इं. व. ]

माझ्यावरी विष्णु प्रसन्न हे जरी ।
माझा खटाटोप फळे पुरा तरी ॥
देवोत्तमांच्यासह पूर्णकाम हा ।
स्वर्गाप्रती नारद चालला पहा ! ॥ १९ ॥

दामोदरः—यावं आतां आपण. पण पुन्हां दर्शन द्यावं.

नारदः—जशी भगवान् नारायणांची आज्ञा.

[ जातो. ]

—५५—

( भरतवाक्य. )

श्लोक–[ वृत्त–अनुष्टुप. ]

कुंडलें हिमविंध्यांची। सागरान्ता अशी मही।
एकछत्रान्विता शासो। आमुचा राजसिंह ही ॥ २० ॥

[ सर्व जासात. ]

—पांचवा अंक समाप्त.—

बालचरित समाप्त.